# अनुक्रम



* * *

## आवाहन—

/साहित्यसंगीतकलाविहीनः । साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः ॥

साहित्य, संगीत, कला याच्याविषयीची अभिरुची ज्याच्या ठायी नाही तो खरोखर पशु होय, /असे जे सुभाषितकाराचे म्हणणे आहे ते सर्वथैव सत्य आहे. 'आहारनिद्राभयमैथुनां' च्या सामान्य, व्यावहारिक पातळीवरून अध्ययन-संशोधन, आत्मप्रकटीकरण-सौंदर्यसाधना यांच्या असाधारण, अलौकिक पातळीवर जो जाऊ शकत नाही; नवतत्त्वज्ञान किंवा नवनवोन्मेषशाली सौंदर्य निर्माण करण्याचे सामर्थ्यच ज्याच्या अंगी मुळीच नसते; एवढेच नव्हे तर साहित्य-संगीत कला याच्याविषयी, म्हणजेच उच्च कोटीचे भावदर्शन, विचारमंथन, सौंदर्यप्रकटीकरण याच्याविषयी, जो उपेक्षाबुद्धी दाखवितो, किंबहुना याविषयी जो मुळातच उदासीन असतो; उच्च विचारांच्या, उदात्त कल्पनांच्या नित्यनूतन सौंदर्याच्या साक्षात्काराने हर्षनिर्भर होण्याचे दूरच राहिले, पण याच्या साक्षात्कारास अनुकूल अशी आकलनक्षमता, संवेदनशीलताच मुळात ज्याच्या मनोबुद्धीच्या ठायी नसते त्याला पशुकोटीत घालण्यास खरोखर कोणताच प्रत्यवाय नाही. तथापि हे म्हणणे एका व्यक्तीच्या बाबतीत जितके बरोबर ठरेल, त्यापेक्षा ते एखाद्या राष्ट्राच्या बाबतीत अधिक बरोबर ठरेल. कारण, एखाद्या राष्ट्रात एखादुसरा 'पुच्छविषाणहीन' पशु असला तरी फारसे बिघडणार नाही, पण त्यातील सर्वच व्यक्ती तशा असल्या तर मात्र त्या राष्ट्राला जीवनात नीचतम पायरी मिळाल्याशिवाय राहणार नाही. आणि असले सामान्यातिसामान्य, नि प्राण जीवन जगावे लागावे याहून त्या राष्ट्राचे अधिक दारुण दुर्दैव नाही. साहित्य, संगीत, कला या तीन गोष्टींपैकी एखाद्या गोष्टीचा जरी अभाव असेल तरी दुर्दैवाच्या दशावताराचे ते दुश्चिन्हच ठरावे, इतके महत्त्व प्रत्येक गोष्टीला राष्ट्रीय संसारात आहे. एक 'साहित्य' जर एखाद्या देशात चांगल्या प्रतीचे निर्माण होत नसेल तर त्या देशाला खरा गुरी प्रतिष्ठाच कधी प्राप्त होऊ शकणार नाही; आणि साहित्य-सर्जन होत असले तरी, तत्त्वचिंतन — विशेषत: ... हे जर तेथे होत नसेल तर, त्या देशाला

मस्तकीच्या उच्च पदवीवर यत्किंचितही अधिकार सांगता येणार नाही. कारण, मानाच्या स्थानावर विराजमान होण्यासाठी जी सत्त्वसंपन्नता राष्ट्राच्या अंगी असावी लागते तीच निबंधलेखनाच्या अभावी तेथे असू शकणार नाही. खरो-खर **निबंध ही एक महाशक्ती आहे**—राष्ट्रात चैतन्य निर्माण करू शकणारी, राष्ट्राला सामर्थ्यवान करू शकणारी, त्याला उत्कर्षशिखरावर जाण्यास साह्यभूत ठरणारी, वैभवाच्या कोटीत त्याचा प्रवेश करून देणारी! ज्यातल्या ज्या राष्ट्रांनी या महाशक्तीची निष्ठेने उपासना केली त्या राष्ट्रांना ऐश्वर्याची प्राप्ती झालेली दिसते. नव्याने उदयाला येऊ पाहणाऱ्या प्रत्येक राष्ट्राने–त्यातल्या प्रत्येक तरुणाने हे ध्यानात घेणे अवश्य आहे आणि या महाशक्तीला प्रयत्नांची पराकाष्ठा करून वश करून घेणेही अवश्य आहे. हे करावयाचेच असा ज्याचा दृढनिश्चय झाला असेल त्याने प्रथम या महा-शक्तीचे दिव्य, ऊर्जस्वल स्वरूप डोळे भरून पाहावयास हवे, ही शक्ती केव्हा वश होते हे समजावून घ्यावयास हवे.

## महाशक्तीचे ऊर्जस्वल स्वरूप

या दृष्टीने निबंध या प्रभावी वाङ्मयप्रकाराचे निरीक्षण केले आणि त्याच्या स्वरूपाचे वर्णन करावयाचे झाले तर ते असे करता येईल, **एका प्रौढ, प्रगल्भ व्यक्तित्वाच्या, सखोल, सकस विचाराच्या रूपाने, समुचित, समर्थ शैलीच्या माध्यमातून झालेला अर्थगर्भ, आवाहनक्षम आविष्कार म्हणजे निबंध** होय. स्वतंत्र, समावेशक बुद्धी, विशुद्ध, व्यापक दृष्टी, समाजाचे सखोल, मूलगामी अवलोकन, जीवनप्रवाहाचे सूक्ष्म, भेदक विश्लेषण, उत्कर्षापकर्ष-कारक प्रवृत्तींचे अचूक, समतोल मूल्यमापन, प्रखर, प्रगमनशील तत्त्वचिंतन, द्रष्ट्याचे दूरदर्शी, धीट दिग्दर्शन, स्वमताचे साधार, सप्रमाण विवेचन, समर्पक, साक्षेपी लेखन या सगळ्यातून – या सगळ्याच्या समवायातून – सशक्त, सुंदर निबंध सिद्ध होतो. गतानुगतिकता, पुराणप्रियता यांचा त्याग करून निर्वैर अंतःकरणाने, निर्मळ मनाने, नव्या, हितकारक गोष्टींचे स्वागत करण्याइतके औदार्य ज्या बुद्धीत असते, नव्या तत्त्वज्ञानाचा उद्दाम उद्रेक पाहूनही विस्मित किंवा स्तिमित न होण्याइतके स्थैर्य ज्या दृष्टीत असते, नवनव्या तत्त्वज्ञानाच्या व त्याच्या स्वीकारामुळे लाभणाऱ्या अमृत फळाच्या संदर्भात स्वतःच्या राष्ट्राच्या

अंतर्बाह्य प्रवृत्तीची चिकित्सा -मीमांसा करण्याची अपार तळमळ ज्या अव-लोकन-विश्लेषणाच्या मुळाशी असते, श्रेष्ठ राष्ट्राच्या मालिकेत आपल्या राष्ट्राची गणना व्हावी अशी उत्तुंग आकांक्षा उत्पन्न करणारे उत्कट ध्येयवादित्व ज्या मूल्यमापन-चिंतनाच्या पाठीशी असते, आपले प्रतिपादन प्रगतिकारक व अभ्युदयसाधक असल्यामुळे त्याचा आदर व्हावा, त्याअन्वये राष्ट्राने आपले आचरण ठेवावे असा उचित आग्रह ज्या विवेचनलेखनात असतो, त्या बुद्धीतून, त्या दृष्टीतून, त्या अवलोकनविश्लेषणातून, त्या मूल्मापनचिंतनातून, त्या विवेचन लेखनातून सिद्ध होणारा निबंध समर्थ व सुंदर व्हावा, इतकेच नाही तर एका अपूर्व तेजाने विलसावा हे अगदी स्वाभाविक होय; आणि असे असल्यामुळेच एवगुणविशिष्ट निबंध हा एखाद्या दिव्य, तेजःपुंज, महन्मंगल अशा महाशक्तीप्रमाणे प्रतिभासित व्हावा हेही अगदी स्वाभाविकच होय. सरोजस्व निबंध ही एक उज्ज्वल, ऊर्जस्वल अशी महाशक्ती आहे. नव विचारप्रवर्तनाचे सामर्थ्य तिच्यात असल्यामुळे जेथे जेथे ती वास करते तेथील वैचारिक मरगळ ती नष्ट करते, तेथील लोकांना पराक्रमाची प्रेरणा देते, त्यांना विकासाच्या वाटा मोकळ्या करून देते, नवे युग निर्माण करण्याची सुवर्णसंधी मिळवून देते, सर्व प्रकारच्या सुखसमृद्धीचे कोषागार हस्तगत करण्यास ती साह्य करते. 'पुनरुज्जीवना'च्या कालखंडात युरोपने जे अद्भुत चमत्कार करून दाखविले, मन्वंतराचे जे विस्मयकारक कर्तृत्व दाखवून दिले, ज्ञानविज्ञानाच्या, साहित्यकलांच्या क्षेत्रात भरघोस पीक उत्पन्न करण्याचे जे विलक्षण दृश्य दाखविले ते निबंध या महाशक्तीच्या कर्तृत्वशक्तीचेच प्रत्यक्ष प्रमाण होय, ते तिच्या शक्तिमत्तेचेच बोलके प्रत्यंतर होय, तो तिच्या लाभप्रद वरदहस्ताचाच दृक्प्रत्यय होय. अर्थात हे सर्व सत्य असले तरी वाटेल त्याला या महाशक्तीचा प्रसाद लाभत नाही हेही तितकेच सत्य आहे. तिचा प्रसाद मिळ-विण्यासाठी पंचाग्निसाधन करून तपश्चर्या करणाऱ्याच्या निष्ठेने तिची अखंड उपासना करावी लागते. युरोपने अशी उपासना अहर्निश केली म्हणूनच त्याला त्या शक्तीचा प्रसाद भरभरून मिळाला. युरोपप्रमाणेच आपल्यालाही भविष्य-काळात विभूती प्राप्त व्हावी अशी आपली उत्कट इच्छा असेल तर आपणही युरोपप्रमाणेच या महाशक्तीची निष्ठेने उपासना करणे क्रमप्राप्त आहे. ही उपासना कशी करावयाची हे समजावयास हवे असेल तर युरोपने ही उपासना

कशी केली याचा शोध घेणे युक्त होईल.

## निष्ठापूर्वक उपासना करावयास हवी

चौदाव्या शतकात युरोपात जेव्हा ग्रीक विद्येचे पुनरुज्जीवन झाले आणि तेथील लोकांना जेव्हा या नव्या विद्येचे संजीवन मिळाले तेव्हा तेथे नव-जागरणास प्रारंभ झाला. जागृत झालेल्या लोकांना विज्ञानाचा तिसरा दिव्य चक्षू लाभला. या नवीन वैज्ञानिक दृष्टीमुळे, आजपर्यंत आपली अवनती का झाली आणि आपली उन्नती कशामुळे होणार आहे याचे पूर्ण ज्ञान लोकांना झाले; जोपर्यंत आपण धर्मांचे जोखड धैर्याने झुगारून देणार नाही आणि विज्ञानाने प्रक्षाळिलेल्या नव्या मूल्यांचा अवलंब करणार नाही तोपर्यंत आपल्याला उज्ज्वल भविष्य नाही हे या लोकांनी ओळखले; आणि म्हणूनच इहविमुखता, परमार्थप्रवणता, निवृत्तिपरता, शब्दप्रामाण्य, दैववादी-कर्मवादी वृत्ती या साऱ्या विनाशक गोष्टींवर प्राणपणाने कठोर प्रहार करून जीवनाभिमुखता, ऐहिक जीवनाविषयीची आसक्ती, प्रवृत्तिपरता, बुद्धिनिष्ठा, भौतिक कारणमीमांसा या समुद्धारक तत्त्वांचा उच्चरवाने उद्घोष केला; या लौकिक जीवनाविषयी उदासीन राहण्याचे, त्याची उपेक्षा करण्याचे, त्याचा अधिक्षेप करण्याचे मुळीच कारण नाही, ऐहिक जीवन समृद्ध करणे हीही एका प्रकारची धर्म साधनाच आहे, ही साधना यशस्वीपणे करावयाची असेल तर दयादिदानी या जीवनाकडे धाव घेतली पाहिजे, त्याच्या जडणघडणीचा अभ्यास स्वतः स्वतंत्र पणे बंधमुक्त बुद्धीने केला पाहिजे, या अभ्यासातून आकळणाऱ्या गोष्टी लक्षात घेऊनच जीवनाची पुनर्रचना करणे योग्य होय असे या लोकांनी ठरविले व नव्या जोमाने प्रगतीचे पाऊल टाकले. हे करीत असताना धर्मांची बंधने आड येणारच होती, धर्मसत्तेचा अंध विरोध होतच होता; परंतु या सत्तेपुढे आपण नमलो तर आपला विनाश अटळ आहे, आजपर्यंत धर्मनियंत्रणाच्या शृंखलांनी आपले मन, आपली बुद्धी ही जखडलेली असल्यामुळेच आपल्या सर्व शक्ती क्षीण झाल्या, आपल्या विकासाचा अवरोध झाला, आपल्या राष्ट्राचा कणाच मोडला हे या लोकांना स्पष्ट दिसत असल्यामुळे धर्मसत्तेच्या निरोधास न जुमानता या लोकांनी धर्मांच्या शृंखला खळखळा तोडून टाकल्या आणि आपली बुद्धी, आपले मन ही बंधमुक्त करून टाकली. हे सारे करीत असताना

या लोकांना अनंत हालअपेष्टा, अनन्त यातना सोसाव्या लागल्या, घोर तुरुंगवास पत्करावा लागला, रसरसलेल्या अग्नीच्या ज्वाईत उड्या घ्याव्या लागल्या; पण या सगळ्यांनी हे प्राणपणाने केले, विवेकनिष्ठेची नव्याने प्रज्वलित झालेली ज्योत जिवाच्या करारावर सुरक्षित ठेवली, बुद्धिप्रामाण्याच्या बळावर निर्माण केलेल्या नव्या विज्ञानयुगाचे संरक्षण जिवावर उदार होऊन केले. ध्येयनिष्ठेचे, या धैर्याचे, या त्यागबुद्धीचे दूरगामी सुपरिणाम युरोपच्या जीवनावर झाले. या लोकांची बुद्धी स्वैरसंचारास मोकळी झाल्यामुळे विश्वाचा महाग्रंथ स्वतंत्रपणे वाचू शकली, त्याचा अर्थ लावण्याची ऊर्मी तिच्यात उसळून आली आणि अर्थ लावता लावता विश्वाची अनेक रहस्ये, परमोत्कर्षाची अनेक मर्मे तिला शोधता आली, प्रयत्नाने उगापुढे ठेवता आली; राजसत्ता, लोकसत्ता, शासनसंस्था, समाजशिक्षण, स्त्रियांची प्रतिष्ठा, भिन्न वर्गांची समता, राष्ट्राची अर्थव्यवस्था, आर्थिक समता इत्यादि अनेक विषयांचा ऊहापोह करून प्रगतिपथाचे दिग्दर्शन करता आले. याप्रमाणे युरोपने निबंधरचना केली, ग्रंथरचना केली **म्हणूनच त्याला खऱ्या अर्थाने राष्ट्ररचनाही करता आली.** यामुळेच युरोपचा विकास वेगाने होऊ शकला आणि अल्पावधीत तो अग्रेसर होऊन बलाढ्य झाला. या बलाढ्यतेचे मूळ, रॉजर बेकन, मार्सिलिओ, विल्यम् ऑफ् ओकहॅम्, कोपर्निकस, केप्लर, गॅलिलिओ, न्यूटन, ब्रूनो, जॉन हस, मार्टिन ल्यूथर, फ्रान्सिस बेकन, रेनी डेकार्ट यांसारख्या थोर पुरुषांनी प्रवृत्तिधर्माचा जो गौरव केला, विज्ञाननिष्ठा, बुद्धिप्रामाण्य, भौतिक कारणमीमांसा या तत्त्वांची जी अव्याहत कास धरली आणि दीर्घोद्योग करून जी ग्रंथरचना केली, त्यात आहे. एतावता बलाढ्य होणाऱ्या युरोपने विशिष्ट तत्त्वांची कास धरून निष्ठापूर्वक असे जे आचरण ज्ञानविज्ञानाच्या क्षेत्रात केले ते आचरण म्हणजेच निबंध या महाशक्तीची उपासना होय.

याचा अर्थ अगदी स्पष्ट आहे. समुचित, समर्थ शैलीच्या माध्यमातून सकस, सखोल विचाराच्या रूपाने झालेला प्रौढ, प्रगल्भ व्यक्तित्वाचा अर्थगर्भ, आवाहनक्षम आविष्कार म्हणजे निबंध हे यापूर्वीच सांगितले आहे. असा हा निबंध, युरोपने जो प्रचंड उद्योग केला तसा उद्योग केल्याशिवाय सहजासहजी निर्माण होत नाही, होणे शक्य नाही; कारण जोपर्यंत माणूस परमार्थप्रवण, निवृत्तिप्रिय, शब्दप्रामाण्यवादी, कर्मवादी, दैववादी असतो तोपर्यंत ऐहिक जीवना-

विषयी, त्याच्या उत्कर्षापकर्षाविषयी कोणताही प्रवृत्तिपर विचार त्याच्या मनात येत नाही, आपल्या काळाच्या आलोकात आपल्या जीवनाच्या विकासऱ्हासाची चिंता करावी हे स्फुरणच त्याच्या चित्ताला येत नाही; आपल्या दुर्दैवास आपलेच अज्ञान, आपणच उराशी कवटाळलेली चुकीची जीवनमूल्ये, आपल्याच समाजरचनेतील वैगुण्ये कारणीभूत आहेत याची अस्फुट जाणीवही त्याला होत नाही; काही स्वतंत्रपणे मनात यावे, चित्ताला काही वेगळे स्फुरण व्हावे, काही नव्या जाणिवा व्हाव्या इतके ते मन स्वतंत्रच नसते, ते चित्त सचेतनच नसते; आपल्या मनोबुद्धींना विचारस्वातंत्र्य-उच्चारस्वातंत्र्य-आचारस्वातंत्र्य मिळावे, आपल्याला सर्वार्थाने चैतन्यमय जीवन जगता यावे असे वाटण्याइतपत त्या व्यक्तित्वाचा विकासच झालेला नसतो, विकासाला अवसरच मिळालेला नसतो; या सगळ्याचे पर्यवसान परंपरेचे अंध अनुकरण करण्यात होते, पूर्वसूरींच्या आज्ञा निःशब्दपणे प्रमाण मानण्यात होते; आपल्या जीवनाला एकारलेले, स्थितिशील रूप प्राप्त करून देण्यात होते. अशा जीवनातून सरस, समृद्ध व्यक्तित्व कसे उत्पन्न व्हावे! स्वतंत्र, सर्वांगस्पर्शी विचारधारा कशी उगम पावावी! आपल्या जाणिवांची प्रतिक्रियांची अभिव्यक्ती साधण्याची ऊर्मी कशी यावी! आणि मग जातिवंत, जिवंत निबंध तरी कसा निर्माण व्हावा! जेथे विशिष्ट व्यक्तित्व नाही, जेथे विशिष्ट विचार नाहीत, जेथे विशिष्ट अभिव्यक्ती नाही तेथे पुरोगामी, प्रभावी निबंध निर्माण होण्याचा संभवमात्र संभव नाही. जेथे व्यक्तित्व विचारादि अनुकूल घटकांनी भूमी उर्वर झालेली

आपल्या बुद्धिबळावर निर्माण करणे युक्त आहे असा निश्चय मनीमानसी झालेला असल्यामुळे आणि आपण निर्माण केलेल्या तत्त्वज्ञानाचा प्रसार समाजाच्या सर्व थरांत झाल्याखेरीज गत्यंतर नाही हे सत्य आकळलेले असल्यामुळे, जेव्हा या प्रसारासाठी प्रतीतिकारक, प्रभावी लेखन केले जाते तेव्हा त्यातून, त्या उर्वर भूमीतून तेजस्वी, वरदायिनी निजधर्मदेवता आविर्भूत होऊन नवविचाराचे भरदार पीक भरघोस स्वरूपात प्रसाद म्हणून देते. प्रवृत्तिरम, बुद्धिनिष्ठा इत्यादि तत्त्वांच्या उपयोजनेचे हे फळ होय.

हेच फळ यापुढे आपल्याला मिळवावयाचे असेल तर आपणही उपर्युक्त तत्त्वांची उपासना करावयास हवी, युरोपने ज्याप्रमाणे या तत्त्वांचा कास धरून महाशक्तीची उपासना केली तशी उपासना करावयास हवी. आपण हे केले तर आपली मनःकामना पूर्ण होईल यात तिळमात्र शंका नाही. युरोपचे ईप्सित या उपासनेमुळे पूर्ण झालेले आज आपल्याला दिसतेच आहे. परंतु उपासनेचे फळ खात्रीने मिळते हे सिद्ध करण्यासाठी युरोपचेच उदाहरण द्यावयास हवे असे मुळीच नाही. आपल्याच राष्ट्राचा उल्लेख या संदर्भात सहज करता येईल. कारण, आपल्या राष्ट्रानेही शंभर सवाशे वर्षांपूर्वी युरोपचेच अनुकरण करून पाश्चात्त्य विद्येचे अध्ययन करून आपली (स्वातंत्र्यप्राप्तीची) इच्छा पूर्ण करून घेतली हे ऐतिहासिक सत्य आहे आणि म्हणूनच आपलेच उदाहरण आज आपल्या डोळ्यांपुढे ठेवावयास कोणताही प्रत्यवाय नाही. आपल्यासमोर आदर्श युरोपचा आहे की आपला आहे याला तादृश महत्त्व नाही. आपल्या संकल्पाची सांगता करण्यासाठी आवश्यक असलेला प्रयत्न करण्याची प्रेरणा देणारा कोणता तरी आदर्श आपल्यासमोर आहे वा नाही आणि आदर्शभूत राष्ट्राने (अथवा व्यक्तीने) जे पवित्र आचरण ठेवले, जी उग्र तपश्चर्या केली, तसे आचरण आपण ठेवीत आहो वा नाही, तशी तपश्चर्या आपण करीत आहो की नाही याला अधिक महत्त्व आहे. असले आचरण यापुढे आपल्याला करावेच लागेल, असली तपश्चर्याही आपल्याला करावीच लागेल, काळाचे आवाहनच तसे आहे. असले आव्हान काळाने गेल्या शतकातही आपल्याला दिले होते आणि आपल्यातील पुरुषश्रेष्ठांनी धैर्याने त्याचा स्वीकार करून त्याला खणखणीत प्रत्युत्तरही दिले होते. या अपूर्व कर्तृत्वाचे विहंगमावलोकन आपण आज केले तर ते आपल्या दृष्टीने उद्बोधक

व मार्गदर्शक ठरेल हे निस्संशय !

## आपला आत्मा पालटला

गेल्या शतकात आपल्याला काळाने प्रचंड आव्हान दिले होते असे वर म्हटले आहे. हे आव्हान आपल्याला इ. स. १८१८ च्या सुमारास मिळाले होते आणि त्याचे स्वरूप सांस्कृतिक होते. या काळात, आपल्या मध्ययुगीन, परमार्थनिष्ठ, कृषिप्रधान, शब्दप्रामाण्यवादी, दैववादी, संकुचित, स्थितिशील अशा भारतीय संस्कृतीवर वर्चस्व प्रस्थापित करू पाहणारी आधुनिक, विज्ञाननिष्ठ, उद्योगप्रवण, बुद्धिप्रामाण्यवादी, प्रयत्नशील, व्यापक दृष्टीची, गतिमान पाश्चात्य संस्कृती आपल्यापुढे ठाण मांडून उभी राहिली होती आणि मोकळ्या मनाने तिचे स्वागत आपण करतो की अनुदारपणे तिला दूर ढकलण्याचा प्रयत्न करतो हा तिचा रोकडा सवाल होता. या सवालाला दुसऱ्या पक्षी उत्तर दिले जाण्याचा समय जवळच होता आणि तसे ते देण्याचा कुवत घडून काही काळ जावीही गेली. कारण, १३ व्या शतकापासून शतकानुशतक अज्ञानाचे, पोथीनिष्ठेचे, कूपमंडूकतेचे जे खोल संस्कार आपल्या मनावर होत आलेले होते ते १९ व्या शतकाच्या आरंभी फार प्रबळ नसते तरी आपल्याला खुल्या मनाने नव्याचा स्वीकार करू देण्याइतके, नवे आत्मसात करू देण्याइतके दुबळेही नव्हते. तथापि पाश्चात्य संस्कृतीचे उत्थान कशात याचे आकलन पाश्चात्य विद्येच्याच परिचयाने झाल्यामुळे हे संस्कार नष्ट करण्याची पराकाष्ठा आपण अल्पावधीतच केली आणि पाश्चात्यांप्रमाणेच बलवंड होण्याची भव्य मनीषा आपण धरली.* हे सारे करीत असताना जे प्रगमनशील उपक्रम आपण केले

ते निबंधरचनेच्या दृष्टीने व परिणामी आपल्या राष्ट्राच्या पुनर्रचनेच्या दृष्टीनेही अतिशय महत्त्वाचे ठरले :

या काळात अनेक महत्त्वपूर्ण गोष्टी आपण विवेकपूर्वक दूरदृष्टीने केल्या : ऐहिक जीवनाविषयीच्या परंपरागत उपेक्षाबुद्धीचा त्याग करून नूतन भौतिकवादित्वाचा अंगीकार आपण केला. ऐहिक जीवनातील घडामोडींची, उन्नती अवनीतींची, यशापयशाची कारणमीमांसा करताना आजवरच्या आध्यात्मिक, कर्मवादी दृष्टीचा आंधळा वापर करण्याचे सोडून देऊन वैज्ञानिक, बुद्धिवादी दृष्टीचा डोळस उपयोग आपण करू लागलो. पुनरुत्थानाच्या दृष्टीने सर्वांगीण सुधारणाचा पुरस्कार करीत असताना आपल्या सनातन विद्येच्या सुधारणेस आपण अग्रस्थान देऊ लागलो, पाश्चात्य विद्येची मर्मस्थाने हेरून आपल्या विद्येचे आधुनिकीकरण आपण करू लागलो. 'स्वदेशीय लोकामध्ये विलायतेतील विद्याचा अभ्यास अधिक व्हावा, आणि या देशाची समृद्धि व येथील लोकाचें कल्याण याविषयीं स्वतंत्रतेनें व उघड रीतीनें विचार करावयास स्थल व्हावें, या इच्छेनें× आपण 'न्यूजपेपर म्हणजे वर्तमानपत्र छापून प्रसिद्ध' करू लागलो, 'लोकास त्यांची वास्तविक स्थिति कशी आहे ती कळावी, त्यांणी सुधारावें, त्यास इहलोकीं सुसमृद्धि व्हावी, परलोकाचें साधन घडावें व आज बहुत काळापासून दृढ भ्रम झाले आहेत त्यांपैकीं काही अविचाराने व कांहीं मूर्खपणानें जडलेले आहेत ते कमी व्हावे, किंवा नाहीसे व्हावे, इतक्या हेतूने'+ आपण वर्तमानपत्रातून लेख लिहू लागलो, 'स्टुडन्टस् लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी' सारख्या ज्ञानप्रसारक संस्था काढून त्यातून 'स्त्रीशिक्षण' सारख्या विषयावरील निबंध वाचून '(जनावराप्रमाणें वागविल्या जाणाऱ्या स्त्रियाना शिक्षण देऊन त्यांचा उद्धार करणे) हें तुमचें माझें नाहीं, भगवंताचें कार्य आहे. माझ्या प्रत्येक विद्यार्थ्यानेंच आपल्या घरापासून प्रारंभ करावा.' असे आवाहन आपण करू लागलो. × याप्रमाणे इंग्रजांचा अमल सुरू होईपर्यंत व्यक्त झालेले दिसतात, त्यावरून क्रमशः इंग्रजांप्रमाणेच उच्च पदवीप्रत जाण्याचा मनोदयच सूचित होत नाही काय?

× 'दर्पण' या आद्य मराठी नियतकालिकाचा प्रस्ताव. (६ जानेवारी १८३२)
\+ 'शतपत्रांचा इत्यर्थ' – शतपत्रें – लोकहितवादी, पृ. १ (दुसरी आवृत्ती)
× नाना शंकरशेट यांचें चरित्र – पु. बा. कुलकर्णी; पृ. ६८.

ज्या वृत्तीने व दृष्टीने आपण जीवनाकडे पाहिले नव्हते त्या वृत्तीने व दृष्टीने पाहू लागलो; 'काळ व पदार्थांची स्थिति ही बदलली म्हणजे जुन्या रीती सोडून नव्या घेण्याचे प्रयोजन पडते, ' = हे वेळीच जाणून नव्या रीती नियत कालिकासारख्या नव्या साधनाच्या साह्याने आपण प्रचलित करू लागलो.

याचाच एक महत्त्वाचा परिपाक म्हणजे या काळात मराठीमध्ये झालेला निबंध या वाङ्मयप्रकाराचा जन्म हा होय. यापूर्वीच्या सहा शतकांच्या घ्यल-वधीत मराठीत अनेक दर्जाचे काव्य लिहिले गेले; पण त्यामानाने गद्य मात्र फारच थोडे लिहिले गेले. आणि जे लिहिले गेले त्यात आधुनिक निबंधा-सारख्या गद्यलेखनाचा स्पष्ट स्पष्ट अभावच होता. ज्योतिष, वैद्यक इत्यादि शास्त्रीय विषयांवरील लहान पोथ्या, लहान मुलांसाठी करण्यात आलेले पौराणिक कथांचे सारांश तर्जुमे, महानुभाव पंथातील चरित्रादिक पुस्तके, मराठ्यांच्या कारकीर्दीत 'सर्वसामान्य' आलेल्या काही बखरी आणि मराठी मुत्सद्यांचा खासगी व राजकीय पत्रव्यवहार एवढेच या प्राचीन काळातील उल्लेख गद्य-वाङ्मय होय. या वाङ्मयात तत्कालीन परिस्थितीविषयीचे काही महत्त्वाचे विचार व्यक्त झालेले आढळत असले तरी ते स्फुट स्वरूपाचे असल्यामुळे, त्यातून दीर्घ, सलग, सुसंबद्ध अशी विचारांची रचना सहसा केली गेली नसल्यामुळे, साधी, सरळ, प्रसादपूर्ण, प्रवाही डौलदार, ठोस, ठसकेबाज, बहुढंगभ अशी विविध गुणांनी मंडित असलेली गद्यशैली अस्तित्वात असूनही, या काळात निबंधाची निर्मिती होऊ शकली नाही. राजनीती, आज्ञापत्र यासारखी प्रकरणे निबंधसदृश असली तरी ती अपवादात्मकच होत; आणि त्यांनाही अस्सल निबंध म्हणता येईल असे वाटत नाही. या सगळ्याचा इत्यर्थ असा की, इंग्रजांचे आणि इंग्रजी धाटणीच्या निबंधाचे आगमन होण्या-पूर्वी आपल्याकडे निबंध या अर्वाचीन वाङ्मयप्रकाराचा आविर्भाव झालेला नव्हता.* इंग्रजांनी आपल्या देशात पाय रोवल्यावर जेव्हा पाश्चात्त्य विद्येचे

= 'विद्या हेच बळ आहे' – दर्पण, २४ ऑगस्ट १८३२.

* याची कारणमीमांसा, यापूर्वी (पृ. १० वर) जे विवेचन केले आहे त्यावरून स्पष्ट होईल. मुद्रणकलेचा अभाव, पाठांतरसुकरता अशी अन्य कारणेही या संदर्भात सांगता येणे शक्य आहे. पण प्रस्तुत, या निबंधाच्या

वितरण केले, त्यायोगे जेव्हा आपल्या पुराण आत्म्याचे नूतनीकरण झाले आणि त्या आत्म्याचा आविष्कार जेव्हा आपण करू लागलो, तेव्हाच निबंध या नव्या वाङ्मयप्रकारास मराठी वाङ्मयात प्रथम चालना मिळाली. याचा परिणाम म्हणून या काळात जे निबंध लिहिले गेले ते सर्व अभिजात होते असे नाही पण अभिजात निबंधाच्या अवताराची पूर्वतयारी करण्याइतके सामर्थ्य त्यांच्यात उत्तरोत्तर येत होते हे निश्चित होय. हे सामर्थ्य त्यांत क्रमक्रमे येत गेले, त्याला सौष्ठव कसे प्राप्त होत गेले याचे समालोचन येथे केले तर पुढील अभ्यासाच्या दृष्टीने ते उपयुक्तच ठरेल.

## ' अव्वल इंग्रजी 'तील आविष्कार

१८३२ साली बाळशास्त्री जांभेकर यांनी ' दर्पण ' हे वृत्तपत्र प्रसिद्ध करण्यास प्रारंभ केला, तेव्हापासून १८७४ साली विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी ' निबंधमाला ' सुरू करण्यास प्रारंभ केला तेथपर्यंतच्या मधल्या चाळीस बेचाळीस वर्षांच्या कालखंडात जांभेकर, भाऊ महाजन, लोकहितवादी, रामकृष्ण विश्वनाथ, विष्णुबुवा ब्रह्मचारी, बाबा पदमनजी यांच्यासारखे महत्त्वाचे निबंधकार झाले. या सर्वांनाच आपल्या मागासलेल्या समाजाची सुधारणा व्हावी असे उत्कटत्वाने वाटत होते ही सुधारणा व्हावी यासाठी आपल्या मृतप्राय बांधवांना नवविचारांचे संजीवन देण्याची अपार तळमळ लागून राहिली होती ' म्हणोन ही गोष्ट दिवसानुदिवस अधिक आवश्यक होत आहे की, या देशाचे लोकांना आपले लव संसारोपयोगी ( विद्या- ) कलाकौशल्याकडे द्यावें, त्यांचे व्यवहारांत उपयोग कसे होतात तें शिकावें, आणि सारांश, ज्या गोष्टींनी युरोपियन लोक या देशचे लोकांपेक्षां श्रेष्ठता पावले आहेत, आणि ज्या गोष्टी नाहीत म्हणोन या देशाची इतकी दुर्दशा झाली, त्या सर्व त्यांणीं साध्य कराव्या '[1] ' माझा मागणे सर्व लोकांस आहे की, मी जे लिहिले आहे त्याचा विचार करून पाहा तुमच्या चांगल्यावाचून त्या लिहिण्याचा हेतु नाही माझी उत्कट

...

तमोयुगाच्या कारणमीमांसेपेक्षा अव्वल इंग्रजीतील नवजागरणाचे समालोचन हे अधिक महत्त्वाचे आहे

१ दर्पण, २४ आगस्ट १८३२.

तुमच्या सुधारण्याकडे फार आहे. माझें अंतःकरण सर्व तिकडे आहे. तुमच्या चुक्या वगैरे उघड करून दाखविण्यांत तुम्हांस रागरोष येईल हें मी मनांत आणीत नाहीं [1]; 'या निबंधकत्यास असें वाटतें की, ह्या देशांत जेव्हां परोपकाराचीं, दयेचीं, देशकल्याणाचीं, विद्यावृद्धीचीं व सद्धर्म–प्रसाराचीं मोठालीं कामे होऊं लागतील तेंच पुढें सण होऊन बसतील.'[2] यासारख्या उद्‌गारावरून ऐहिक अभिवृद्धीविषयी, आत्मिक उन्नतीविषयी या काळातील निबंधकारांना किती तळमळ वाटत होती हे स्पष्ट होईल, व समाजाच्या अंतःकरणास हळूवारपणेच हात घालण्याचा प्रयत्न ते कसा करीत होते हेही लक्षात येईल.

अर्थात आपण ज्या सुधारणा सुचवितो त्यांचा अंधस्वीकार जनांनी करावा असे या निबंधकारास कधीही वाटलेले नाही. उलट, आपण ज्याप्रमाणे आपल्या बुद्धीच्या बळावर ज्ञानाची व सुधारणांची क्षेत्रे आक्रमिण्याचा प्रयत्न करीत आहोत, त्याप्रमाणे या लोकांनीही आपल्या बुद्धीचा कस लावण्यास शिकावे असा आग्रह या निबंधकारांनी धरलेला दिसतो. 'शोध व विचार यापासून उपयोगी फळें होतात, वस्तु आपापले वास्तविक रूपानें दिसतात, त्यांचे गुण समजतात, प्रतिदिवस आणि प्रतिपक्ष नवें ज्ञान काहीं तरी माहीतगारी करून देतात, आणि तेथून नवीं सुखें आणि शुद्ध आनंद प्राप्त होतात.'[3], 'आणि जर कदाचित् (परमुलुखात जाऊं नये) असा शास्त्राचा अर्थ असला, तर ती शास्त्राज्ञा मानण्याची काहीं जरूर नाहीं, जा वेळेस तें शास्त्र झालें, त्या वेळेस दुसरे लोक इकडे आले नव्हते. याजमुळे तें शास्त्र योग्य, पण आताचे अवस्थेंत तें मानून मूर्खाप्रमाणे उगाच बसणें, याचें कारण काय ?. . तेव्हां आपण पलीकडे जाण्याचें कामीं शास्त्र एकीकडे ठेवलें, तरी चिंता नाहीं, असें मला वाटतें,'[4] 'तर केवळ त्याजवर विश्वास ठेवूं नये ईश्वरानें आपणास बुद्धि दिली आहे तिच्या योगानें विचार करावा.'[5] यासारख्या विधानांवरून, या काळातील निबंध

१. शतपत्रें–पृ. ३.

२. हिंदु लोकांच्या सणांविषयीं निबंध – बाबा पदमनजी, प्र० ३.

३. दर्पण, २ मार्च १८३२.

४. शतपत्रे पृ १७.

५. हिंदु लोकांच्या सणांविषयीं निबंध – पुरवणी.

कारांनी स्वत श्रद्धायुगातून बाहेर पडून बुद्धिवादाच्या युगात प्रवेश कसा केला होता आणि आपल्या समाजानेही आपल्याप्रमाणेच बुद्धिनिष्ठ व्हावे असे त्यांना कसे वाटत होते, हे उघड होईल.

याप्रमाणे समाजाच्या पुनरुज्जीवनाविषयीच्या पारतिरूकीने, पण बुद्धिवादाची कास न सोडता या काळातील निबंधकारांनी सर्वांगाच्या सुधारणाचा पुरस्कार केला ' आणि मुख्यत्वे दरिद्र काढावयाचा उपाय करणे, तर आधी राज्य सुधारले पाहिजे याजकरिता हिंदुस्थानचे देशात पार्लमेंट ठेवावें म्हणजे लेकवस्ताक राज्यात सुरू होय, हें सहज दृष्टान्तास येईल ' ( शतपत्रें पृ २६८ ), ' दरिद्र मोडण्यास दुसरा उपाय असा आहे कीं, ब्राह्मण लोकांना इंग्रजांचे देशांचें सामान बंद करावें किंवहुना आपलें सामान त्यास द्यावें, परंतु त्यांचे आपण घेऊ नये ' ( शतपत्रे, पृ २९१ ) याचारख्या सूचना करून लोकहितवादी सारख्यानी राजकीय व आर्थिक सुधारणांचे क्रान्तदर्शी दिग्दर्शन केले असले तरी या कालखंडात राजकीय व आर्थिक सुधारणांचा फारसा विचार केला गेला नाही पाश्चात्य विद्येच्या परिशीलनाने जागृत झालेल्या सुधारकांना सर्वांगीण सुधारणेची आवश्यकता पटली असली तरी, समाजस्थिती लक्षात घेता, प्रथमत शैक्षणिक, सामाजिक व धार्मिक सुधारणा करणेच अवश्य आहे असे वाटल्यामुळे या प्रकारच्या सुधारणांचा पुरस्कार करणारे लेखनच त्यांनी अधिक केलेले आहे ' विद्या हे मूळ आहे ', ' सत्कृत विद्या आणि इंग्रजी विद्या,' ' स्त्रीशिक्षण, ' ' पुनर्विवाह, ' ' चार वर्णांची सांप्रतची स्थिति ', ' धर्मसुधारणा ', ' विधिनिषेधरूप धर्माचें मूळ ', ' बुद्धीने ईश्वर किती कळतो त्याविषयी यासारख्या काही निबंधांची केवळ शीर्षके पाहिली तरी शैक्षणिक, सामाजिक व धार्मिक सुधारणांविषयीच या काळातील लेखकांना कसे अगत्य वाटत होते हे लक्षात येईल. या त्रिविध सुधारणांचे प्रतिपादन करिताना, ' या देशाचे लोकांस विद्येचा उपयोग लवकर समजावा, आणि ज्या (पाश्चात्य) विद्येचा आम्ही दुसऱ्यापासून ( पाश्चात्यविद्येपासून ) भेद करून सांगितला, तिचा तर अगत्य समजावा ', ' केवळ ( अप्रगत ) संस्कृतानेच मनुष्य शहाणा व ज्ञानी होईल, असे नाहीं याजकरिता सांप्रत इंग्रजीत जी जी विद्या भूगोल, खगोल, राज्यनीती इत्यादिक आहेत त्यांचा विचार करावा म्हणजे तुम्हास फार संतोष होईल, ' ' पुरुषास वाटतें कीं, ईश्वराने स्त्री एक जनावरच फक्त

करण्यास दिलें आहे साम्रत आपल्या स्त्रियाव जी अज्ञानाची गाढ निद्रा लागली आहे तींतून जागृत करण्यास त्याच्याजवळ विद्यारूप धन वाढविलें पाहिजे ', ' पुनर्विवाह हिंदु लोकाच सुधारणेचें मूळ आहे, व त्यात निम्मे सुधारणा आहे, ' ' कालमहात्म्यकरून हिंदुधर्माची सुधारणा करणें जरूर आहे. त्याशिवाय या लोकाचा परिणाम लागणार नाहीं. ' ' याप्रमाणें बरोबर चालून प्रतारणा न करणें व कोणास दु ख न देणें हा मुख्यार्थ आहे आणि धर्मांच व शास्त्राचें मूळ विचाराने हेंच कळत ' असे असत्य नवे विचार प्रकट करण्यात आले. हे सर्वच खोल नसले तरी पुष्कळसे पुढारलेले आहेत हे निर्विवाद !

हे विचारप्रकटीकरण सुरुवातीस, जवळजवळ १८५० पर्यंत, स्वाभाविक रीतीने जसें जमेल तसें करण्यात आले त्यात पूर्वनियोजन, रचनाक्रम, शब्द विवेक यातले काहीही नाही याचे कारण, निबंध या वाङ्मयप्रकाराची निश्चित, सुस्पष्ट जाणीवच या आरंभीच्या काळात असलेली दिसत नाही. १८५० नतर मात्र या जाणिवचा उदय झालेला दिसतो, आणि परिणामी या पुढच्या काळातील विचारप्रकटीकरणात विशिष्ट योजना, क्रमबद्धता, औचित्यविवेक याचा आढळ होतो आडव्याघोडपणा कमी होऊन घोटीवपणा येऊ लागलेला दिसतो

अशा रीतीने सुधारणेची तळमळ, बुद्धिवादी दृष्टिकोण, पुरोगामी चिंतन आणि हळूहळू येत गलेला विचारप्रकटीकरणातील रेखीवपणा यातून या अव्वल इंग्रजीच्या काळातील निबंध निर्माण झालेला आहे. यात भावना, विचार व भाषा या दृष्टींनी कच्चे आलेला असला तरी भाववश्यता, एकांगी दृष्टिकोण, विचारांतील अपरिपक्वता, अभिव्यक्तीतील अमार्मिकता अशा काही दोषानी तो काही प्रसंगी कमीही झाला आहे. तथापि उत्कट ध्येयवादित्व, मौलिक विचार, सुसंबद्ध प्रतिपादन, उचित शैली असे विशेष या काळातील लेखनात आढळत असल्यामुळे त्यानी मराठी निबंधरचनेच्या दृष्टीने बरेच मोलाचे कार्य केले असेच म्हणावयास हवे पूर्वनिर्दिष्ट विशेषाचा प्रकर्ष या लेखनात नसला आणि हे सगळे विशेष पुष्कळदा भिन्नभिन्न लेखकात विखुरलेल्या स्वरूपात अस्तित्वात असल्यामुळे त्यात डौलदारपणाचा अभाव असला तरी,

त्या विरोधांचा ( व इतरही विरोधाचा ) प्रकर्ष ज्यात आहे आणि ते सर्व विरोध एकत्रित सलग स्वरूपात अस्तित्वात असल्यामुळे ज्याला मरदार व दौलदार रूप प्राप्त झाले आहे अशा निबंधाच्या अवतारांची पूर्वसिद्धता करण्याचे महत्त्वाचे कार्य अव्वल-इंग्रजीतील निबंधानी केले हे नाकारून चालणार नाही. पाश्चात्य विद्येच्या स्पर्शाने जागृत झालेल्या व नवजागरण करण्यासाठी उद्युक्त झालेल्या सुधारकांनी उद्बोधक व मार्गदर्शक असे जे रेंगन अव्वल इंग्रजीत केले त्याचे निबंधवाङ्मयाच्या दृष्टीने ऐतिहासिक महत्त्व हे असे असाधारण आहे.

## मराठी गद्यामधील सुवर्णयुग

अव्वल इंग्रजीतील निबंधाने मराठी गद्यामधील तमोयुगाचा निरास करण्याचे कार्य केले असे म्हटले तर मालेनंतर निबंधाने मराठी गद्यामध्ये सुवर्णयुग निर्माण करण्याचे कार्य केले असे म्हणणे उचित होईल. १८७४ साली मालाकारांचा उदय झाला तेथपासून १९२० साली ' केसरी 'कारांचा-' लोकमान्य 'चा-अस्त झाला येथपर्यंतच्या मधल्या कालावधीत अनेक बलवान बाहूंनी हे युगनिर्मात्याचे अद्वितीय कार्य केले. या बाहूंत जसे विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे अकुतोभय, आक्रमक बाहू आहेत, तसे लोकमान्य टिळकांचे आत्मप्रत्ययसंपन्न, आव्हानप्रद बाहू आहेत, जसे आगरकरांचे बुद्धिवादाचे वज्र पेलणारे बाहू आहेत, तसे शिवरामपंत परांजप्यांचे अलंकारांच्या अस्त्रांनीत चमत्कृतीची बाहुबले धारण करणारे बाहू आहेत. असे अनेक बाहू या काळात एकत्र आलेले दिसतात. अर्थात हे बाहू युगांतराचे महान् कार्य करू शकले याचे कारण, या बाहूंना तेजोमय मनाबुद्धीकडून प्रेरणा मिळाली होती ( व मिळत होती ), दूरदृष्टी, दिव्य ज्ञानचक्षूकडून त्यांना दिग्दर्शन होत होते, हेच होय. थोडक्यात सांगावयाचे तर बुद्धिबल व बाहुबल, शास्त्रबल व (शब्दरूपी) शस्त्रबल या दोहोंच्या एकत्रीकरणातूनच युग निर्माण झाले. हे कसे घडून आले हेच आता पाहावयाचे आहे.

' अव्वल इंग्रजी 'मधील काळाला कलाटणी देणाऱ्या व्यक्ती कितीही थोर असल्या तरी त्यांच्या व्यक्तित्वापेक्षा त्यांच्यानंतरच्या काळातील युगप्रवर्तक

पुरुषश्रेष्ठाच्या विभूतिमत्त्वाचे तेज हे अधिक प्रखर व अधिक देदीप्यमान दिसते. या पुरुषश्रेष्ठांनी स्वातंत्र्य-यज्ञाच्या स्थंडिलावर स्वार्थसर्वस्वाचे समर्पण केलेले असल्यामुळे, पारतंत्र्याविषयी तीव्र असंतोष यांच्या अंतरंगात धुमसत असल्यामुळे स्वातंत्र्याची दुर्दम्य आकांक्षा यांच्या अंतरात्म्यात उदित झालेली असल्यामुळे, या आकांक्षेच्या पूर्तीसाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करण्याची जिद्द यांच्या चित्तात असल्यामुळे यांच्या विभूतिमत्त्वाभोवती एक वेगळेच द्युतिमान वलय उत्पन्न झालेले दिसते. उग्र निःस्पृहता, असामान्य तत्त्वनिष्ठा, अनंत ध्येयप्रीती, पराकोटीचा आत्मविश्वास, अतुल धैर्य, अदम्य आशावादित्व, असाधारण युयुत्सु, विजिगीषु वृत्ती अशा गुणसंपदेमुळे या वलयाला दिव्य रूप प्राप्त झालेले दिसते. यांची ज्वलंत राष्ट्रनिष्ठा, यांचा उज्ज्वल स्वाभिमान, यांच्या ठायी असलेली धगधगती स्वातंत्र्य-लालसा, यांच्या मनातील समाजसुधारणेची उसळती उत्कटा यामुळे या दिव्य वलयाची प्रभा वर्धिष्णू झालेली दिसते. या प्रभेने ज्यांचे जीवित उजळून निघालेले आहे, अशा भास्वर व्यक्ती या काळात महाराष्ट्रात एकसमयावच्छेदाने अवतरल्या ही अपूर्व गोष्ट होय. पण याहून एक अपूर्व गोष्ट या काळात घडल्याचे निदर्शनास येते. ती गोष्ट म्हणजे या व्यक्तींच्या चैतन्यमय अमृतवचनांतून झालेला राष्ट्राच्या अस्मितेचा आविष्कार ही होय. एखाद्या जागृत ज्वालामुखांतून रसरसलेला लाव्हा उफाळून यावा, त्याप्रमाणे या व्यक्तींच्या चिंतन मनांतून हा उदात्त राष्ट्रीय अहंतेचा उद्रेक झालेला दिसून येतो. ज्वालामुखीचा स्फोट प्रथमतः विध्वंसक असला तरी अन्ततोगत्वा त्या फलदायी असतो, तसाच हा अहंतेचा उद्रेकही प्रारंभी काही जणांना विघातक वाटला तरी अखेरीस तो राष्ट्राचे संपोषण व संवर्धन करण्यास कारणीभूत झाल्याचेच दृग्गोचर होते. अस्मिता जागृत झाल्यानंतर तिचा आविष्कार ज्या उत्स्फूर्त निबंधांतून झाला त्या निबंधांनी राष्ट्रपोषणाचे व संवर्धनाचे हे कार्य मनस्वी प्रमाणाने १९२० पर्यंत अव्याहत केले. तेजोगर्भ अस्मितेच्या उदरातून या निबंधांचा जन्म झाल्यामुळे तेजःपुंज कांती त्यांना लाभली, तर लाख मोलाचे राष्ट्रीय कार्य करण्याचे व्रत विचलित न होता त्यांनी पार पाडल्यामुळे ती कांती द्विगुणित झाली. असे तेजःपुंज, कांतिमान निबंध १८७४-१९२० या काळात निर्माण झाल्यामुळेच या काळातील मराठी

**गद्यामध्ये सुवर्णयुगाचा आविर्भाव होऊ शकला.** या आविर्भावाचे रहस्य कळण्यासाठी या काळातील निबंधाचे मूळ कळणे जसे अवश्य तसेच या निबंधाचे कार्य कळणेही अवश्य. मूळ आपण पाहिले, आता कार्याचा परामर्श घेऊ : 'प्रमेयाचीं उद्यान' या निबंधानी कशी फुलविली, 'विवेकवेलींची लावणी' कशी केली, 'साहित्य सोनियाच्या' निर्झरिणींच्या साह्याने या वेलींची बहार कशी वाढविली, या उद्यानाची शोभा कशी वृद्धिंगत केली ते पाहू.

अव्वल इंग्रजीमधील निबंधाने जसे वैचारिक क्रांती घडविण्याचे कार्य केले तसेच विचारप्रवर्तन करून खोल मानसिक क्रांती घडविण्याचे दुर्घट कार्य यानंतरच्या निबंधानी केले असले तरी ते अधिक व्यापक प्रमाणावर, अधिक तात्त्विक स्वरूपात व अधिक स्फूर्तिदायक रीतीने त्यानी केले. अगोदर जागृती झालेली असूनही पुष्कळांच्या मनोवृत्तीत जी स्वत्वशून्य भावना होती ती भावना निरस्त करणे, बुद्धीवर जो अतिरिक्त इंग्रजनिष्ठेचा प्रभाव होता तो नष्ट करणे आणि मनात स्वाभिमान निर्माण करणे, बुद्धीवर राष्ट्रनिष्ठेचे संस्कार करणे अवश्य होते. हे अतीव महत्त्वाचे कार्य विष्णुशास्त्री चिपळूणकर यानी 'निबंधमाले'च्या साह्याने प्रथम केले. आपल्या राष्ट्राच्या अंगात दृढमूल झालेल्या दोषाचे दर्शन त्यानी घडविले असले तरी त्याचा परिणाम राष्ट्राचा तेजोभंग होण्यात, लोकात न्यूनगंड उत्पन्न होण्यात होऊ नये म्हणून त्यानी कमालीची दक्षता बाळगलेली दिसते; उज्ज्वल परंपरेच्या वर्णनाची जालीम मात्रा, दोषदर्शनावरील उतारा म्हणून, दिलेली दिसते. किंबहुना परंपरेचे स्फूर्तिदायी चित्र रेखाटणे, परंपराचित्रण करून राष्ट्राचे उद्बोधन करणे, उत्साहवर्धक संदेश देणे हेच आपले जीवितकार्य चिपळूणकरानी ठरविलेले दिसते आणि स्वभाषा, स्वधर्म, स्वेतिहास यांचा मुक्त कंठाने गौरव करून, आपल्या 'पूर्वदिव्या'विषयी अभिमानाने बोलून व 'रम्य भावी काल'-विषयी आत्मविश्वासयुक्त उद्गार काढून आपले कार्य यथासांग पारही पाडलेले दिसते. (मराठी भाषेची सांप्रतची स्थिती, इतिहास, लोकहितवादी, आमच्या देशाची स्थिती, हे निबंध पाहा.) चिपळूणकरानी जे कार्य करण्यासाठी आपले आयुष्य खर्च केले, तेच मानसिक क्रांतीचे कार्य अधिक ठामपणे व सखोलपणे करण्यासाठी लोकमान्य टिळकानी आपले तनमन झिजविले. निष्क्रिय लोकांना कार्यप्रवण करण्याच्या हेतूनेच त्यानी 'केसरी'तून लेख लिहून परंपरावादाचा

प्रभावी पुरस्कार केला, राष्ट्राच्या कानाकोपऱ्यापर्यंत प्रचार केला व लोकशक्ती संघटित केली. सनातन शुद्ध धर्म, अद्वैत सिद्धान्त व प्रवृत्तिपर कर्मयोग या तत्त्वत्रयीवर आधारलेल्या 'स्वाभिमानी राष्ट्रवादा'चेच पुन पुन्हा प्रतिपादन करून राष्ट्रनिर्मितीचे व संघटनेचे महत्कार्य त्यांनी केले. 'लोक हे राखता राजी, सर्व राजीच होतसे' अशी रामदासाप्रमाणेच लोकमान्यांचीही धारणा असल्या मुळे 'सर्व ही पेरणे विद्या, लोकामध्ये हळूहळू' या समर्थांच्या वचनानुसार त्यांनी निर्भेळ स्वदेशप्रीतीचा, निर्भय देशभक्तीचा राष्ट्रीय गुण म्हणून उद्घोष करून राष्ट्रभावनेचे पोषण केले, परंपरागत संस्कृतीच्या अधिष्ठानावर आरूढ होऊन, स्वदेशी, बहिष्कार, स्वराज्य, राष्ट्रीय शिक्षण या चतुःसूत्रीचा मंत्र जागार करून असंतोषाचा स्फोट घडविणारे स्फुरणशील राजकारण त्यांनी केले, आणि परकीय सत्तेच्या बालेकिल्ल्यास हादरून टाकणारे दृढ राष्ट्रत्व निर्माण केले. (सामाजिक सुधारणेचे मार्ग, जूट, दुराग्रही सरकार आणि निर्बल लोक मत, राष्ट्रीय महोत्सवाची आवश्यकता, सुशिक्षितांनी काय केले पाहिजे ? स्वराज्य आणि सुराज्य, राष्ट्रीय बहिष्कार, हे निबंध पाहा) लोकमान्यांनी ज्या बैठकीवरून, हे काय केले त्याच बैठकीवरून, पण तात्त्विक विवेचन न करता, व्यावहारिक तपशील न मांडता, पारतंत्र्याविषयी त्वेष निर्माण करण्याचे, परकीय दास्याविषयी प्रक्षोभ उत्पन्न करण्याचे निर्भेळ स्वातंत्र्यभावनेचा परिपोष करण्याचे व जहाल राजकीय क्रांतीच्या तत्त्वज्ञानाचा प्रचार करण्याचे प्रचंड काम शिवरामपंत परांजपे यांनी 'काळातील निवडक निबंध' लिहून केले. (दिल्लीचे तख्त आणि भाऊसाहेबांचा घण, शिवाजींची एक रात्र, रामदासाच्या शब्दात स्वराज्यासाठी प्रार्थना, ग्रीस देश स्वतंत्र कसा झाला ? हे निबंध पाहा.) परांजपे यांच्या 'काळा'तील निबंधांनी प्रामुख्याने भावनोत्तेजनाचे काम जरी असले तरी राष्ट्रीय पातळीवरून ते केलेले असल्यामुळे त्याला विकृत भावनाद्दीपनाचे रूप आलेले नाही, उलट उदात्त स्वातंत्र्यसूक्ताचे रूप आले आहे.

अशा रीतीने एकीकडे राष्ट्रीय पातळीवरून राजकीय दृष्टीने स्वातंत्र्य सूक्ताचे उद्गान केले जात होते, त्याच वेळी दुसरीकडे राष्ट्रीय पातळीवरूनच, पण सामाजिक दृष्टीने, सामाजिक क्रांतीच्या ऋचांचा उच्चार केला जात होता. हा उच्चार 'सुधारका'च्या मुखाने गोपाळ गणेश आगरकर हे करीत होते

स्त्रीजीवन शुष्क करून टाकणाऱ्या जीर्ण रूढींचे खंडन करून स्त्रीस्वातंत्र्य, स्त्रीशिक्षण आदि गोष्टींचे मंडन त्यांनी आग्रहाने केले असले तरी त्यांना अभिप्रेत असलेली सामाजिक क्रांती ही एवढ्यापुरतीच संकुचित नसून सर्वस्पर्शी होती. अशा व्यापक क्रांतीचा घोष आगरकरांनी निर्भयपणे केला याचे कारण, ऐहिक अभिवृद्धी, स्वातंत्र्य, समता, बुद्धिवाद या मूल्यांचे सबल तात्त्विक अधिष्ठान तिला होते आणि आपल्या बुद्धीच्या निकषावर मूल्यांची परीक्षा करूनच ते त्यांनी निश्चित केले होते. आगरकरघोषित ऐहिक अभिवृद्धी शारीर सुखोपभोगापुरतीच मर्यादित नसून उच्चतर आत्मिक सुखोपभोगाचाही अंतर्भाव तिच्यात करण्यात आलेला होता, स्वातंत्र्याचा अर्थ (अनिर्बंध स्वैराचार हा नसून) जीवनाच्या सर्व अंगांना स्पर्श करणारा होता, समतेची विचारही अशीच समावेशक होती आणि बुद्धिवाद हाही सर्वंकष होता. अशा या व्यापक पायावर उभे राहूनच आगरकरांनी क्रांतीचा ध्वज उभारला होता. पाश्चात्त्य संस्कृती आत्मसात केल्याशिवाय भारतीय संस्कृतीस तरणोपाय नाही असे त्यांचे स्पष्ट मत असल्यामुळे पाश्चात्त्य संस्कृतीचे स्वागत करण्यासाठीच हा क्रांतीचा ध्वज त्यांनी उभारला होता. पाश्चात्त्य संस्कृतीचा स्वीकार करताना भारतीय संस्कृतीच्या पृथगात्म प्रकृतीस धक्का लागणे त्यांना मान्य नसले, तरी धक्काच लागू नये म्हणून पाश्चात्त्य संस्कृतीची उपेक्षा करणे हे तर त्यांना मुळीच संमत नव्हते. आगरकरांची ही भूमिका, पुरोगामी विचारसरणी पायाशुद्ध होती, म्हणूनच ते तिचा पाठपुरावा धाडसाने करीत होते. त्यांची पाश्चात्त्यनिष्ठा ही राष्ट्रनिष्ठेवर आधारलेली असल्यामुळेच 'इष्ट असेल ते बोलणार' असे उद्गार ते बेगुमानपणे काढत होते. विवेकनिष्ठ हे परममूल्य त्यांनी मानलेले असल्यामुळे राष्ट्रवाद हाही विवेकनिष्ठ असावा असा आग्रह ते धरत होते. (स्त्रियांना शिक्षण देण्याची आवश्यकता, सुधारणा आणि सल्ला, सुधारक काढण्याचा हेतु, तरुण सुशिक्षितांस विज्ञापना, इष्ट असेल ते बोलणार, आपले काय होणार? गुलामांचे राष्ट्र, हे निबंध पाहा)

याप्रमाणे 'स्वाभिमानी राष्ट्रवाद' व 'विवेकनिष्ठ राष्ट्रवाद' अशा दोन तत्त्वप्रणालींचा प्रचार करून, महाराष्ट्राच्या वैचारिक पिंड पुष्ट करण्याचे, महाराष्ट्रात आमूलाग्र मानसिक क्रांती घडविण्याचे व राष्ट्रोत्थानाची प्रक्रिया यशस्वी करण्याचे महान कार्य १९२० पर्यंतच्या कालखंडातील

उपयुक्त थोर निबंधकारांनी आपल्या निबंधाच्या साह्याने करावे हे कार्य व्हावेच, असे त्यांना उत्कटत्वाने वाटत असल्यामुळे त्यांनी केलेले तत्त्वप्रतिपादन स्वाभाविकपणेच कमालीचे प्रभावी झाले. हा प्रभाव, या सर्वच लेखकांच्या मुद्दाम, आवेशयुक्त, आक्रमक, आव्हानप्रद, डौलदार, दणदार शैलीमुळे अधिकच वाढला. मर्मभेदक कोटिक्रम, बोचक उपरोध, जहाल उपहास, निश्चयात्मक, निर्भीड, जयिष्णु उपपादन, ओजस्वी वक्तृत्व गुण यामुळे प्रतिपक्षाला सपशेल चीत करण्याचे आणि मुद्दाम स्वपक्षीयाला हाक देण्याचे सामर्थ्य त्यात आले. मुळातील अर्थगौरव, विचारगांभीर्य निःसंदिग्ध, समृद्ध भाषा धारदार, पल्लेदार वाक्ये दाहक व्याजोक्ती, कोमल काव्यमयता रम्य कल्पकता, समर्पक निर्देशपूर्णता इत्यादी अन्य विशेषांमुळे मूळची समर्थ शैली अधिकच आकर्षक व उत्तेजक झाली. स्वाभाविकच तत्त्वप्रतिपादन प्रभावी व प्रत्ययकारक झाले.

आतापर्यंतच्या विवेचनावरून, १९२० पर्यंतच्या काळात जे निबंधकार झाले त्यांची व्यक्तित्वे ही तेजोभास्कराची व्यक्तित्वे कशी होती, त्यांचे विचार वजनदार कसे होते, त्यांचे प्रतिपादन भारदस्त कसे होते, त्यांची शैली प्रभावी कशी होती आणि या सगळ्यामुळे त्यांच्या निबंधात परिणामकारकता कशी उत्पन्न झाली होती, हे सहज स्पष्ट होईल. अनेक गुणांचा समुच्चय या काळातील निबंधात झालेला असल्यामुळे हा निबंध भरदार व डौलदार कसा झाला हे सहज लक्षात येईल. या निबंधाच्या स्वरूपाचे, त्याच्या कार्याचे व त्याच्या परिणामाचे थोडक्यात वर्णन करावयाचे झाले तर ते ज्ञानदेवांच्या भाषेत असे करिता येईल––

> तर्कांचि आइका आणीक एक । एथून शास्त्रीं सच्छास्त्रिक ।
> आणि महाबोधीं कोवळीक । दुणावली ॥
> एथ चातुर्य शहाणे झाले । प्रमेय रुचीस आले ।
> आणि सौभाग्य पारुखे । सुखाचे एथ ॥ *

ज्ञानेश्वरांनी महाभारताचे वर्णन करताना या ओव्या लिहिल्या असल्या तरी त्यात विशेष फरक न करता, १९२० पर्यंतच्या निबंधाचे वर्णन करतानाही त्यांचा उपयोग केल्यास तो अन्वर्थकच होईल. **असा हा विचाराचे**

* ज्ञानेश्वरी, अध्याय १ ला, ओव्या – ३४, ३५ (दांडेकर प्रत)

वैभव वाढविणारा, भाषेचे ऐश्वर्य समृद्ध करणारा, राष्ट्राच्या भाळी सौभाग्याचा तिलक लावणारा निबंध या काळात झाल्यामुळेच मराठी गद्याचे दालन अपूर्व तेजाने विलसू लागले आणि म्हणूनच, या काळातील निबंधाचे ऐतिहासिक दृष्टीने समालोचन करताना, या निबंधाच्या कार्याचे मूल्यमापन करताना, या निबंधाने मराठी गद्यात सुवर्णयुग निर्माण केले असे म्हणणेच सर्वथैव युक्त होय (हे युग प्रामुख्याने ज्यांच्या निबंधामुळे निर्माण झाले त्या चिपळूणकरादिकांचाच विचार येथे केला आहे. केळकर, भारताचार्य वैद्य, इतिहासाचार्य राजवाडे, राजारामशास्त्री भागवत, अच्युतराव कोल्हटकर यांचे लेखन महत्त्वाचे असले तरी स्थलसंकोचास्तव व विस्तारभयास्तव त्यांचा परामर्श घेतलेला नाही.)

## वैभव वाढविण्याचा प्रयत्न

१९२० नंतर आणखी पाचच वर्षांनी मराठीमध्ये लघुनिबंधलेखन विपुल प्रमाणावर व विविध प्रकारांनी सुरू झाले आणि वृत्तपत्रांतील अग्रलेखांना अगोदर मिळालेले मानाचे व प्राधान्याचे स्थान हळूहळू याही निबंधांना मिळू लागले. यावरून एक निष्कर्ष काढण्याचा मोह होणे अगदी शक्य आहे की, लघुनिबंधांनी तात्त्विक निबंधांवर आक्रमण केले व त्यांना हतप्रभ करून टाकले. १९२० नंतर तात्त्विक निबंधाचे वैभव पूर्वीपेक्षा क्रमशः दिवसेंदिवस कमी होऊ लागले आणि लघुनिबंधाचे लावण्य चंद्राच्या कलेप्रमाणे दिनानुदिन प्रकर्षास येऊ लागले हे खरे असले तरी हा एक योगायोग होय. लघुनिबंधामुळे तात्त्विक निबंध मागे पडले असे एकदम विधान करणे जरा साहसाचेच होईल असे वाटते आणि दुसरे असे की, निबंध मागे पडला असे म्हणण्यापेक्षाही तो वेगळ्या मार्गांनी वाटचाल करू लागला व वेगळ्या स्वरूपात अवतरू लागला असे म्हणणेच सत्यास अधिक धरून होईल. १९२० नंतर झालेल्या निबंधांतील या परिवर्तनाचे वर्णन करताना ल. रा. ना. देशपांडे यांनी जे म्हटले आहे ते या संदर्भात लक्षात घेण्याजोगे होय. श्री. देशपांडे म्हणतात,० "लघु

० आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास भाग २ रा पृ. ३१२, ६९०, ६७४.

उपर्युक्त थोर निबंधकारानी आपल्या निबंधाच्या साह्याने केले. हे कार्य व्हावेच, असे त्याना उत्कटत्वाने वाटत असल्यामुळे त्यानी केलेले तत्त्वप्रतिपादन स्वाभाविकपणेच कमालीचे प्रभावी झाले. हा प्रभाव, या सर्वच लेखकाच्या मुद्दाम, आवेशयुक्त, आक्रमक, आव्हानप्रद, ठोस्दार, दणदार शैलीमुळे अधिकच वाढला. मर्मभेदक कोटिक्रम, बोचक उपरोध, जहाल उपहास, निश्चयात्मक, निर्भीड, जयिष्णु उपपादन, ओजस्वी वक्तृत्व गुण यांमुळे प्रतिपक्षाला सपशेल चीत करण्याचे आणि मुर्दाड स्वपक्षीयाला झटका देण्याचे सामर्थ्य त्यात आले. मुळातील अर्थगौरव, विचारगांभीर्य, नि संदिग्ध, समृद्ध भाषा, धारदार, पल्लेदार वाक्ये, दाहक व्याजोक्ती, कोमल काव्यमयता; रम्य कल्पकता, समर्पक निर्देशपूर्णता इत्यादी अन्य विशेषामुळे मूळची समर्थ शैली अधिकच आकर्षक व उत्तेजक झाली. स्वाभाविकच तत्त्वप्रतिपादन प्रभावी व प्रक्षोभक झाले.

आतापर्यंतच्या विवेचनावरून, १९२० पर्यंतच्या काळात जे निबंधकार झाले त्यांची व्यक्तित्वे ही तेजोभास्कराची व्यक्तित्वे कशी होती, त्यांचे विचार कसदार कसे होते, त्यांचे प्रतिपादन भारदस्त कसे होते, त्यांची शैली प्रभावी कशी होती आणि या सगळ्यामुळे त्यांच्या निबंधात परिणामकारकता कशी उत्पन्न झाली होती, हे सहज स्पष्ट होईल. अनेक गुणांचा समुच्चय या काळातील निबंधात झालेला असल्यामुळे हा निबंध भरदार व डौलदार कसा झाला हे सहज लक्षात येईल. या निबंधाच्या स्वरूपाचे, त्याच्या कार्याचे व त्याच्या परिणामाचे थोडक्यात वर्णन करावयाचे झाले तर ते ज्ञानदेवाच्या भाषेत असे करिता येईल––

> तेवींचि आइका आणीक एक । एथून शब्दश्री सच्छास्त्रिक ।
> आणि महाबोधी कावळीक । दुणावली ॥
> एथ चातुर्य शहाणे झाले । प्रमेय रुचीस आले ।
> आणि सौभाग्य पाटले । सुखाचे एथ ॥ *

ज्ञानेश्वरानी महाभारताचे वर्णन करताना या ओव्या लिहिल्या असल्या तरी त्यात विशेष फरक न करता, १९२० पर्यंतच्या निबंधाचे वर्णन करतानाही त्याचा उपयोग केल्यास ते अन्वर्थकच होईल. असा हा विचाराचे

---

* ज्ञानेश्वरी, अध्याय १ ला, ओव्या – ३४, ३५. (दांडेकर प्रत.)

मोठ्या निबंधकारांनी १९२० पूर्वीच्या महापर्वाच्याद्वारे निबंधलेखन सधन केलेले नसले तरी त्या लेखनाने गृहीत धरलेले वैभव वेगळ्या वाटा चोखाळून वाढविण्याचा प्रयत्न आपापल्या परीने निश्चित केला आहे.

## ही भीती कशासाठी ?

याप्रमाणे १९२० नतरच्या कालखंडातही भावपर निबंधकार झाले असले आणि विचारप्रधान निबंध भिन्नभिन्न स्वरूपात लिहिले गेले असले तरी साकल्याने विचार करता १९२० पर्यंत किंवा त्यानंतर आणखी काही काळपर्यंत निबंधवाङ्मयास जी अपार भरती आलेली होती, ती पुढील काळात ओसरून मंद गतीने ओहोटीच सुरू झालेली दिसते. नव्या पिढीतील दमदार निबंधकार अपवादात्मक रीतीनेच दृष्टोत्पत्तीस येत असल्याने ही ओहोटी अधिक वेगाने सुरू होऊन ती कायमचीच ओहोटी ठरेल की काय अशी शंका मनात येते. ही अवस्था समाधानकारक निश्चितच नाही १९२० नतरच्या काळातील मराठी निबंधाचे पर्यालोचन करणाऱ्या डॉ. अ. ना. देशपांडे, श्री. वि. स. खांडेकर, डॉ. प्र. न. जोशी यांच्यासारख्या ज्येष्ठ लेखकांनी हेच असमाधान व्यक्त केलेले दिसते. "चिपळूणकर–पंचायतनाशी तुल्यबळ ठरेल अशी निबंधकाराची प्रभावी परंपरा नतरच्या मराठी वाङ्मयात उदयास आलेली नाही. .. अनेक लेखकांनी मराठी निबंधवाङ्मयाचे विचारधन आणि भावबळ वाढविण्याचे श्रेय संपादले आहे तरीसुद्धा उपरोक्त पंचायतनाच्या कर्तृत्वावर, तेजस्वितेत आणि परिणामकारकतेत, मात करू शकेल, असे सामर्थ्य हस्तगत करण्याच्या शर्यतीत हा लेखकगण निष्प्रभ ठरलेला आहे.[1]" "चिपळूणकरादिकांनी १८७४–१९२० या काळात जे काय केले ते १९६०–१९७० या काळात आणि तेही अखिल भारतीय दृष्टिकोण ठेवून निबंधकारांना करावे लागेल. ते कार्य करण्याची कुवत असलेले तिशी–चाळिशीतले लेखक अद्यापि फार कमी आढळतात. चिंतन, शैली, जिव्हाळा, द्रष्टेपणा ही आजच्या नव्या–जुन्या निबंधलेखकात अजीबात नाहीत असं नाही. पण आगरकर–केळकरां

१. आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास, भाग २ रा, डॉ. अ. ना. देशपांडे, पृ. ६८८.

जागृतीचे एक झगझगीत, दणदणीत व प्रभावी साधन असे टिळक-आगरकर-परांजपे यांच्या हातीं मराठी निबंधाला जे स्वरूप प्राप्त झाले होते, त्यात प्रस्तुत कालखंडात ( १९२०–१९५० ) बरेच परिवर्तन झाले आहे. एक सावरकरांचा अपवाद वगळता, टिळक-आगरकर परांजपे यांच्या निबंधातली लढाऊ वृत्ती ही १९२० नंतरच्या कालखंडातील निबंधवाङ्मयात क्वचितच दिसेनाशी झाली आहे, पण त्याचबरोबर हेही खरे आहे की, प्रस्तुत कालखंडातील निबंधकारांनी मराठी निबंधाचे वैभव अन्य दिशांनी निश्चित वृद्धिंगत केले आहे. विचारविलास, भावनाविलास आणि कल्पनाविलास या तिन्ही आघाड्यांवर तो आता निश्चित विकासाच्या दिशेने वाटचाल करू लागलेला आहे. प्रस्तुत कालखंडातील निबंधकारांच्या एकंदर निबंधलेखनात विचारप्रधान, कल्पनाप्रधान व भावनाप्रधान या तिन्ही प्रकारांचे आल्हाददायक दर्शन घडण्यासारखे आहे. वा. म. जोशी, ज. स. करंदीकर, पु. ग. सहस्रबुद्धे, ग. वि. केतकर, दादा धर्माधिकारी यांच्या निबंधात मुख्यत विचारविलास आहे, पु. भा. भाव्यांच्या निबंधात कल्पकतेचे गर्भरेशमी वस्त्र परिधान केलेल्या भावनेचे उद्दाम नर्तन आहे. सत्य भूतमात्राविषयीच्या प्रेमाने पावन झालेली व्यापक विचारशीलता ही विनोबा भाव्यांच्या निबंधाची प्रकृती आहे. द. के. केळकरांना आपले प्रगतिशील विचार आकर्षक अलंकारांनी सजविण्याची हौस आहे. माटयांच्या निबंधातील विज्ञाननिष्ठ समाजदृष्टीत स्निग्ध सहृदयता आहे. माडखोलकरांच्या निबंधातील कल्पकता बुद्धिनिष्ठ वळणावर गेली आहे. परमार्थ प्रवण विचाररम्य कल्पना व उदात्त भावना यांचा सुंदर व सौम्य असा त्रिवेणी संगम कालेलकरांच्या निबंधात साकार झालेला आहे. अशा रीतीने या निबंधकारांनी मराठी निबंधाचे विचारात्मक, कल्पनात्मक व भावनात्मक असे त्रिविध सादय यथाशक्ती अभिवृद्ध केले." डॉ. अ. ना. देशपांडे यांच्या या विधानावरून, १९२० नंतर मराठी निबंधाने एक वेगळे वळण कसे घेतले, रुद्रावतार कमी कसा केला, भिन्न रीतीने पदविन्यास कसा सुरू केला हे सर्व सहज स्पष्ट होईल. याचा अर्थ असा की, डॉ. केतकर, स्वातंत्र्यवीर सावरकर, साहित्यसम्राट केळकर, वा. म. जोशी, काका कालेलकर, प्रा. श्री. म. माटे, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, प्रा. द. के. केळकर, ज. स. करंदीकर, ग. वि. केतकर, प्रा. न्य. रा. शेणोलीकर, ग. त्र्य. माडखोलकर, पु. भा. भावे यांच्यासारख्या

निर्धास्त असावे!' असा दिलासा सचिन असलेल्या निबंधकारांना व पर्यायाने आपल्या राष्ट्रनायकांना द्यावा.

तरुण मित्रांनो! हा पुरुषार्थ करावा असे तुम्हास वाटते काय? वाटत असेल तर आतापर्यंत केलेल्या विवेचनाचे विस्मरण होऊ देऊ नका! निष्काळजीपणे आळसात काळ घालवून आपल्याच हाताने आपल्या विनाशाचे बीजारोपण करू नका!! आमच्या एका ज्येष्ठ निबंधकाराने केलेले (पुढील) आवाहन व्यर्थ जाऊ देऊ नका!!!

"... **आज आपण निबंध साहित्याचे अतुल सामर्थ्य ध्यानात घेणे अगत्य आहे.** भावी काळाची घडण करण्याची आकांक्षा आपण धरली आहे. आणि त्या दृष्टीने ग्रंथ ही एक मोठी शक्ती आहे हे जगाच्या इतिहासावरून आपणास दिसत आहे. भारताच्या लोकशाहीच्या प्रगतीसाठी या शक्तीची उपासना करणे तर फारच अवश्य आहे. आर्थिक समता, सामाजिक समता यांची प्रस्थापना आपणास करावयाची आहे. राष्ट्रनिष्ठा जनमनात दृढमूल करावयाची आहे. व्यक्तिस्वातंत्र्याची अभिरुची निर्माण करावयाची आहे. विवेकनिष्ठा, बुद्धिप्रामाण्य यांचे खोल संस्कार करावयाचे आहेत. व्यक्तिस्वातंत्र्य देऊनही औद्योगीकरण करण्याचा अभिनव प्रयोग – जगात आजपर्यंत न झालेला प्रयोग करावयाचा आहे. हे सर्व काय निबंध–प्रबंध–ग्रंथ यावाचून कसे होणार? इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स, जर्मनी इत्यादी देशांतील ज्या ग्रंथकारांचा वर उल्लेख केला तसे ग्रंथकार येथे निर्माण झाले, तरच ग्रंथसंपत्ती या देशाला लाभली तरच आपली लोकशाही यशस्वी होण्याचा संभव आहे.

'जो ग्रंथ नष्ट करतो तो परमेश्वराची मूर्तीच अशी जणू जी बुद्धी तिचा नाश करतो.' असे मिल्टन म्हणाला. हे जर खरे तर, 'जो ग्रंथ निर्माण करतो तो परमेश्वराच्या मूर्तीचीच प्रत्येक व्यक्तीच्या चित्तात स्थापना करतो,' असे म्हणणे यथार्थ नाही काय?"[1]

* * *

१. निबंधरचना आणि राष्ट्ररचना–'पराधीन सरस्वती'–डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, पृष्ठ–३३.

सारख्या या गुणाचा मुरेख सगम कुणातही सहसा आढळत नाही.[१] " "अगदी अलीकडच्या काळात विचारगाभीर्याने नटलेले निबध मराठी साहित्यात दुर्मिळ होत चालले आहेत. मराठी साहित्याचे हे एक गौरवशाली अग आज आक-सुन गेल्यासारखे दिसत आहे."[२] या विधानावरून उपर्युक्त असमाधान सार्वत्रिक कसे आहे हे सहज स्पष्ट होईल. असेच असमाधान अन्य भारतीय भाषातील निबधाविषयी असेल तर भारताच्या भवितव्याच्या दृष्टीने हे चिंताजनक आहे. उत्कृष्ट निबधसाहित्य निर्माण होत नाही याचा अर्थ, मनाने आपण मृत होत आहो. वैचारिक वैकल्य आपल्याला येत आहे, असा होतो. आणि हे भावी अनर्थाचे दुश्चिन्हच होय. हा अनर्थ टाळावयाचा असेल तर नव्या जोमाच्या तरुणानी मनाने जिवत होणे अवश्य आहे, आपली बुद्धी अभ्यासाने तरतरीत व तीक्ष्ण करणे अवश्य आहे, वैचारिक विकलता नष्ट करणे अवश्य आहे, समाजाच्या-राष्ट्राच्या उत्कर्षाविषयी चितन करणे अवश्य आहे, उत्कृष्ट निबधाच्या रूपाने त्याचा आविष्कार करणे अवश्य आहे. उदयोन्मुख तरुणाना हे जे आव्हान आहे ते स्वीकारण्याची व त्याला खणखणीत प्रत्युत्तर देण्याची उभारी त्याच्या मनाला यावी या हेतूनेच १९२० नतरच्या काळातील निबध-काराचे महर्षि वि. रा. शिदे, स्वातन्त्र्यवीर सावरकर, प्रा. श्री. म. माटे, प्रा. द. च. कळस्कर व प्रा. डॉ. पु. ग सहस्रबुद्धे याचे काही निबध प्रस्तुत सग्रहाच्या रूपाने तरुण पिढीच्या समोर ठेवले आहेत.

**हे सर्वच निबंध वास्तववादी बैठकीवर अधिष्ठित असलेले, व्यापक दृष्टीने राष्ट्राच्या हिताचा विचार करणारे, आपल्या राष्ट्राचा अपकर्ष कशामुळे झाला याची मीमासा करणारे आणि राष्ट्रोत्कर्षा-च्या राजवैद्येची चिकित्सा करणारे असे आहेत.**

या निबधाचा अभ्यास या पिढीने मनापासून करावाच, पण या निमित्ताने निबध या प्रभावी वाङ्मयप्रकाराचा आत्मीयतेने अभ्यास करावा, उत्तम निबधरचना करण्यास शिकावे आणि 'ही भीती कशासाठी? आपल्यामागे आम्ही आहोत! आपली धुरा उचलण्यास आम्ही समर्थ आहोत! आपण

---

१. मराठीतील निबध वाङ्मय-('प्रदक्षिणा')-गं. ब. राडेकर. पृ. ४२२.
२. निबध-शास्त्र व कला-डॉ. प्र. न. जोशी, 'माझे मनोगत' पृ. १

## ३. आपले सामर्थ्य आपणच वाढवावे

इ. स. १९२८ च्या ऑगस्टमध्ये पुण्यास, मुंबई इलाख्याच्या शेतकऱ्यांची जमिनीच्या तुकडे निराला करून विरोध करण्या करिता तातडीने एक मोठी परिषद भरविण्यात आली. त्या वेळी मीच अध्यक्ष होतो. त्यानंतर मी तातडतोड पश्चिम आणि पूर्व खानदेश, नाशिक, उमरावती, नागपूर येथे शेतकऱ्यांच्या सभा भरवून शेतकऱ्यांच्या प्रश्नासंबंधी जागृती करण्याचा प्रयत्न केला. १९३० सालची हकीकत आपल्यास विदितच आहे. जुन्नर, खेड, हवेली, सासवड वगैरे तालुक्यातून जवळ जवळ प्रत्येक खेड्यातून आम्ही हिंडलो. त्यानंतर अहमदनगर व सातारा जिल्ह्यात हिंडलो. विशेषत सातारा जिल्ह्यातील वाळवे तालुक्याची परिषद संघटनेच्या कार्यासाठी बोरगावास भरविली. एकंदरीत महाराष्ट्रातील ह्या सहा जिल्ह्यातील परिस्थिती मला आता प्रत्यक्ष अवगत आहे. शेतकऱ्यात गल्या दोन वर्षांत जरी अभूतपूर्व जागृती घडली आहे, तरी त्यांच्या संघटनेच्या कार्याला अद्यापि व्हावी तशी नुसती सुरुवातही झाली नाही, असे मला स्वानुभवावरून अगदी कष्टाने म्हणावे लागत आहे आणि ह्यापुढे तर दिवसे दिवस हे कार्य अधिक कठीण, स्वार्थत्यागाचे व धाडसाचे होणार, ह्यात मला तर तिळमात्र शंका नाही.

### सरकारी मदतीची अपेक्षाच नको

ह्या कामी तुम्ही आता सरकारच्या मदतीची मुळीच अपेक्षा करू नका, इतकेच नव्हे तर तुमच्या संघटनेला सरकार आणि नोकरशाही संधी मिळेल तेथ करून विरोधच करीत राहील हे तुम्ही गृहीत धरून चालाल तरच बरे. परवा दिल्लीच्या मध्यवर्ती कायदेमंडळात काय घडून आले! तुमच्या हलाखीची नुसती चौकशी करण्याचा ठरावही नोकरशाहीने पायाखाली घातला! लॉर्ड आयर्विनसारखा सज्जन व्हाइसरॉय पुन: मिळणे दुरापास्त आहे! येताना त्याने तुमच्या कल्याणाचा वसा घेतला

असल्याबद्दल बहाणा केला स्वत त्याचीच आता नामुष्की चालली आहे. बहाण्याची काय कथा ? हे असेच होणार. परकीय सरकारने तुम्हाला काय म्हणून द्यावे ? आणि द्याल्याशिवाय कोणत्याही सरकारने काहीच दिले नाही व देणार नाही परकीय सरकारापेक्षा आमच्या संस्थानातील स्वकीय सरकारांनी तर अधिकच ताळ सोडला आहे हे संस्थानिक पुन आपलीच तुंबडी भरण्यासाठी ह्या परकीय सरकारास शरण गेले आहेत ! सुधारण्यासाठी नावाजलेले म्हैसूर संस्थान, तेथील राजा अगदी सच्छील ! महाराज कैलास पर्वताची यात्रा करून परत येतात न येतात तोच, त्यांची राजधानी जी बंगरूर शहर त्या लगतच्याच खेड्यात काय प्रकार घडला ? उपासमारीच्या यातना सहन न होऊन एका शेतकऱ्याने आपल्या बायकोचा व दोन मुलांचा जीव घेऊन स्वत पण आत्महत्या केली व चौघेही जण्या कैलासाला गेले ! पण तेथ तरी दाद त्यांना लागेल काय ? अशी हलाखी किंबहुना त्याहीपेक्षा अधिक हिंदुस्थानात सर्वत्र आहे

## स्वकीय शत्रूपासून सावध राहणे अवश्य

पण खरे पाहता परकीयांना शेतकऱ्यांनी आपले शत्रू काय म्हणून म्हणावे ? शेतकऱ्यांचा हितशत्रू त्याच्या शेजारी त्याच्या दाराशीच उभा आहे तो गावातला जमीनदार असो किंवा शहरातला गिरणीवाला असो, सावकाराच्या रूपाने शेतकऱ्याशी झगडत आहे ! आणि उलट त्यालाच सरकार आणि संस्थानिकांचे लष्कर व पोलीस मिळाले आहेत ! शेतकऱ्यांनी जी संघटना करावी अशी मी ओरड करीत आहे ती सरकारविरुद्ध नव्हे, तर ह्या दाराशी भिडलेल्या हितशत्रूविरुद्धच होय या कामगारांनी जी जगभर स्वसंरक्षणासाठी संघटना चालविली आहे ती सरकारविरुद्ध नव्हे शेतकरी झाला तरी तो श्रमजीवी कामगारच ना ? त्याच्या शेतातील घास जर कोणी अगोदर ओढून घेत असेल तर तो भाडवलदार सरकार ह्या भाडवलदाराच्याहि तोंडातून घास काढून घेत असेल तर ते त्या भाडवलदाराचे पाहणे आहे. तुम्ही तुमच्यापुरते पाहा मी बारगावास वाळवे तालुक्याच्या शेतकऱ्यास जे बजावले तेच तुम्हांसहि पुन बजावीत आहे ते हे की तुम्ही आपली स्वतंत्र संघटना करा इतकेच नव्हे,

तर शहरातील कामगाराच्या संघटनेशी तुम्हाला खादा लावून मिळून संघटना करा. शहरातल्या व खेड्यातल्या श्रमजीवी लोकामध्ये पुढे कदाचित परस्पर कलागती लावून देण्याचा प्रयत्न तुम्हा दोघांचे समानशत्रू कशावरून करणार नाहीत? म्हणून अगोदरच सावध राहून ही जोडघटना साधणे अत्यावश्यक नाही काय?

## काँग्रेसवर मदार ठेवणे दूधखुळेपणाचे

काँग्रेस जोपर्यंत महात्मा गांधी व पंडित जवाहरलाल वगैरे-सारख्यांच्या मुठीत आहे तोपर्यंत तरी तुमच्या बाजूस राहील असा मला भरवसा आहे. म्हणून तुम्हीही तिला आपला पाठिंबा सरळ मनाने व सढळ हाताने द्याच. पण तुमच्याने काँग्रेसला काय मदत होणार? काँग्रेस तर सुशिक्षितांची आणि तुम्ही अशिक्षित. काँग्रेस स्वतः श्रीमंताच्या हाती गेली आहे; आणि जाणे साहजिकच आहे. तुम्ही, तर दरिद्री. मला एकदा वाटत होते की, ही सारी काँग्रेसची चळवळ शेतकऱ्यांनीच काबीज करावी. पण हल्लीच्या स्थितीतील हिंदी शेतकऱ्यांनी काँग्रेस काबीज करणे ज्वळ ज्वळ ब्रिटिश राज्य काबीज करण्याइतकेच अशक्य नाही काय? काँग्रेस जोपर्यंत तुम्हाला अनुकूलच आहे तोपर्यंत तुम्हीही तिच्या उलट जाण्याचे कारण काय? आज काँग्रेसनेही तुमच्या संघटनेचे प्रत्यक्ष कार्य आपल्या शिरावर घेतले नाही. याचे कारण काँग्रेसची तशी इच्छा नाही असे मुळीच नसून प्रस्तुतच्या हातघाईच्या लढाईत तिला तशी वेळ व सवडच नाही. म्हणून तुमच्या आशीर्वादावरच तुमची ती प्रामाणिकपणे समजूत करीत आहे. तुम्हीही प्रामाणिकपणे तिचे हित चिंता, — तिच्याशी प्रतारणा करण्यात तुमचे तिळमात्र हित नाही. पण मला सांगावयाची मुद्द्याची गोष्ट ती हीच की तुम्ही ह्यापुढे कोणावरही — प्रत्यक्ष काँग्रेसवरही अवलंबून राहू नका. हे सांगण्यात मी काँग्रेसचा अपमान करीत नसून, केवळ तुम्हाला सावध करीत आहे. काँग्रेसचे कार्य बहुतांशी आणि आता तर सर्वांशी राजकारणाचे आहे. मी तुम्हाला स्पष्ट बजावीत आहे की, तुमच्यापुढचे कार्य मुख्यत राजकारणाचे नसून ते अर्थकारणाचे किंवा सामाजिक स्वरूपाचे आहे, हे मी स्वतः राजकारणाला भिऊन किंवा कोणाची भीड ठेवून सांगत आहे असा गैरसमज होऊ देऊ नका. उलट, मला असे

उघड दिसत आहे की, शेतकऱ्यांना तुमच्या आर्थिक स्वातंत्र्यातच परकीय सरकार काय किंवा स्वकीय सावकार काय, नोकरशाही काय किंवा भावी सनदशीर स्वराज्य काय, कोणत्याही मानवी सत्तेला वेसण घालण्याचें सामर्थ्य आहे, हे खरे नव्हे काय ? आणि हे स्वातंत्र्य, शेतकरी बंधूंनो, तुमच्या हाती आयतेच राजाच्या पुड्याप्रमाणे फेकून तरी आणून देण्याचे सामर्थ्य आजच्या काँग्रेसमध्येही नाही; इतरांना तर तशी इच्छाच नाही. मग आता तुम्ही तुमचा स्वार्थ सुधारणे आवश्यक नाही काय ?

काँग्रेसविषयी आणखी एक गोष्ट निर्भीडपणाने मला येथे सांगणे जरूर आहे. काँग्रेस म्हणजे साऱ्या देशाच्या म्हणजे त्यातील सर्व वर्गांच्या कल्याणासाठी विचार करणारी व त्या विचाराची अमल दजावणारी संस्था आहे. थोडक्यात सांगावयाचे तर ती आमची भावी पार्लमेंट आहे. पण अशी कोणती पार्लमेंट आजपर्यंत जगाच्या इतिहासात झाली आहे की, जिने आपल्या कक्षेतल्या सर्वच वर्गांचे हित सारख्या प्रमाणांत साधले आहे ? ही समदृष्टी मनुष्यमात्राच्या व्यवहारास तरी जवळ जवळ अशक्य आहे. सर्व पार्लमेंटमधली राणी जी हल्लीची ब्रिटिश पार्लमेंट तिलादेखील आजवर जे साधले नाही, ते आमच्या भावी पार्लमेंटला साधेल अशी अवास्तव आत्मस्तुति करणे हा माझा धर्म नाही. शेतकरी हा राष्ट्राचा एक विशिष्ट अर्थात सर्वांचा पोशिंदा म्हणून सर्वांत अत्यंत महत्त्वाचा व संख्येने मोठा वर्ग आहे हे खरे, तथापी इतर अल्पसंख्याक व परपुष्ट वर्गाइतके वजन शेतकऱ्यांचे आजवर कोणत्याच पार्लमेंटवर पडले नाही. मग अनेकांच्या वजनाखाली सहज दडपून जाणाऱ्या आमच्या राष्ट्रीय सभेवर, शेतकरी बंधूंनो, तुमचे काय म्हणून वजन पडावे ? तरी काँग्रेसला तुमची कळकळ वाटते ही गोष्ट निःसंशय खरी आहे. पण ती कळकळ, पुढे ह्या देशात भिन्न भिन्न वर्गांत स्पर्धा किंबहुना वैर माजल्यावर टिकेल, किंबहुना टिकली तरी तुम्हांला खरे आर्थिक स्वातंत्र्य आणि स्वयंनिर्णय आयतेच आणून देण्याइतकी परिणामकारी ठरेल असे समजणे म्हणजे निव्वळ दुधखुळेपणाचे दिसते. तूर्त महात्मा गांधींसारख्या लोकोत्तर सत्पुरुषाच्या हाती काँग्रेसचे सर्वाधिकार आहेत. हल्लीच्या लष्करी आणीबाणीच्या अवस्थेत असे होणेच इष्ट व जरूर आहे. पण अशा सर्वाधिकारी थोर पुरुषाला झाले तरी सर्वच पुढारलेल्या व मागासलेल्या लहानथोर वर्गांचे हित हाकेसरशी साधणे

शक्य आहे काय ?

## आर्थिक-सामाजिक घटना हाच उद्देश

वरील सर्व विचारसरणी आपल्यापुढे मांडण्यात माझा मुख्य मुद्दा हा आहे की, शेतकऱ्यांनो, तुम्ही राजकारण हा आपला दुय्यम उद्देश ठेवा आणि तुमची स्वतःची आर्थिक व सामाजिक ऊर्फ विधायक घटना करणे हाच मुख्य उद्देश ठेवा, व त्या कार्याला कोणाचीही वाट न पाहता आपल्याच पायावर उभे राहून तात्काळ लागा. आपण कल्पना करू की देशांत स्वराज्य झाले, जमिनींची तात्त्विक मालकी राष्ट्राला मिळाली; आणि वाहतुकीसाठी जमीनधारणाचा हक्क श्रमजीवी कुणब्याकडे निर्विघ्नपणे आला, तरी दुसरी गोष्ट महत्त्वाची ही की, ह्या सर्व कुणब्यांनी आपसात आपली जूट व इतर जे श्रमजीवी खेड्यांतूनच नव्हेत तर शहरांतून राहत असतील त्यांच्याशी कायमचे सहकार्य केले पाहिजे व सहानुभूती राखली पाहिजे, शेतकरी श्रीमंत झाला की तोच जमीनदार बनतो, मग तो इतर गरीब शेतकऱ्यांशी फटकून वागतो आणि इतर श्रीमंत सत्ताधाऱ्यांच्या पंक्तीस बसतो, म्हणून ही आपसातील जुटीची फारच जरूरी आहे. अमेरिकेतील शेतकऱ्यांचे उदाहरण पुढे दिलेच आहे. ती धोक्याची इशारत आहे. इतकेच नव्हे तर सर्वांत मुख्य गोष्ट मला आज सांगावयाची आहे, ती ही की, शेतकऱ्यांनो, तुम्ही नेहमी काबाडकष्ट करणारे नांगरे म्हणून काळ न कंठता राष्ट्राच्या अर्थकारणात, तुम्ही आपला एक हात अर्थउत्पादनात गुंतवून दुसरा हात त्या उत्पन्न केलेल्या अर्थाची पुढे विल्हेवारी कशी चालली हे पाहून, ह्या अर्थगाड्याच्या बैलाची शिंगदोरी खेचण्याकरिता नेहमी मोकळा ठेवणे जरूर आहे. हे जोपर्यंत होत नाही तोपर्यंत मागे गेलेल्या अनंत काळाप्रमाणे, पुढे येणाऱ्या अनंतकाळीही तुम्ही भारवाही, केवळ शेपूट व शिंग नसणारी जनावरे राहणार हात काय संशय ! आणि ह्याबद्दल इतरांना उगाच वाईट वाटून तरी काय उपयोग ?

• •

### अमेरिकेचे उदाहरण कसे गिरवावे ?

अमेरिकेसारख्या देशातील शेतकऱ्यांनी केवळ जमिनीवरच नव्हे तर देशाच्या व्यापारावरही आपला ताबा राखला आहे. ते कच्चा माल नुसता तयार करून दुसऱ्यांचीच, केवळ तुमच्या-प्रमाणे भर करीत नाहीत; तर तो कोठे कसा जातो हे पाहण्यासाठी उतार पेठेवरही आपला ताबा चालवितात. कच्च्या मालाची केव्हा किती किंमत असावी हे ठरविणे अमेरिकेन शेतकऱ्याने आपले हाती ठेविले आहे. परवा दोन कोटी डॉलरचा ( २॥ रु. = १ डॉलर ) कापूस अमेरिकेतील शेतकऱ्यांनी जाळून बाजारात त्याची किंमत राखली असे मी कोठेसे वाचल्याचे आठवते. ह्यालाच म्हणावे शेतकरी! इतर ते नुसते भारवाही!! पण अमेरिकेतील शेतकरी हा केवळ कुणबी नसून तो एक प्रकारचा जमीनदार व माडवलदार बनला आहे. खरे कष्ट तेथे तुमच्या आमच्यासारखे काळे शिद्दी लोकच करतात. म्हणून अमेरिकेचे उदाहरण तुम्ही जसेच्या तसेच गिरवावे असे माझे म्हणणे नाही. आमची परिषद तालुक्यापुरतीच आहे, म्हणून तुम्ही तालुक्याची तरी उतारपेठ आपल्या ताब्यात घेण्याच्या मार्गास लागा. खरे पाहिले तर अशी शेतकऱ्यांची संघटना सर्व देशभर होणे जरूर आहे.

### गावगाडा दुरुस्त केला पाहिजे

हा व्यापारी पक्ष गाठणे ही काही नुसती बोलण्याची गोष्ट नव्हे. त्याला शिक्षण, सवय, सहकाय आणि कालावधी किती तरी पाहिजे. अखिल बहुजनसमाज, निदान खेड्यातील सर्व गावगाडा तरी मुळासकट दुरुस्त झाला पाहिजे. मी सांगतो ही गोष्ट हिंदुस्थानात निदान महाराष्ट्रात तरी नवी नाही. मी केवळ भविष्यपुराणही रचीत नाही. परकीय सत्तेच्या धाडी वारंवार येऊन, शेवटी अशा सकटपरंपरेवर आधुनिक यांत्रिक युगाच्या आपत्तीने कळस चढविल्यावर, आमच्यातला पूर्वीचा गावगाडा आता जमीनदोस्त झाला आहे. पण तो कधी नव्हताच अशी आपली गैरसमज होऊ देऊ नका. महाराष्ट्रात स्वराज्य वरचेवर उसळी मारून डोके वर करते, ह्याचे कारण महाराष्ट्रातली रयतवारी जमीनधारणेची पद्धतच नव्हे तर महाराष्ट्रातील पूर्वीचा उतारपेठेवर ताबा ठेवणारा गावगाडा हाच होय.

महाराष्ट्राचा राजा महाराष्ट्राचा कुणबीच होता वाणी व ब्राह्मण हे त्याचे आश्रित होत महाराष्ट्रातील मराठ्यांनी ह्या वाण्याब्राह्मणांच्याच नव्हे, तर साळीकोष्टी वगैरे चतुर कारागिरांच्याही वसाहती आपल्या सोयीप्रमाणे वेळोवेळी करविल्या आहेत ह्याचा इतिहास अद्यापि लिहावयाचा आहे ही गोष्ट कारडा व पोकळ जातीचा अभिमान बाळगणाऱ्यांना मुळीच कळण्यासारखी नसून खऱ्या राष्ट्रोद्धारकांनी शोधून काढून अमलात आणावयाची आहे ! **वर उल्लेख केलेला गावगाडा दुरुस्त करणे म्हणजेच शेतकऱ्यांची संघटना करणे होय** शिक्षण, व्यसनांची बंदी, वाहतुकीची साधने, सामाजिक सुधारणा, खऱ्या व गरीब धर्माचरणाची जबाबदारी, वगैरे पुष्कळ गोष्टींचा मी वेळोवेळी आजवर गाहो फाडीत आलो आहे ह्या सर्व तपशिलाच्या गोष्टी आता रोजगावर टाकणे राष्ट्रहिताला घातुक आहे व त्याचा विचार आजच्या सभेत झाला पाहिजे ह्या तपशिलाची अमलबजावणी करण्यासाठी तालुक्यातील म्युनिसिपालिट्या, बोर्डे व इतर स्थानिक संस्था प्रत्यक्षपणे, शेतकऱ्यांनो, तुमच्या हाती आल्या पाहिजेत. चळवळे लोक अशा संस्थांतून जागा पटकावण्यापुरतेच तुम्हाला आपल्या नादी लावतात, व आश्चर्य हे की, तुमच्यातलेच पुढारी म्हणविणारे ह्या चळवळ्यांच्या नादी लागून तुमचे नुकसान करतात ह्या गोष्टी आता शाळेतल्या विद्यार्थ्यांलाही कळू लागल्या आहेत

## तुम्हीच तुमचे मित्र आहात

मला शेवटी एवढेच सुचवावयाचे आहे की, आर्थिक स्वातंत्र्य व आर्थिक स्वयनिर्णय हे साधावयाचे असल्यास तुम्हाला राजकारण, सामाजिक सुधारणा धार्मिक स्वातंत्र्य ह्या सर्वच गोष्टींकडे लक्ष पुरविले पाहिजे पण त्याच्यासाठी तुम्ही फक्त या निरनिराळ्या प्रकारच्या चळवळी चालविणारे जे कोणी बरेवाईट पुढारी असतील त्यांच्यावरच विसंबून राहू नका शेतकऱ्यांनो, तुमचा काय बेत आहे ! इंग्लंडात मजुराचे राज्य चाले, रशियात कुणब्यांचे राज्य झाले वगैरे गोष्टी तुम्ही दुरून तरी ऐकल्या असतीलच, पण तेथील मजूर आणि कुणबी तुम्हासारखे अगदी दुसऱ्यावर हात टेकून बसणारे खाशीन नाहीत, हे ध्यानात ठेवा आणि त्यांना पुढे आणणारे मद्राले इकडील काही पुढाऱ्यांप्रमाणे शिळ्या कढीलाच पुन

ऊस आणून आपले पोट भरण्यातच पर्याप्त नाहीत. म्हणूनच तिकडची सुधारणा इकडे होण्यास वेळ लागत आहे. एरव्ही काय तुम्ही आम्ही माणसे नव्हत? तुम्हांस वाद्य करण्यास मुबलक पुढे येतील. तुम्ही मात्र त्यांचे वाद्य पारखून घ्या. पण अखेर तुमचे मित्र अथवा वैरी तुम्ही स्वतःच हे गीतावचन खरे ठरणार! माझे काही विचार तुम्हांला कोयनेलपेक्षाही कडू लागतील, अशी मला भीती वाटते! पण त्यांचा परिणाम तरी गोड होवो.

* * *

विनायक दामोदर सावरकर

## १. राजकारण हे परमेश्वरी कर्तव्य !

शास्त्राची प्रमेये ही कालदेशानी मर्यादित नसतात. भूमितीचे सिद्धान्त हे ग्रीसमध्ये जितके सत्य आहेत तितकेच हिंदुस्थानातही आहेत व ते युक्लिडच्या काळी जितके यथार्थ होते तितकेच आजही आहेत. मानवी जातीचे विस्तृत क्षेत्र व कालाची अनतता ध्यानात घेऊन त्यांच्या अनुरोधाने ठरविलेले जे सिद्धान्त असतात ते सर्व काळी व सर्व मनुष्याना सारखेच लागू आहेत. असले सर्वसाधारण सिद्धान्त पठन करणे व त्याचा आपल्या स्वत च्या अुन्नतीसाठी अुपयोग करणे हे अत्यत आवश्यक आहे. प्रत्येक मनुष्य मागच्या अितिहासाचा व अनुभवाचा फायदा न घेता मनुष्यजातीने आरभी केलेल्या चुका पुन्हा करू लागल्यास मानवी अुन्नती खुटली असेच म्हणावे लागेल. मनुष्यजातीने जे प्रश्न सोडवून ठेविले आहेत ते पुन्हा सोडविण्यात काळ व्यर्थ घालविण्यापेक्षा त्या प्रश्नाची कालदेशानी अमर्यादित अशी अुत्तरे जी अनेक तत्ववेत्त्यानी सिद्धान्तरूपाने ग्रथित केलेली आहेत, ती समजावून घेअून ज्या प्रश्नाची अुत्तरे मनुष्यजातीला अजून मिळाली नाहीत, ते प्रश्न सोडविण्यात तो काल घालविणे हेच श्रेयस्कर आहे. ही गोष्ट जशी ज्योतिषशास्त्र, भूमितिशास्त्र व रसायनशास्त्र वगैरेना लागू आहे, तशीच ती राजकारणशास्त्रालाही लागू आहे. राजकारणशास्त्राची अुन्नती मनुष्याच्या प्रगमनाबरोबरच होत आलेली आहे. राजकारणशास्त्रातही अितर शास्त्रांप्रमाणेच काही तत्त्वे कालदेशाने अमर्यादित अशा महत्त्वाच्या योग्यतेला पावलेली आहेत. त्या सत्याचे ज्ञान असणे, मनुष्यजातीच्या आजपर्यंतच्या अनुभवाचा फायदा घेणे, भूतकालाच्या यशीचा भविष्यन्मार्गगमनास आधार घेणे, व ' अितिहासप्रदीपेन मोहावरण घातिना लोकगर्भगृह कृत्स्न यथावत् ' सप्रकाशित करण्यास तत्पर होणे हे अत्यत श्रेयस्कर आहे. अितर राष्ट्रानी अनेक शतके त्रास सोसून व अनेक देहांचे बळी देऊन जी महत् तत्त्वे शोधून काढली आहेत त्याचा उपयोग न करून घेता जर अेखादा देश अज्ञानात जाणूनबुजून चाचपडत राहत असेल तर ह्या

राष्ट्रीय आधळेपणाबद्दल त्यास परिणामी भयंकर पश्चात्ताप झाल्याशिवाय राहणार नाही आग लागली असता त्यावर पाणी ओतावे हे सर्वमान्य तत्व मुद्दाम फेटाळून त्या आगीवर, घृताचा वर्षाव करून ती विझते की नाही म्हणून धिमेपणाने प्रयत्न करणाऱ्या पद्धतीमुळे या आगीच्या डागात दग्ध होण्याशिवाय दुसरे काय नशिबी मिळणार आहे ? अशी स्थिती माझ्या प्रिय आर्यभूमीची होऊ नये म्हणून माझ्या तरुण देशबंधूंनी राजकारणातील अंतिम सत्ये व महत् सिद्धान्त शिकावे अशी माझी उत्कट इच्छा आहे. ही सत्ये शिकण्यास राजकारणशास्त्रात ज्यांनी अग्रेसरत्व मिळविले आहे, त्यांच्या उपदेशामृताच्या प्राशनाशिवाय दुसरा उत्तम मार्ग नाही व राजकारणशास्त्रात ज्यांनी अग्रेसरत्व मिळविले आहे, अशा तत्ववेत्यामध्ये महाभाग मॅझिनी शिवाय तरुण राष्ट्रभक्तांना उत्साहक, दिव्य प्रभळ व उदात्त अशा राष्ट्र मंत्राची दीक्षा देण्यास कोणता गुरु सापडणार आहे ?

## ही तत्त्वे केवळ इटलीकरिताच नाहीत

" नाही, नाही, राष्ट्रे कधीही मरत नाहीत परमेश्वर गाजले त्याचा कैवारी आहे त्याने मनुष्याला स्वातंत्र्यात राहण्यासाठी उत्पन्न केले आहे तुम्ही मनात आणा की तुमचा देश स्वतंत्र झालाच ! " याहून अधिक उत्साहक असा दुसरा कोणता राष्ट्रमंत्र आहे ? " एकदा मनुष्याने असा निश्चय केला की मी स्वातंत्र्य, स्वदेश व मानव्य यावर भक्ती करितो की मग त्याने स्वातंत्र्यासाठी, स्वदेशासाठी व मानव्यासाठी लढलेच पाहिजे अखंड लढले पाहिजे, सर्व आयुष्यभर लढले पाहिजे, शक्य त्या त्या शस्त्राने लढले पाहिजे, तिरस्कारापासून तो मरणापर्यंत सर्व संकटे तुच्छ मानिली पाहिजेत, देशाला व निंदेला तोंड दिले पाहिजे, दुसऱ्या कोणच्याही फलाची आकांक्षा न करता फक्त कर्तव्य म्हणून त्याने तत्पर झाले

होताच दुसऱ्यांना स्वतंत्र केले पाहिजे, " याहून अधिक अुदात्त असा दुसरा कोणचा राष्ट्रमंत्र आहे? अशा या राष्ट्रीय मंत्राचा मंत्रद्रष्टा जो अिटलीचा स्वातंत्र्यदाता देशभक्त मॅझिनी त्याच्या राजकीय लेखांनी दोन कोटी लोकांना चैतन्य आले. या लेखांनी अिटली देश स्वतंत्र झाला. सर्व परतंत्र देशांना स्वातंत्र्य देण्याचे सामर्थ्य या लेखांमध्ये भरलेले आहे. मॅझिनीने ही तत्त्वे केवळ अिटलीकरिताच सांगितलेली नाहीत. अिटली निमित्तमात्र असून ही राजकारणशास्त्रातील महत्तत्वे त्या महात्म्याने सर्व मनुष्यजातीसाठी प्रकट केलेली आहेत. हा स्वातंत्र्यसुधेचा मेवा सर्व सतत भूमिकाकडे वळला आहे. त्यातकांनी सधी साधून आपापल्या तृषा भागवून घेणे हे आता तुमच्या हातीं आहे!

## अुदात्त वृत्तींचा कळस

जगामध्ये आजपर्यंत जेवढ्या राज्यक्रांत्या झाल्या त्या सर्वांहून अिटलीच्या राज्यक्रांतीत अुदात्त वृत्तीचा कळस झालेला आहे. स्वदेशाभिमानाची ज्योत अितकी प्रज्वलित झालेली होती, प्रत्येक देशभक्त व्यक्तिविषयक सुखाबद्दल अितका अुदासीन होता, स्वदेशासाठी सर्वस्व वाहण्याची अितकी चढाओढ सुरू होती, परकया सत्तेकडून हे चैतन्य दाबून टाकण्यासाठी अितके भयंकर जुलूम करण्यात येत होते, त्या जुल्मात देशभक्तांचे ताडे चिरडले जात असताही प्रत्येक वर्षी लोकक्षोभाची अुसळी अितकी विलक्षण व निधड्या छातीची होत होती व अखेर साठ वर्षांवर लढून लढून देशवीरांनी अितक्या चिकाटीने यश मिळविले की, या सव महत्कृत्यांनी व महनीय नामण्यांनी अलंकृत अशी दुसरी राज्यक्रांती आजपर्यंत झालेली नाही, असे अितिहासास कबूल करावे लागते. या अिटलीच्या राज्यक्रांतीत सद्गुणाचा जो अितका अुत्कर्ष झाला याचे मुख्य कारण हे आहे की ती राज्यक्रांती ही व्यक्तीसाठी, लोभासाठी किंवा द्वेषासाठी झालेली नसून तिचा पाया अत्यंत अुन्नत अशा महत्तत्त्वांवर रचलेला होता. ' **मोठाल्या क्रांत्या ह्या तरवारीपेक्षा तत्त्वांनीच घडवून आणलेल्या असतात** " पण **तरवारीशिवाय तत्त्वांचा जय होत नाही** ही दुःखाची गोष्ट आहे व म्हणून अिटलीने तरवार अुपसली परंतु " त्या तरवारीच्या अग्रभागी जर

सत्याचे अधिष्ठान नसते तर त्या तरवारीला तिने स्पर्शही केला नसता." ज्या तत्त्वावर या पवित्र स्वातंत्र्ययुद्धाचा पाया रचला होता ती तत्त्वे प्रथमन मॅझिनीने जिटलीस शिकविली.

## राजकारणाचा व धर्माचा विरोध नाही

मॅझिनीचे राजकारण हे केवळ ऐहिक व स्वार्थप्रवृत्तीचे नव्हते. तसे असते तर त्या राजकारणाने प्रवृत्त झालेल्या देशवीराच्या अंतःकरणात जितक्या उदात्त वृत्तींचा उदय झाला नसता. मॅझिनीचे राजकारण हे प्रवृत्ती व निवृत्ती ह्यांचे ऐकीकरण होते. त्याच्या राजकारणाची जिमारत ही नीतीच्या पायावर उभारलेली होती. हे सिद्ध केल्याने त्या वेळपर्यंत राजकारणाची थोर पुरुषांकडून जी अवहेलना होत असे ती नष्ट झाली. राजकारण हे स्वार्थाचे व अप्पलपोटेपणाचे शास्त्र आहे व यात जो बळी तो कान पिळी या पशुवृत्तीचाच अमल आहे अशी सर्वत्र समजूत असल्याने या राजकारणाचा साधुपुरुषांना तिरस्कार येणे साहजिक होते. दुसऱ्याच्या देशावर घाला घालणे, त्याचे स्वातंत्र्य उपटून घेणे, हे जर राजकारण असेल—तोपर्यंत व अजूनही ते बहुतेक राष्ट्रांकडून तसेच आहे असे मानण्यात येते—तर मग त्या राजकारणात व नरकात भेद कोठे राहिला? मॅझिनीने राजकारणास या नरकगामी कल्पनेपासून मुक्त केले. राजकारण हे परमेश्वरी कर्तव्य आहे असे त्याने स्पष्ट रीतीने सिद्ध केले. प्रवृत्ती व निवृत्ती ही दोन परस्परविरोधी तत्त्वे नसून *ऐकाच मार्गाच्या दोन भिन्न भागांची* नावे आहेत असे त्याने प्रतिपादन केले "नाही, स्वर्ग व पृथ्वी यांच्यामध्ये विरोध आहे किंवा ती भिन्न आहेत हे सत्य नाही नाही, स्वर्गात सत्य व न्यायाचे ईश्वरी राज्य चालावे व पृथ्वीवर असत्य व अन्याय्य यांचा अमल चालावा हे खरे नाही. पृथ्वी ही स्वर्गाची शिडी आहे" राजकारणाला स्वार्थपरायणतेचे हिडीस स्वरूप देणाऱ्या लोकांची चुका अशा रीतीने उघडकीस आणून मग मॅझिनीने पारलौकिक धर्माभिमान्यांचा समाचार घेतला आहे. धर्माने राजकारणात लक्ष घालणे अवश्य आहे, जितकेच नव्हे तर त्याचे कर्तव्य आहे. राजकारण म्हणजे समाजाची स्वदेशाची व स्वराष्ट्राची दास्यमोचना व संवर्धना होय तिकडे दुर्लक्ष करणे म्हणजे मनुष्यजातीवर आलेले भयंकर संकट

निमूटपणे पाहण्याचे अक्षम्य पातक करणे होय. धर्माची खरी व्याख्या म्हणजे मनुष्यमात्राचे धारण करणे ही होय. मनुष्यमात्र दास्यपंकात किंवा अनीतीत पचत असता आपण तेवढे स्वतःस मुक्त करून घेऊ ही समजूत ढोंगीपणाची आहे. भूतदयेशिवाय स्वतःच्या मुक्तीला दुसरा मार्ग नाही. "तुमची जेव्हा चौकशी होईल तेव्हा परमेश्वर तुम्हाला असे विचारणार नाही की 'तुम्ही स्वतःच्या कल्याणासाठी काय केलेत?' तर तो तुम्हाला असेच विचारणार आहे की 'तुम्ही भूतमात्रांच्या कल्याणासाठी काय केले आहे? मी जे स्वदेश-बंधु तुम्हाला दिले त्यांच्या कल्याणाकरिता काय केले आहे?' हे भूतमात्रांचे अंतिम कल्याण करण्यासाठी, त्यांची ज्ञानाने व पावित्र्याने आत्मोन्नती होण्यासाठी व त्यांना सत्कृत्ये करण्यास सामर्थ्य येण्यासाठी पहिली अत्यंत आवश्यक गोष्ट म्हटली म्हणजे त्यांचे दास्यविमोचन करणे — त्यास स्वातंत्र्य मिळवून देणे — ही होय. जोपर्यंत अेखाद्या व्यक्तीला तुरुंगात बांधून टाकिले आहे तोपर्यंत, तिच्या हातून सत्कृत्ये घडणे व प्रगमन होणे हे जितके अशक्य आहे तितकेच जोपर्यंत अेखादा देश राजकीय पारतंत्र्यात खिळून टाकलेला आहे तोपर्यंत त्याच्या हातून मानवी प्रगमनाला मदत होणे हे अशक्य आहे. अशा स्थितीत, "आपण सर्वजण अेकमेकांच्या मुक्ततेबद्दल जबाबदार आहोत. जर आपण आपल्या भितूर मानवी बंधूंस परवशतेत व अज्ञानात तसेच पडू देअू तर परमेश्वराचा द्रोह केल्याचे महत्पाप आपल्या माथी बसेल. स्वतःची अुन्नती व मुक्तता करण्याचा अेकच मार्ग आहे व तो सर्वांना मुक्ती मिळेल असा प्रयत्न करणे हा होय." आपण ज्या देशात जन्मलो व ज्या देशाचे अन्न खाल्ले त्याचे कर्ज फेडल्याशिवाय आपणास स्वर्गाची दारे खुली होणार नाहीत, हे व्यक्तिविषयक मोक्षासाठी धडपडणाऱ्या ढोंगी साधूस, धर्माभिमान्यास कळले पाहिजे.

"भूतांची दया हे भांडवल संता। आपुल्या ममता नाही देही॥
तुका म्हणे सुख पराचिया सुखे। अमृत हे मुखे स्रवतसे॥"

हे खरे धर्मरहस्य होय. हे रहस्य विशद करून धर्म हा राजकारणाचा विरोधी नाही हे मॅझिनीने आपल्या अधिकारयुक्तवाणीने प्रतिपादन केले. तो स्वतःच अेका ठिकाणी म्हणतो की, "राजकारणाला आम्ही धर्माच्या अुच्चतेप्रत नेले" जे कारस्थानपटू धर्माचा व नीतीचा

धिक्कार करून राजकारणाला धर्म नाही म्हणून म्हणत होते व जे धर्मपद्ध राजकीय स्थितीकडे दुर्लक्ष करून धर्माला राजकारण नाही म्हणून म्हणत होते त्या दोन्ही पक्षाचे अपराध व दोष अुघडकीस आणून, “ आयुष्यात भिन्नता नाही, आयुष्य अेकरूप आहे, परमेश्वराच्या आज्ञा परस्परविरोधी नाहीत. परमेश्वरी आज्ञा अेकच आहे व ती सर्वांना सारखी लागू आहे. अशा पवित्र व अुदात्त तत्वाचा मॅझिनीने अुच्चार केला. राज्यक्रांतिकारक युद्धान्यात नीती व धर्म याच्या पावित्र्यातून ज्याला राज्यक्रांतीची स्फूर्ती मिळाली आहे असा महात्मा मॅझिनीशिवाय अन्यत्र सापडणे हे युरोपच्या अितिहासात दुर्लभ आहे. हे मॅझिनीचे विशिष्ट कर्तृत्व आहे. त्याच्या व त्याच्या अनुदेशाने प्रवृत्त झालेल्या तत्कालीन अिटालियन देशवीराच्या आयुष्यात जो अुदात्तपणा व जे पावनत्व दिसून येते ते सर्व वरील नीतितत्त्वाचे फल आहे. स्वार्थाशाठी नव्हे तर परमेश्वरी कर्तव्य म्हणून स्वदेश स्वतंत्र करण्यास जे देशवीर तयार होतात त्याच्या तरवारीपुढे ऑस्ट्रियाचा काय, पण गवाने मदांध झालेला वाटेल तो देश चळचळ कापू लागल. जर सर्व लोकांची मने राजकारण व धर्म हे अेकरूपच आहेत अशा पूत निष्ठेने अुयुक्त होतील तर या जगात पारतन्त्र्याचे नावदेखील अुरणार नाही. **राजकारणाला धर्म आहे व धर्माला राजकारण आहे, हे महत् सत्य,** हे कालदेशानाधिन सत्य, हे परमेश्वरी सत्य ओळखून “ जर माझ्या प्रिय देशभूमीचे दोन कोटी लोक ‘ आता स्वातंत्र्य मिळवायचेच ’ असे म्हणून उठले तर त्याना अेक ऑस्ट्रिया तर काय पण असे तीन ऑस्ट्रिया अेकत्र झाले तर त्याचा अुच्छेद करून आपले स्वातंत्र्य परत मिळविता येअील! ” दोन कोटी देशबंधूवरच त्या महात्म्याची ही श्रद्धा अुडी! मग जर त्याच्या देशाची लोकसंख्या याहून दहा पाच पट असती व त्याचा शत्रू जर आस्ट्रिया अेवढाच असता तर त्याने स्वदेश स्वातंत्र्य मिळवायास अेक क्षणही लागू दिला नसता! मर्नीची गोष्ट अशीच आहे. धर्म व स्वराज्य या तत्वद्वयाची अेकरूपता मॅझिनीच्या तोंडून अैकल्यावर कोणाही महाराष्ट्रीयाला महाराष्ट्राच्या मनिनीची आठवण झाल्यावाचून राहणार नाही. मनुष्य हे परमेश्वराच्या अज्ञाने संभूत झालेले असल्याने त्याचे आत्मे हे भिन्न नसतात व म्हणूनच त्याचे विचारही परस्पराशी विसंगत होत नाहीत. निरनिराळ्या देशातील त्याची नावे तेवढी

वेगळी, यांची तत्व अेकच. अिगलीमध्ये जन्मलेल्या रामदासाना मॅझिनी म्हणतात व हिंदुस्थानात जन्मलेल्या मॅझिनीला रामदास म्हणतात. यांना दोघेही अेकच तत्व सांगतात की, राजकारण धार्मिक असेल तरच ते पवित्र आहे व धर्म राजकीय असेल तरच तो पवित्र आहे.

## स्वातंत्र्य हे राजकारणातील आद्य कर्तव्य

राजकारणाला स्वार्थलंपटतेच्या तावडीतून सोडवून त्याला अीश्वरी कर्तव्याचे अुच्च स्वरूप दिल्यानतर मग अर्थातच त्या कर्तव्या साठी प्रत्येक मनुष्याने कशा रीतीने अुद्योग करावा हे सांगणे प्राप्त होते. मॅझिनीची कर्तव्यमीमांसा फारच अुदात्त तत्त्वावर रचलेली आहे. जे कर्तव्य म्हणून ठरत असेल ते मनुष्याने वाटेल ते सकट आले तरी पार पाडलेच पाहिजे, असे मॅझिनीचे मत आहे. "कर्तव्यासाठी कर्तव्य करा. कर्तव्याच्या तत्वाने भात्मार्पणाचे सामर्थ्य येते. ह्या उदात्त कल्पनेने, ह्या कर्तव्यनिष्ठेने मनुष्याच्या अगात विलक्षण चैतन्य येते मनुष्य अचाट कर्मे करू शकतो. या धोरणानेच मॅझिनीने कर्तव्यमीमासा केली आहे. राजकारणातील अगदी प्रथम आधारभूत कर्तव्य म्हटले म्हणजे स्वदेश स्वातन्त्र्य हे होय. मनुष्यजाती, स्वदेश, कुटुंब व व्यक्ती अशा पायरीने मनुष्याची कर्तव्य तारतम्यता आहे या परपरेच्या वाट्याला जी राजकीय कर्तव्ये आली आहेत त्यामध्ये स्वदेशस्वातन्त्र्य हे प्रधान कर्तव्य आहेच आहे, परतु राजकीय कर्तव्यासाठीच केवळ नव्हे तर अितर सर्व कर्तव्ये मनुष्याकडून यथास्थित रीतीने पार पाडण्यास स्वदेशस्वातन्त्र्य आधी मिळविले पाहिजे. व्यक्तींची किंवा कुटुंबांची कर्तव्ये जर त्यांच्या स्वदेशापरत यात असतील तर कधीही यथास्थित चालवयाची नाहीत. दास्यात अशक्य व दारिद्र्य माजून तो देश म्याड व कमकुवत होतो. त्या देशाला ज्ञान देणे अशक्य होते. "जेथ शिकण्यास दारिद्र्याने वेळ मिळत नाही तेथे नुसत्या शाळा अुघडून काय होणार?" या राजकीय पारतन्त्र्याने देशातील व्यक्ती व कुटुंब यांचीच वाढ खुरटे असे नाही, तर मनुष्य जातीची वाढही तितक्या प्रमाणाने खुरटत जात "प्रत्येक देशाला मनुष्यजातीच्या अुत्क्रांतीत भर टाकण्यासाठी अेक निशिष्ट कामगिरी सांगितलेली असते परतु पारतन्त्र्यामुळे तो देशच अस्तित्वात आहे असे म्हणता येत नसल्याने त्याच्या

वाट्यास आलेले कर्तव्य त्या देशाकडून घडणे अशक्य होते व म्हणून तितक्या मानाने मनुष्यजातीची अुन्नती अडकून राहते. सर्व देशांची अुन्नती म्हणजे मानव्याची अुन्नती, परंतु जोवर पारतंत्र्याने काही देश नीचतेला खिळून टाकलेले आहेत तोवर मानव्य अुन्नतीला जाणार कसे ? म्हणून व्यक्तीच्या, कुटुंबाच्या, **समाजाच्या व मनुष्यजातीच्या सर्व प्रकारच्या अुन्नतीचे मुख्य साधन जे राजकीय स्वातंत्र्य ते संपादन व संरक्षण करणे हे प्रथम कर्तव्य होय.** *ही परमेश्वराची आज्ञा होय.*

## स्वातंत्र्यप्राप्तीचा पवित्रतम मार्ग

परंतु हे राजकीय स्वातंत्र्य मिळविण्याचे कर्तव्य पार पाडण्यास मार्ग कोणचा योजावा ? स्वातंत्र्य परत कसे मिळवावे ? मॅझिनी जन्मला त्याच वेळेस अिटलीच्या लोकांनी अेक प्रश्न सोडविला होता. आपली दुःखे भिक्षावृत्तीने कमी होणार नाहीत ही बहुतेकांची खात्री झालेली होती व स्वदेशी चळवळीसारख्या आत्मनिष्ठेच्या चळवळींचा प्रादुर्भाव झालेला होता. अितकेच नव्हे तर काही काही पुढाऱ्यांना स्वातंत्र्याची *लालसाही अुत्पन्न झाली होती. परतु ही स्वातंत्र्याची लालसा सर्व लोकांना कशी कळवावी ? परक्यांना अिटलीतून घालवून दिल्याशिवाय अिटली देश कधीही वर यावयाचा नाही हे लोकांना कसे शिकवावे ? स्वातंत्र्य मिळवा अितकेच म्हणून स्वस्थ बसावयाचे नव्हते. तर स्वातंत्र्ययुद्धाची तयारी करणेही अवश्य होते. ही दोन कृत्ये कशी पार पाडावी ? परक्यांच्या जुलुमाखाली, "* अिटलीला पार्लमेंट नाही, व्यासपीठ नाही, मुद्रणस्वातंत्र्य नाही, वाक्स्वातंत्र्य नाही, सभास्वातंत्र्य नाही, ज्यामुळे आमच्या मनात स्फुरण पावत असलेले सत्य स्पष्ट रीतीने बोलता येअील असे अेकही साधन नाही !" *अशी स्थिती झालेली असताना अिटलीमध्ये स्वातंत्र्यप्रेमाची लालसा व स्वातंत्र्ययुद्धाची तयारी ही कशी करावीत ?* " *अशा स्थितीत '***गुप्त मंडळ्या** *शिवाय परवशतेतून सुटण्याचा दुसरा उपाय नाही. जेव्हा सत्यप्रतिपादनाची बंदी झालेली असते, जेव्हा स्वदेश हा अेक मला थोरला तुरुंग बनलेला असतो, तेव्हा त्या तुरुंगातून सुटून स्वातंत्र्याच्या पवित्र वातावरणात श्वासोच्छ्वास करण्याचा अीश्वरी हक्क शाबित करण्यासाठी आम्हा कैद्यांना* **गुप्त कट** *हा अेकच मार्ग आहे*

आम्ही गुप्त मंडळ्या करू, गुप्त कट करू, वेळ येताच त्या तुरुंगाच्या खिडक्या शुपडून टाकू, त्यांच्या गजांचे तुकडे अडवू, त्यांच्या दरवाज्यांना लाथेसरशी फोडून टाकू व त्या तुरुंगवाल्यांच्या छातीवर नाचत नाचत आम्ही मोकळ्या हवेत येशू-आम्ही स्वतंत्र होशू ! " जेथे सत्यप्रतिपादनाची अधम सत्तेने बंदी केलेली नाही तेथे गुप्त मंडळ्या व गुप्त कट हा गुन्हा होय. **" परंतु जेथे सत्यप्रतिपादनाची अधमांच्या जुलुमाने बंदी झालेली आहे तेथे गुप्त मंडळ्या ह्या पवित्रतम आहेत; नव्हे, नव्हे, सत्य प्रतिपादनाचा तो अेकच मार्ग आहे. "** गुप्त मंडळ्यांचा पहिला फायदा असा आहे की, गुप्त सभा भरवून त्यात स्वातंत्र्याचे शिक्षण स्पष्ट अुत्तम रीतीने देता येते, ते लोकांस तावडतोब कळते व परकीय सरकारास दावणे अशक्य होते. मॅझिनी म्हणतो, " या मार्गाने तुम्ही तरुणास जे सत्य ते स्पष्ट रीतीने सांगा. त्यांच्यापासून काही लपवून ठेवू नका. त्यांना निर्जीव यंत्राप्रमाणे न वागविता त्यांना जिवंत व चैतन्ययुक्त मनुष्याप्रमाणे आदराने वागवा म्हणजे त्यांच्यात काय तेज आहे ते तुम्हास कळून येथील. " गुप्त मंडळ्यांचा प्रसार परकी सरकारास दावणे अगदी अशक्य होते, अितकेच नाही, तर अेखादी दुसरी गुप्त मंडळी अुघडकीस आणली असता त्यावासून त्यांचा तोटाच होतो. गुप्त मंडळीचा स्फोट हा ज्वालामुखीच्या स्फोटासारखा आहे. तो दबून असतो तोपर्यंतच परकीयांचे जीवन सुरक्षित असते. परंतु तो स्फोट होताच त्यातील तप्त रसाने परवश लोकांवर चैतन्याची अंगी लाट पसरते. जेथे नसतात तेथे गुप्त मंडळ्या अुत्पन्न होतात, व विशेषतः परकीयांचे धैर्य छिन्नभिन्न होअून जाते. पाय ठेवावा तेथे सुरुंग आहे की काय अशी त्यांना भीती पडून त्यांची गती कुंठित होते. सारांश, दुसरा फायदा असा आहे की फार थोड्या शक्तीने गुप्त मंडळ्यांना परकी सरकारास गांगरून सोडता येते. तिसरा फायदा म्हणजे, लढाअीची तयारी करता येते. हे काम अुघड रीतीने करणे अगदी अशक्य होते. ते अशक्य कार्य मॅझिनीने आरल्या गुप्त कटानी शक्य करून दाखविले. याशिवाय अेक केंद्र अुत्पन्न होते. संचालकांनी सर्व बेत पार पाडता येतात व सर्व लोकांना अेक मार्ग, अेक दिशा व अेक अुद्दिष्ट देता येते. अशा अनेक फायद्यांचा विचार करून मॅझिनीने " तरुण अिटली " स्थापन केली. या 'तरुण अिटली'च्या अुपदेशानेच अिटलीला स्वातंत्र्य मिळाले व अिटलीचे अैक्य

झाले. अिटलीच्या स्वातंत्र्यार्थ झगडलेल्या अनंत देशवीरांचे शिक्षण 'तरुण अिटली' त झालेले होते. "'तरुण अिटली'ने माझ्या देशातील भिन्न पंथ मोडून टाकून स्वदेश अेक केला. त्यापूर्वी अिटलीच्या अैक्याला लोक हसत होते, अिटलीचे राष्ट्रैक्य मनोराज्य आहे असे सर्व पुढारी म्हणत होते. परंतु 'तरुण अिटली'ने माझ्या देशात नवीन युगाला प्रारंभ केला."

## युगांतर करणारे तत्त्वचतुष्टय

*नवे युग निर्माण करतांना मॅझिनीने अिटलीला कोणचे शिक्षण दिले* हे पाहता या महात्म्याचे विचार किती प्रगल्भ व पवित्र होते हे सहज दिसून येते. पूर्वी सांगितलेच आहे की मॅझिनीचे राजकारण नीतीच्या पायावर अुभारलेले होते. **आपल्यापुढे जे कार्य आहे ते लहानसहान कार्य नाही. आपण देवाने जे कार्य केले तेच करीत आहोत. आपण लोकनिर्मिती करीत आहोत! आपण स्वराष्ट्र अुत्पन्न करीत आहोत."** याहून दिव्यतर कर्तव्य ते दुसरे कोणचे असणार? "*परमेश्वराने अगदी स्पष्ट अशा आज्ञेने सांगितले आहे की, अिटली हा* अेक स्वतंत्र देश आहे. समुद्राच्या व पर्वताच्या रेखा आपल्या दिव्य करांगुलीने आखून देवाने अिटली देश अिटालियनांस दिलेला आहे." तेव्हा अिटालियन लोकांचे पहिले कर्तव्य म्हणजे ह्या अीश्वरी आज्ञेप्रमाणे अिटली स्वतंत्र करणे होय. 'तरुण बंधू हो, स्वदेश हे परमेश्वराने आपणास दिलेले घर आहे. या घरात राहून त्याच्या आश्रयाखाली तुम्ही वाढावे व वाढत वाढत अखेर मनुष्यजातीसह अंतिम स्वरूपाला जावे अशी त्याची अिच्छा आहे. हे निसर्गनिर्मित गृह अिटालियनांना वाढण्याकरिता आश्रय म्हणून दिलेले असून परक्यांनी अेक तुरुंग बनवून ठेवला आहे. म्हणून अिटलीच्या पुत्रांचे पहिले कर्तव्य म्हणजे स्वदेश स्वतंत्र करणे हे होय. *मॅझिनीने आपल्या गुप्त संस्थेतून पहिले शिक्षण या तत्त्वाचे दिले.* "प्रथम स्वातंत्र्य मिळविले पाहिजे. दास्यमुक्तता झाली पाहिजे. *अितर सर्व प्रश्न मागाहून सुटतील.* आल्पसकडे धावा! चला! ऑस्ट्रियाशी लढाअी!" अशा स्पष्ट रीतीने अिटालियन तरुणांत स्वातंत्र्याचे चैतन्य अुत्पन्न झाल्यामुळे मॅझिनीचे पूर्वी जी भिकारडी मने प्रचलित होती त्यांचा अेकदम नाश झाला. अमका मर माफ

झाला पाहिजे व तसाच हक्क मिळाला पाहिजे असे म्हणणारा पथ निर्माल्यवत् झाला. कारण सर्वांची अशी खात्री झाली की, "आपणास अनेक हक्क नको असून अेकच हक्क पाहिजे आहे व तो हक्क म्हणजे पूर्ण स्वातंत्र्य–दास्यमुक्तता–हा होय," व हे स्वातंत्र्य ते फायद्याचे आहे म्हणूनच नव्हे, तर ते मर्दांचे कर्तव्य आहे म्हणून मिळविले पाहिजे "अिटलीमध्ये मास्तर स्वस्त आहे किंवा महाग आहे हा मुख्य प्रश्न नाही त्या मालावर गुलामगिरीचा शिक्का आहे की नाही हा मुख्य प्रश्न आहे." मग ऑस्ट्रियाने अनंत हक्क दिले असते तरी अिटलीचे लोक स्वातंत्र्य मिळविल्याशिवाय राहतेना मॅझिनीने स्वातंत्र्याला कर्तव्याचे स्वरूप दिल्याने आस्ट्रिया नेकदम हत वीर्य झाला. अशा रीतीने मॅझिनीने स्वातंत्र्याचे शिक्षण अिटलीच्या तरुणात दिले.

परंतु नुसते स्वातंत्र्यप्राप्तीचे काय म्हणून काही अंतिम कार्य नव्हे. कारण, "जोपर्यंत लढाअी सुरू आहे तोपर्यंत लोक अेकत्र राहतील, परंतु ती नद होताच अिटली देशातील, निरनिराळ्या प्रांतात यादवी मात्र् लागल." म्हणून मॅझिनीचे दुसरे तत्त्व म्हणजे "राष्ट्रैक्य" हे होय. अिटलीच्या भिन्न भिन्न प्रांतात पूर्वीपासून अितकी यादवी माजलेली होती की, ते निरनिराळे देशच झालेले होते. ल्हान ल्हान संस्थाने ही अेकमेकाशी अखंड लढाया करीत होती. शहरे अेकमेकाशी भांडत होती अशा स्थितीत अिटली देशाचे मिळविलेले स्वातंत्र्य कायम राहण्यास त्याचे राष्ट्रैक्य होणे आवश्यक होते

संयुक्त संस्थानपद्धती ठेवून भागले नसते कारण निरनिराळी संस्थाने ठेवली की प्रांतिक अभिमानाला आरंभ होतो व त्या राष्ट्रात अेकरूपता नाहीशी होअून ते राष्ट्र परक्याच्या पायात लवकरच पडते म्हणून मॅझिनीचे आग्रहाचे सांगणे असे की, अिटलीने प्रांतिक अभिमान सोडून देअून सर्व राष्ट्र अेकीकृत झाले पाहिजे ही गोष्ट मॅझिनीपूर्वी कोणासच समजली नव्हती अितकेच नव्हे तर ह्या मताबद्दल मॅझिनीला सर्वजण प्रथम हसत होते परंतु तिकडे लक्ष न देता या भविष्यवाद्याने 'तरुण अिटली' च्या द्वारे, "अिटलीचे राष्ट्रैक्य झाल्येच पाहिजे, कारण अैक्याशिवाय देशत्व नाही, अैक्याशिवाय शक्ती नाही, अिटलीच्या भोवती बलवत्ताची राष्ट्रे पसरलेली असल्याने स्वातंत्र्य कायम राहावे अशी अिच्छा असेल तर अिटलीने अेक राष्ट्र झाले पाहिजे." असा अुपदेश दिला "जेव्हा जेव्हा अेखादा प्रांत युद्धाला आरंभ करील तेव्हा तेव्हा ते

युद्ध अिटलीच्या नावाने केले जाईल व त्या युद्धाचे निशाण हे अिटलीचेच अेक राष्ट्रीय निशाण असेल." सर्व अिटलीमध्ये जे मनोराज्य म्हणून समजले जात होते, ते अिटलीचे राष्ट्रैक्य या महात्म्याच्या दिव्य दृष्टीस सॅव्होनाच्या तुरुंगातून दिसले. त्याने आपल्या देशबांधवास ती गोष्ट कळविली. ज्यांचा त्याच्यावर विश्वास बसला ते त्याच्या मागे गेले व अनेक खडतर मार्गाचे आक्रमण करता करता ते मनोराज्य खरे झालेले पाहण्याची धन्यता त्यांना मिळाली!

अशा रीतीने प्रथम दास्यमुक्तता व मग राष्ट्रैक्य ही दोन तत्त्वे सांगितली. परंतु "आपले काम नुसते नाशकारक नाही. तर आपणास नाश केल्यानंतर त्या नाशातूनच सृष्टी उत्पन्न केली पाहिजे." ही सृष्टी अुत्पन्न करावयाला अिटलीच्या सुदैवाने योग्यतम असाच सृष्टिकर्ता मिळाला होता, यात शंका नाही. राष्ट्र स्वतंत्र झाले व त्यातील निरनिराळे प्रांतिक भेद मोडून व द्वेष नाहीसे करून ते अेक झाले म्हणजे मग तेथे ते स्वातंत्र्य व ती अेकराष्ट्रीयता कायम राहण्यास अंतर्गत स्वतंत्रता मिळाली पाहिजे. "जुलूम म्हटला का तो त्याज्य आहे. मग तो परक्याचा असो किंवा स्वकीयांचा असो, तो धार्मिक असो किंवा राजकीय असो" म्हणून राष्ट्रामध्ये व्यक्तिस्वातंत्र्य, धर्मस्वातंत्र्य, व मतस्वातंत्र्य ही अवश्य असली पाहिजेत. परंतु जेथे राजसत्ता आहे तेथे "असमता अुत्पन्न होतेच होते. मनुष्यात सद्गुण व योग्यता या योगाने जेवढे" भेद झाले असतील, तेवढेच भेद न्याय्य अुचितमूलक आहेत, बाकी सर्व प्रकारची असमता ही अत्यंत गर्हणीय होय, व म्हणून राजसत्ता ही गर्हणीय आहे. मॅझिनीचे सर्व राजकारण जसे नीतिमत्तेला धरून होते तसेच त्याचे **लोकसत्तावादित्वही** नीतीच्या भक्कम पायावर अुभारलेले होते. शिवाय अिटलीसारख्या देशाला कायमपणा देणारा लोकसत्तेशिवाय दुसरी राज्यपद्धती शक्य नव्हती. मॅझिनी स्वतः राष्ट्राच्या बहुमताला विरुद्ध नव्हता. "राष्ट्रीय आज्ञेचा मी दास आहे. परंतु माझी अशी खात्री आहे की **लोकसत्तेशिवाय दुसऱ्या सर्व राज्यपद्धती अन्यायमूलक व अनीतिमान आहेत**" अिटलीमध्ये अनंत प्रांत, अनंत संस्थाने व अनंत दुरभिमान सुरू असल्याने, त्या सर्वांना सारखे हक्क दिल्याशिवाय त्यांची अेकी फार दिवस टिकणार नाही अशी त्याची पक्की खात्री असे. अेका संस्थानाला राज्य केले की, अितर संस्थाने त्याच्या दाब्यात राहू अिच्छिणार नाहीत. अेका प्रांताचा अंमल कबूल केला की अितर

प्रांतांतील लोक आपली सत्ता त्यांच्या हाती देणार नाहीत. अशा स्थितीत खरोखरी राज्यपद्धती म्हणजे लोकसत्ता हीच होय. " शिवाय मनुष्यजातीच्या अुत्क्रान्तीप्रमाणे पाहिले असतां, लोकांचे युग आले आहे, देव व लोक ही तत्त्वें आता मुख्य आहेत, राजाचा किंवा पोपचा हुकूम यापुढे चालणार नाही. युरोपमध्ये सर्वत्र लोकसत्तेकडे प्रवृत्ती होत आहे." म्हणून अिटलीनेही लोकसत्तेचीच योजना करावी अशा मॅझिनीचा अत्याग्रह होता. " तुम्ही राज्यसत्ता नेमाल तर कांही दिवस शांतता राहील; परंतु कायमची शांतता राहणार नाही. पहिली राज्यक्रांती संपताच दुसरी सुरू होईल," अशा अर्थी त्याने वारंवार सूचना द्याव्या. अशा रीतीने **दास्यमुक्तता, राष्ट्रैक्य, समता व लोकसत्ता** ह्या तत्त्वचतुष्टयाचे शिक्षण 'तरुण अिटली' त दिले जाअी. ही तत्त्वे अिटलीच्या अंतःकरणावर मॅझिनीने कोरून ठेवली आहेत.

## अिटलीच्या भाग्याची धन्य आहे !

हा मॅझिनीच्या राजकीय मतांचा मथितार्थ आहे. हा नकाशा पुढे ठेवून, अिटली स्वतंत्र झाली. त्या कार्यात मॅझिनीप्रमाणेच अनेक थोर विभूतींनी दिव्य कृत्ये केलेली आहेत व ते सर्व अितिहासाला वंदनीय झाले आहेत. अिटलीच्या भाग्याची धन्य आहे ! जिच्यामध्ये भगवान मॅझिनी जन्मास येतो, जिच्यासाठी गॅरिबाल्डीचे रक्तबिंदू खर्च होतात, जिच्या सेवेसाठी मानिन हा बद्धपरिकर होऊन सज्ज होतो, जिच्यावर मामेली हा कवी कविता करतो व जिला स्वातंत्र्यदेवी वश होते त्या अिटलीच्या भाग्याची धन्य आहे ! अनेक देश पारतंत्र्यात पडलेले असताना, आपल्या सत्कृत्याने जी भूमी स्वातंत्र्यलक्ष्मीला, आपल्याकडे सर्वांचे आधी वेधून नेते, त्या अिटलीच्या भाग्याची धन्य आहे. ज्यांचा जन्म परतंत्रतेत झालेला आहे, परंतु जे आपल्या पराक्रमाने त्या परतंत्रतेचे निर्दालन करून, आपला स्वदेश स्वतंत्र झालेला पाहतात व त्यास स्वतःच्या कर्तबगारीने दास्यमुक्त केलेल्या भूदेवीचे अंकावर आपले शुभ्र मस्तक ठेवून, चिन्मय होतात, त्यांच्या आनंदाला सीमा नाही !

परमेश्वराचे घरी प्रत्येक देशाकरिता अेक अेक मॅझिनी ठेवला असेल तर कोणालाच अिटलीचा हेवा वाटण्याचे कारण नाही.

* * *

## २. हिंदु राष्ट्राच्या अपकर्षाचे मूळ

"मला वाटते की, देशाच्या राजकीय, सामाजिक, प्रभृति परिस्थितीचे आणि ती सुधारण्यासाठी ठरलेल्या सिद्धान्तप्राय अुपायांचे ज्ञान मुलांना लहानपणापासूनच करून देणे अत्यंत आवश्यक झाले आहे. राजकीय सिद्धान्तांचे व सामाजिक प्रमेयांचे विद्यार्थ्यांस लहानपणापासूनच बाळकडू देणे (जसे अवश्य) तद्वतच जातिभेद, जातिद्वेष व जातिमत्सर यांच्या योगाने आमचा देश कसा विभागला जात आहे, कसा भाजून निघत आहे, कसा करपून जात आहे याचेही ज्ञान राष्ट्रीय शाळेतील मुलांना मिळाले पाहिजे; जातिभेद सोडण्याची आवश्यकता किती आहे हे आमच्या विद्यार्थ्यांस समजले पाहिजे."— लोकमान्य टिळक (बेळगावचे

## जातिभेद व अधःपात याचे समकालीनत्व

या समकालीनतेमुळे तर त्या जातिभेदाचा आणि त्या अधःपाताचा संबंध केवळ काकतालीय योगाचा आहे की कार्य-कारणभावाचा आहे याची शंका अयत्न उलटतेने न येणे केवळ अशक्य आहे. यामुळे आपल्या राष्ट्राच्या अपकर्षाची कारणे शोधताना इतर महत्त्वाच्या गोष्टीप्रमाणेच या जातिभेदाच्या प्रश्नाच्या इष्टानिष्टतेची छाननी करणे हे भारतीय राष्ट्रधुरीणाचे आजचे एक त्वर्य ( Urgent ) आणि अपरिहार्य कर्तव्य झालेले आहे. एखादे उद्यान फळाफुलांनी डवरलेले, निकोप वृक्षांच्या विस्तीर्ण प्रौढीने नी निरोगी लतागुल्मांच्या सतेज शोभेने उल्लसित असलेले पाहून तेथील प्रकाश, पाणी आणि खत ही बहुधा निर्दोष असावी असे अनुमान जसे सहज निघते, तसेच ते वृक्ष खुरटलेले, फळे किडलेली, फुले शिथिलेली दिसताच त्या ऱ्हासास आधारभूत असलेल्या प्रकाश, पाणी, खत प्रभृति घटकांपैकी कोणते तरी एक वा अनेक वा सर्वच दोषी झालेली असली पाहिजेत हेही अनुमान तसेच सहज निष्पादित होते. आणि त्या प्रत्येकाची छाननी करून दोष कशात आणि किती प्रमाणात सापडतो याचे निदान करणे आणि तदनुसार ते ते दोष निर्मूल करणे हच त्या बागवानाचे आद्य कर्तव्य ठरते.

परंतु या दृष्टीने पाहता हिंदु राष्ट्राच्या अपकर्षास ही आमची जातिभेद संस्था किती प्रमाणात आणि कशी कारणीभूत झाली आहे किंवा झालीच नाही याचे विवेचन आवश्यक असूनही आम्हास व्यक्तिशः ते सांगोपांग करणे आज शक्य नाही. कारण जातिभेदाच्या आजच्या स्वरूपाचे परिणाम विशद करू जाताच आमच्या राजकीय परिस्थितीचा विचार क्रमप्राप्त होणार आणि प्रचलित राजकारणसंन्यासाच्या शृंखलेने जखडलेली आमची लेखणी त्यास तर शिवूही शकत नाही. यासाठी तो भाग तसाच सोडून या जातिभेदाचे आमच्या राष्ट्राच्या सुस्थितीवर आणि प्रगतीवर सामान्यतः काय परिणाम झालेले आहेत याचे केवळ दिग्दर्शन करावयाचे योजिले आहे.

● ●

## कोणाचे मत प्रमाण मानावे ?

आणि हे दिग्दर्शन करताना या विषयासंबंधी लो. टिळकावाचून दुसरे कोणाचे मत अधिक अधिकारयुक्त असणार आहे? गेल्या शंभर वर्षांत हिंदुस्थानात आपल्या हिंदु राष्ट्राच्या हिताहिताविषयी अुत्कट ममत्वाने, सूक्ष्म विवेकाने आणि स्वार्थ निरपेक्ष साहसाने सर्व बाजूंनी समन्वित विचार केलेला जर कोणी पुरुष असेल तर ते लोकमान्य टिळकच होत. यास्तव आमच्या हिंदु राष्ट्राच्या अपकर्षांच्या कारणपरंपरेनिर्णयाची त्यांची मते अगदी सिद्धान्तभूत नसली तरी अितर कोणत्याही मतापेक्षा अधिक आदरणीय, विचारणीय आणि विश्वसनीय असणारच. त्यातही जातिभेदासारख्या धार्मिक संस्था म्हणून, सनातन संस्था म्हणून, साधारण लोक ज्या प्रश्नास समजतात त्या विषयावर राजकारणात आणि धर्मकारणात सनातनी समजल्या जाणाऱ्या कोटी कोटी लोकांचा विश्वास आणि नेतृत्व ज्याने संपादिले, त्या लोकमान्यांच्या मताचे महत्त्व विशेषच असले पाहिजे. वास्तविक पाहता आजकाल कोण सनातन हे ठरविणे दुर्घटच आहे. जो ज्यावेळी अेखाद्या सुधारणेस विरोध करतो आणि अेखाद्या रूढीस धुरून धरतो तो त्या वेळेपुरता निदान त्या प्रकरणी तरी सनातनी म्हणविला जातो, अितकेच काय ते सनातनीपणाचे सध्याचे लक्षण आहे. यास्तव स्व. लोकमान्यांवरही जरी बहिष्कार पडलेले होते, अनेक धर्ममार्तंडांनी त्यांनाही ज्या प्रच्छन्न सुधारक म्हणून हिणविले होते, तरीही हिंदु संस्कृतीच्या रक्षणार्थ त्यांनी अुम्या आयुष्यभर जी नेटाची झुंज घेतली आणि अगदा निष्पाप होअीनो प्रचलित समाजरचनेला कोणाचाही अनावश्यक धक्का लागू नये आणि अनर्गल बादची बाढू नये म्हणून सुधारणाविरोधाचा तीव्र आरोप सहन करूनही जी सतत काळजी घेतली, त्यामुळे कोट्यावधी हिंदूंचा सनातन धर्म संरक्षक म्हणून लोकमान्यांवरच विश्वास बसलेला होता, या सर्व कारणासाठी जातिभेदाच्या स्वरूपाविषयी लोकमान्यांसारखा अग्रगण्य सनातनी राजकीय पुढारीदेखील काय म्हणतो हे पाहिले असता तो जातिभेद आपल्या हिंदु समाजाच्या अपकर्षाला कसा कारणीभूत होत आहे हे त्यांच्या या लेखावर उद्धृत केलेल्या शब्दावतरणाने दिसून येते. "जातिद्वेष आणि

जातिमत्सर यांनी आमचा देश कसा करपून जात आहे, कसा भाजून निघत आहे ( आणि म्हणूनच तो जातिभेद मोडण्याची किती आवश्यकता आहे )" यांविषयी त्यांचे कराल जळजळीत उद्गार ऐकिले असता आजचा जातिभेद आपल्या राष्ट्रीय जीवनासही किती घातक आहे ते निराळे सिद्ध करीत बसण्याची आवश्यकता उरत नाही.

## आजचे विकृत स्वरूप

हा लोकमान्यांसारख्यांचा आप्तवाक्याचा आधार क्षणभर बाजूस ठेवला तरीही आज आहे या स्वरूपात तरी जातिभेद देशहितास अत्यंत विघातक होत आहे, हे सिद्ध करण्यास एक सर्वसामान्य सबळ पुरावा असा आहे की, चार वर्णांच्या वेटीनदी रोटीबंदीच्या सहस्रश डरक्यात ह्या आपल्या हिंदु जातीच्या जीवनाचा सगळेच खडविखड करून कुजवून टाकणारा हा आजचा जातिभेद तरी घातक आहेच आहे, यात काहीतरी सुधारणा झालीच पाहिजे, यांविषयी तरी सनातन्यातल्या सनातन्याचाही मतभेद दिसून येत नाही. अगदा पंडित राजेश्वरशास्त्री देखील जातिभेदाच्या आजच्या अत्यंत छिन्न स्वरूपाचे सर्वस्वी समर्थन करण्याचे साहस करू शकणार नाहीत. मग दुसऱ्याची काय गोष्ट? कारण त्याच्या सनातन महासभेनेही असेंब्लीमध्ये आपला प्रतिनिधी धाडावला असता जाऊ म्हणून ठराव केलाच की नाही? दरभंग्याचे महाराजही बोटीवर चढताच परदेशगमन निषिद्धतेस समुद्रात टाकून देते झालेच की नाही? त्या प्रकरणात जातिनिर्बंधाच्या बेड्या त्यांनी तोडल्याच की नाहीत?

## परदेशगमनाचा निषेध

जातिभेदाचे प्रस्तुतचे विकृत स्वरूप आपणास हानिकारक होत असून त्यांत काहीतरी सुधारणा केलीच पाहिजे यांविषयी प्रस्तुतच्या बहुतेक विचारा पुढाऱ्यांचे जसे ऐकमत्य आहे, तद्वतच आपल्या मागच्या वसवास जे आपण मुकलो त्यासही ह्या जातिभेदाच्या आणि तदुत्पन्न विशाळ वेडाच्या भ्रांत समजुतीच पुष्कळ अशी कारण झाल्या आहेत हेही कोणा विचारवंत मनुष्यास सहसा नाकारता येणे शक्य नाही.

बाकी सर्व भाराभर गोष्टी सोडल्या तरी ह्या अेका परदेशगमन–निषेधाचाच प्रताप आपणास केवढा भोवला पाहा! परदेशगमन निषिद्ध का? तर माझी 'जात' जाअील म्हणून आणि जात जाअील म्हणजे काय? तर जाती बाहेरच्या मनुष्याशी अन्नोदक संबंध घडेल, जातिभेदाच्या प्रवृत्तीमुळे बोकाळलेल्या अन्नाचा विटाळ, स्पर्शाचा विटाळ, अशा विविध विटाळवेडाने परदेशगमन निषिद्ध होताच परदेशचा व्यापार आणि व्याप ठार बुडाला. अितकेच नव्हे तर पूर्वीच्या दूरदूरच्या खंडोखंडी या विटाळवेडाच्या रोगाचे प्रादुर्भावा पूर्वी हिंदू व्यापाऱ्यांनी आणि सैनिकांनी सत्तादिलेल्या आणि वसविलेली नगरेची नगरे, बंदरेची बंदरे, राज्येची राज्ये मातृभूमीपासून अकस्मात् विलग झाल्याने आणि स्वदेशापासून भारतीय संस्कृतीचा जो सतत पाठपुरावा त्यास होत होता तो नाहीसा झाल्याने तिकडच्या तिकडे गडप झाला, अस्तंगत 'नामशेष' झाली. कारण आता त्यांची स्मृती केवळ खंडोखंडी अजून विकृतरूपाने का होअीना पण प्रचलित असलेल्या नावावरूनच काय ती अवशिष्ट आहे.

## परधार्जिणे विटाळ–वेड

अिंडो–चायना [ हिंदु–चीन ], झांझीबार [ हिंदु–बाजार ], बाली, ग्वाटेमाला [ गौतमालय ] अशा नावावरूनच काय तो हिंदू वैभवाचा आणि संस्कृतीचा आणि प्रभुत्वाचा त्या त्या खंडी विस्तारलेला व्याप आज अनुमित करता येअील! हिंदुत्व आणि दिग्विजय या शब्दात अितका आत्यंतिक विरोधी भाव आला की, ज्व्हा अश्वारूढ होअून अिस्तंबूलवर चढाअी करण्याची अशुक आकांक्षा मराठी मनात अुत्पन्न झाली, तेव्हा तिची सफलता हिंदुत्व राखून करता येणे शक्य आहे ही कल्पनासुद्धा मल्हाररावासारख्या हिंदुपदपातशाहीच्या त्या वीरालाही न शिवता तो वीर गर्जून अुठला—"हिंदूंचे मुसलमान होअू, पण पुढील वर्षी अिस्तंबूलवर चाल करून जाअूच जाअू." हिंदूचे मुसलमान होण्यावाचून मुसलमानांच्या देशावर सत्ता स्थापण्याचा अन्य मार्गच उरला नव्हता काय? हिंदूही राहू आणि काबूल तर काय पण अिस्तंबूलवरही मराठी झेंडा आणि मराठी घोडा नाचवू ही गोष्ट तत्त्वतःच अत्यंत विसंवादी जी वाटली ती ह्या विटाळवेडाच्या, या 'माझी जात जाअील' च्या भीतीमुळेच होय. हिंदू म्लेंच्छदेशी गेल्याने

त्याची जात जाईल पण केवढे आश्चर्य की, म्लेच्छ स्वदेशी म्हणून हिंदू देशी आल्याने मात्र हिंदूची ती जात जात नसे, तो विटाळ होत नसे. वास्तविक पाहता त्यातल्या त्यात विटाळवेडेच हवे होते तर ते असे काही सुचले असते तरी याहून पुष्कळ बरे होते. ज्या हिंदू गावी वा प्रांती तो म्लेच्छ व्यापारी शिरला, त्याला त्याला त्या म्लेच्छाचा विटाळ होऊन त्या त्या हिंदू गावाची जात गेली अशी रूढी पडती तर ती आपत्ती खरीच, पण पुष्कळ अंशी ती इष्टापत्ती तरी होती. पण एखादा कासम किंवा क्लाइव्ह हिंद प्रांतात आला आणि त्याने त्याचा उभा व्यापार किंवा उभे राज्य घशात घातले तर त्याचा विटाळ आम्हा हिंदूंना होत नसे. त्याने आमची जात जात नसे, तर ती केव्हा जाईल तर एखादा हिंदुनर म्लेच्छ देशात जाऊन तिकडेच धन वा सत्ता संपादून त्यायोगे आपली मातृभूमी सधनतर आणि सबलतर करण्यासाठी तो परत स्वदेशी आला म्हणजे!

**जात राहिली पण धर्म गेला,**

म्लेंच्छ व्यापाऱ्यास त्याच्या वस्तू स्वदेशी आणण्यासाठी, एरवी जावयाला मिळणार नाहीत अशा, कित्येक सवलती हिंदूंनी दिल्या. पण स्वदेशाचे हिंदू व्यापारी परदेशात हिंदची वस्तू विकावयास आणि हिंदू वाणिज्य प्रसारावयास जाऊ लागले तर, शत्रूसही घालू नयेत अशा अडचणी, त्यांच्या मार्गात घातल्या असल्याच्या या आत्मघातक भाबडेपणाची शेवटी इतकी पराकाष्ठा झाली की मलबारच्या राजास आपले काही विश्वासाचे लोक अरबांच्या वाणिज्य व्यवसायात प्रवीण व्हावे असे जेव्हा मनात आले, तेव्हा त्या जातीच्या हिंदूंनी अशी पोक्त युक्ती काढली की, दरवर्षी हिंदूंच्या प्रत्येक कुटुंबामागे एकेकाने मुसलमानी धर्म स्वीकारावा आणि नौवाणिज्य शिकावे! कारण तो हिंदू आहे तोवर त्यास समुद्रवाणिज्य शिकणे निषिद्धच असणार. समुद्र ओलांडताच त्याची जात जाणार! म्हणून जात राहावी यास्तव धर्मच सोडून दिला! सरपण हवे म्हणून हातपाय कापून चुलीत घातले! बायकोचे दागिने हवे म्हणून बायकोलाच विकून टाकली! जात राखण्यासाठी बनत गेलेले तेच हे 'मोपले' आज त्याच जातिवाल्या हिंदूंचा निर्वंश करण्यास यानंतर लांडग्यांसारखे तुटून पडत आहेत! फार काय

सागरे घचिन असाच्या अद्भुत दैवप्रसादाने दिल्लीचे सिंहासन चूर्ण करणाऱ्या सदाशिवरावभाऊंच्या त्या पथकात त्या काळी लंडनचे सिंहासन चूर्ण करण्याची शक्ती जर असती आणि त्याने दिल्लीच्या प्रमाणेच विलायत जाऊन लंडनच्या सिंहासनावर विश्वासरावास चढवून राज्याभिषेक करून घेतला असता तर विलायतमध्ये हिंदुपदपातशाही स्थापन होती!! पण ते दोघे हिंदू मात्र विदेशगमनाने त्यांची जात जाऊन, अहिंदू होते!!!

## पराक्रमाचा संकोच

अगदी चिमटी मनाच्या अकराव्या बाराव्या शतकापर्यंत जातिभेदाच्या भयाने आमच्या नाड्या आखडत आल्या असताही विदेशगमननिषिद्धतेच्या परमावधीला तो रोग पोचला नव्हता, तोवर मद्राच्या पांड्य चोळांच्या सेना विदेशांतही हिंदू राज्ये चालवीत होत्या. बंगालच्या दिग्विजयी पाल राजाने त्याच वेळी ब्रह्मदेशाकडे पेगूवर स्वारी केली. नुसते 'मनस्वे स्थलधर्मेना' नव्हे तर अगदी मोठे प्रबळ नौसाधन (आरमार) घेऊन 'जलधर्मेना' प्रस्थान केले आणि ब्रह्मदेशाकडे पेगूचा विजय करून येता येता अंदमानादिक त्या समुद्रामधील सारी बेटे हिंदू साम्राज्यात समाविष्ट करून तो परत आला पण पुढे जेव्हा तो महासागरसंचारी हिंदू पराक्रम घरच्या सिंहिणीला बेडक होऊन बसला तेव्हा पराक्रम (पर + आक्रम), बाहेरच्या परशत्रूच्या देशावरच चढाई करणे, हा शब्दच हिंदूंच्या कोशातून लुप्त झाला. शक्यतेचा मूळ सुगम आकांक्षेच असणार. पराक्रमाची, खऱ्या दिग्विजयाची, नवी राज्ये संपादण्याची, आपली सत्ता आणि प्रभाव सप्तद्वीपा वसुंधरेवर दिग्दर्शी करण्याचा, आकांक्षाच जेव्हा 'जातीच्या' हिंदूस पाप झाली तेव्हा त्यास दिग्विजय करण्याची शक्यताही दिवसदिवस नष्ट होत गेली. आकाशात उडण्याची साहसी सवय पिढ्यानपिढ्या नष्ट झाल्याने ज्यांचे पंख पंगू झाले आहेत असे हे हिंदू पराक्रमाचे कुक्कुट आपल्याच 'जातीच्या' अंगणास जग मानून त्यातच टोलाटोलीने आरवत बसले आणि ते कधी? तर आततायी पराक्रमासही पुण्य मानणाऱ्या मुसलमानी गिधाडांनी आणि युरोपियन गरुडांनी सर्व जगाचे आकाश नुसते झाकून टाकले तेव्हा! अशा स्थितीत यांच्या झेपसरशी ते अंगणातील कोंबडे पिसणच्या पिसांना

फडफडून गतप्राण झाले तर काय आश्चर्य !

## मराठी साम्राज्याचा क्षय

केवळ अगदी शेवटच्या हिंदू साम्राज्याचा, आपल्या महाराष्ट्रीय हिंदुपदपातशाहीचा, पतन काल घ्या. आपली पूर्वीची साम्राज्ये आणि स्वातंत्र्य जाण्यास केवळ जातिभेदच कारण झाला हे विधान जसे अतिशयोक्तीचे होईल. तसेच मराठी राज्य केवळ जातिभेदानेच बुडाले हे विधानही अतिशयोक्तीचे होईल, परतु हे विधानही तितकेच विपर्यस्त न्यूनोक्तीचे होणारे आहे की, आपली जी हिंदुपदपातशाही मूठभर अिंग्रजी पल्टणींच्या पायाखाली तुडविली गेली, ती अितकी निर्बल होण्यास जातिभेदाचा क्षय मुळीच कारणीभूत झालेला नाही ! समुद्रगमननिषेध हे या भयंकर क्षयाचे अेक अुपांग देखील विचारात घेतले असता मराठी साम्राज्यकाळीमुद्धा आपले सामाजिक नव्हे तर राजकीय बळदेखील या भयंकर व्याधीने किती निर्जीव करून सोडले हे तात्काल ध्यानात येणारे आहे. ज्या वेळी अिंग्रजांनी देशातील अुभा आयात-निर्यात व्यापार हस्तगत केला होता, त्या वेळी त्यांच्या देशांत आपल्या व्यापाराची अेकही हिंदू पेढी नव्हती. शेवटच्या रावबाजीच्या अंतःपुरात दासी किती, त्यांत बोलकी कोण, विश्वासघातक होण्यासारख्या कोण, येथपर्यंत आपल्या देशाची खडान्‌खडा माहिती त्यांच्या पुण्याजवळील ' वेटा ' मधल्या लेखनालयात टिपलेली असता अिग्लंड देश आहे कोठे, अिंग्रजांचे राज्य आहे किती, त्यांचे शत्रू कोण, त्यांचे बल किती अशी थाअुक माहिती देखील आम्हांस प्रत्यक्ष पाहून सांगेल असा अेकही हिंदू त्यांच्या देशात गेलेला नव्हता ! फ्रेंचांची माहिती अिंग्रज सांगेल ती आणि अिंग्रजांची फ्रेंच सांगेल ती. त्या स्वार्थप्रेरित विपर्यस्त माहितीवर सारी भिस्त !

## मुकुटापायी मुकुट दवडले

अेक हिंदू राघोबादादाचा वकील कोठे अेकदाचा विलायतेस जाअून आला तो त्याच्या त्या भयंकर जात गेल्याच्या पापाचे प्रायश्चित्त त्याला ' योनि प्रवेश ' प्रायश्चित्त करवून आणि पर्वतावरील पहाडांच्या कडेलोटालगतच्या योनीसारख्या आकृतीतून बाहेर येताच

तो पुनीत झालासे मानून परत घेण्यात आले. पाप भेकपट मूर्ख आणि त्याचे प्रायश्चित्त शतपटीने मूर्खतर ! जसे हजारो आंग्रज हिंदुस्थानात आले, तसे लाखो हिंदू व्यापारी, सैनिक, कारखानी युरोपभर जात येत राहते तर काय त्यांच्या कला, त्यांचा व्यापार, त्यांची शिस्त, त्यांचे शोध आम्हास आत्मसात करता आले नसते ? काळे, डॉ, हिंगणे असले पदीचे हिंदू राजदूत जर लंडन, पॅरिस, लिस्बनला राहते तर काय आमच्या यादवीचा जसा त्यांनी लाभ घेतला तसा त्यांच्या यादवीचा आम्हास घेता आला नसता ? पण आडवी आली ही ' जात '–हे ' सोवळे '–हा ' मुकुट ' ! हा मुकुटापायी मुकुट दवडले मुकुट ! ! शेवटच्या बाजीरावाने मुकुट दवडला, पण त्यायोगे त्याची जात गेली नाही; पण जर का तो वर उल्लेखिलेल्या पाद्य राजासारखा लंडनवर चालून जाता तर मात्र त्याची जात नि.संशय गेली असती.

## समाजाचा देह पोखरणारे जातवेड

भारताचे स्थलबल असे निर्बल झाले. भारताचे जलबल – त्या रणतरी – ती नौसाधने, जी अगदी दहाव्या शतकापर्यंत सागरासागरावर हिंदुध्वज डोलवीत संचार करीत होती, ती तर टाचच बुडाली· त्या महासागराच्या पाण्यात नव्हे, अहिंदू पक्षीयाच्या खड्गाचे पाण्यात नव्हे, तर या हिंदू जातवेडाच्या सभ्येच्या पळीतील पाण्यात ! आजही हे सात कोटी अस्पृश्य, मुसल्मानांच्या संख्येइतकेच हे सख्खेबल, ओंगाळा तुटलेल्या हाताप्रमाणे निर्जीव होऊन पडले आहे—या जातवेडाने ! कोट्यवधी हिंदू बाटले जात आहेत—या जातवेडाने ! हे ब्राह्मणेतर, हे सत्यशोधक फुटून निघाले—या जातवेडाने ! ब्राह्मणाच्या जात्यहंकाराचा केव्हा केव्हा अगदी ठीक ठीक समाचार घेताना जो ब्राह्मणेतर सत्यशोधकपंथ समतेच्या अंशाच्या आचार्यांसही लाजवील असा उदात्त तत्त्वाचा पुरस्कार करतो, त्यातील काही लोक तेच समतेचे अधिष्ठान महार–मांग मागू लागताच अगदी भंगाजीबुवासारखे पिसाळून त्यांच्यावर लाठी घेऊन धावतात. या जातवेडामुळे ! ब्राह्मण मराठ्यांचे ब्राह्मण बनू पाहतात, मराठे महारांचे ब्राह्मण बनू पाहतात, महारा मांगाचे ब्राह्मण बनू पाहतात ! हे जातवेड एका ब्राह्मणांचेच अंगी मुरलेले नसून अब्राह्मण चांडाळापर्यंत सुम्या हिंदू समाजाचेच हाडीमासी रुजले आहे !

अखिल समाजदेह या जात्यहंकाराच्या, या जातिमत्सराच्या जातिकलहाच्या, क्षयाच्या भावनेने जीर्णशीर्ण झालेला आहे.

## अुपेक्षा केली तर ?

हिंदु राष्ट्राच्या आजच्या आत्यंतिक अपकर्षाचे हे आजचे जातिभेदाचे विकृत स्वरूप जरी अेकमात्र कारण नसले तरी अेक अनुपेक्षणीय कारण आहेच हे वरील अत्यंत त्रोटक दिग्दर्शनावरूनही स्पष्ट दिसून येअील आणि म्हणून अशा स्थितीत आपल्या अपकर्षाच्या त्या बाह्य कारणाचा नायनाट करण्याचा प्रयत्न चालला असतांच हा अंतर्गत क्षयही नष्ट करण्याचा प्रयत्न करणे हे आपणा सर्वांचे अेक अगदी अवश्य कर्तव्य होअून बसले आहे. जे हिंदुराष्ट्राचे स्वातंत्र्य आपणास मिळवावयाचे आहे ते जातिभेदाने जर्जर झालेल्या या आपल्या राष्ट्रपुरुषास जरी अेक वेळ मिळविता आले तरी या रोगाचे जोवर निर्मूलन झाले नाही तोवर अेका बाजूस ते मिळविणे शतपट दुर्घट होणारे असून दुसऱ्या बाजूस ते मिळवितांच पुन गमावण्याचाही पाया भरत जाणार आहे

* * *

## ३. मंत्रबळ नव्हे, यंत्रबळ !

आपला देश आज ज्या युगात प्रवेशू लागला आहे, ते युग युरोपमध्ये दोनशे वर्षांपूर्वी चालू झाले. म्हणून युरोपच्या दोनशे वर्षे आपण मागे पडलेले आहोत. ह्या युगाचे अर्थशास्त्रीय नाव यंत्रयुग! युरोपमध्ये हे यंत्रयुग दोनशे वर्षांपूर्वी जेव्हा वाफशक्तिप्रभृति शोधामुळे आविर्भवले, तेव्हा त्या यंत्रप्रभावाच्या धक्क्या सरशी तिकडेही त्या वेळच्या रूढ विचाराना नी आचाराना चक्कर आल्या सारखे होऊन गेले. मनुष्यजातीवर हे यंत्रयुगाचे भयंकर संकट आले आहे, यामुळे मनुष्य माणुसकीसच मुकल्यावाचून राहणार नाही, धर्माचे वाटोळे होणार, मनुष्याचे जीवन यंत्रासारखेच हृदयशून्य, कृत्रिम नी कलाहीन होऊन त्यांच शरीरदेखील दुबळे नी परतंत्र बनणार, फार काय, ज्या आर्थिक संपन्नतेच्या नी सुखसोयीच्या लालसेने मनुष्य यंत्राच्या मागे लागला, ती आर्थिक लालसाही यंत्राच्या चाकात सापडून चूर होईल, या यंत्रामुळे मनुष्य पोटभर खायलाही न लागता भुकेला भिकेस लागेल, अशी अेकच कोल्हेकुई त्या वेळच्या पुराणप्रिय स्थितीतील नी धर्मभोळ्या अशा वर्गाने साऱ्या युरोपात चालू केली होती. "Back to Nature" हे त्याचे सूत्र होते 'यंत्रामुळे बेकारी वाढते आणि मनुष्य भिकेस लागतो,' असे मुद्दे अर्थशास्त्री ओरडले. 'यंत्र हीं सैतानाची युक्ती! देवाच्या थोरवीस कमीपणा आणणारी ही रावणी हाव!' असे धर्मशास्त्री किंचाळले!

न्यूनाधिक दोनशे वर्षांपूर्वी यंत्रशक्तीचा प्रबळ आविर्भाव युरोपात झाला तेव्हा त्याचा असा जो विरोधच विरोध त्या लोकांमध्ये जिकडेतिकडे झाला, त्याचीच पुनरावृत्ती आज आपल्या या दोनशे वर्षे मागाहून, प्रगतीच्या त्या मिट्टूवर येऊन पोचलेल्या लोकांत चालू झाली आहे. यंत्र हे मनुष्यास मिळालेले वरदान नसून शाप होय, अशी ही आरडाओरड निर्मिती तथ्य वा अतथ्य आहे हे विवेचिण्याच्या कामी आपणास योजावे लागणारे कोटिक्रम आणि द्यावे लागणारे पुरावे युरोपच्या आजच्या जनतेला अगदीच शिळे नी

अुद्भवूं लागतील, कारण की, ते आक्षेप प्रत्याक्षेप, ते वादविवाद त्याच्याकडे नामशेष झाल्यासही शेंकडो वर्षे अुलटून गेली आहेत. पण युरोपकडे आज अगदीं शिळ्या, अडाणी, वेडगळ ठरलेल्या त्याच त्याच आक्षेपांना अगदी नवीनांतील नवीन म्हणून ठिकठिकाणचे अनेक गावढळ संप्रदाय आपल्या इकडे प्रचार करूं लागले असल्यामुळे, यंत्रशक्तीवरील त्या आक्षेपांना खोडून काढण्यासाठी यंत्रनिष्ठ प्रगतीलाही युरोपमध्ये पूर्वी दिल्या गेलेल्या त्याच त्याच प्रत्युत्तरांची पुनरुक्ती करणे भाग आहे.

मनुष्यजातीचे कोणते पाप असावे याविषयी या 'आतल्या आवाजा'स फोल लावीत आहेत! — तर तिकडे शंकराचार्यादि धर्माचे सर्वाधिकारी, ते भूकंप अस्पृश्यतानिवारणाच्या पापामुळे घडतात म्हणून शास्त्रांची शपथ घेऊन सांगत आहेत! ज्या राष्ट्राचे सर्वाधिकारीच इतके धर्ममोळे त्या राष्ट्रातील सामान्य जनतेच्या देवभोळ्या भाबडेपणाचे वर्णन काय करावे? युरोपमध्ये आज १९३६ वा सन चालू आहे तर आमच्या इकडे प्रगतीचा १७३६ वा!

देवभोळेपणा म्हणजे प्रत्येक घटनेचे कारण देवाची लहर, राग वा लोभ आणि त्या घटनांपैकी संकटघटना टाळण्याचा उपाय म्हणजे देवाला प्रसन्न करणे! अर्थात त्याचे यंत्र म्हणजे प्रार्थना, पूजा, सत्यनारायण, जपजाप्य, इत्यादि! पाऊस पडत नाही? ऋग्वेदातील मंत्र म्हणून वैदिक देवतेस आराधा! नौका बुडत आहे? वरुणसूक्त जपून समुद्रास नारळ वहा! प्लेग आला? म्हसोबापुढे बोकड मारा! नाहीतर 'औदला' गाजीची कुरबाणी करा खुदा भला करेगा!

परंतु यंत्रशीलपणा हा, या सृष्टीतील प्रत्येक भौतिक व्यापार ठराविक सृष्टि नियमाचे फलित होय, आणि जर त्या नियमाप्रमाणे आपण ते ते घटक जुळवून आणू शकलो तर ते ते कार्य घडलेच पाहिजे, ह्या निष्ठेवरच कार्य तो अधिष्ठापिलेला असणार. अमुक अंशापर्यंत पाण्याचे उष्णतामान वाढविले की त्याची वाफ झालीच पाहिजे, मग त्या वेळी तो यात्रेकरू निमाज पढण्याचे विसरल्यामुळे अल्ला रागावलेला असो वा संध्या करण्याचे टाळल्यामुळे देव चवताळलेला असो! त्या ठराविक पाण्याची त्या ठराविक उष्णतेचा स्पर्श होताच ठराविक प्रमाणाची वाफ झालीच पाहिजे. देवाने का म्हणाना, पण जे सृष्टिनियम एकदा घालून दिले त्यात देवदेखील पुन्हा बदल करू शकत नाही. आल्याच चार पगार भरीस घातले की आपल्या बाजूचा निकाल देणाऱ्या एखाद्या य:कश्चित कलेक्टरलाही आपण अन्यायी नि लाचखाऊ मानतो. पण चार नारळ न दिले की सगळ्या गावाला, त्यातील भल्याभल्यांनासुद्धा प्लेगने ठार मारण्याइतका भयंकर लाचखाऊपणा देवाच्या माथी मारण्यास जो कचरत नाही तो धर्मभोळेपणाच देवाच्या देवपणास खरा काळिमा लावणारा असून ठराविक सृष्टिनियम लाचलुचपतीद्वारा देव कधीही बदलीत नाही, ही यथार्थ निष्ठाच जितकी सत्य तितकी धर्म्यही आहे. अशी विज्ञानजन्य निश्चिती

हीच यंत्रशालीपणाची जननी असते. यामुळेच देवभोळेपणा ज्या मानाने घटतो त्या मानाने विज्ञानजन्य यंत्रशीलपणा त्याच्यात वाढतो.

## नाना फडणविसाची अेक गोष्ट

वर अुल्लेखिलेल्या तत्त्वाचे अुदाहरण म्हणून पेशवाअीतील अेक ल्हानशी गोष्ट अगदी सांगण्यासारखी आहे. ज्याच्या अतुल बुद्धिबळाने हिंदुपदपादशाहीची सूत्रे त्याच्या हाती टिकली तोवर तरी " जलचर हैदर निजाम अिंग्रज रण करिता थकले ॥ त्यांनी पुण्याकडे विलोकिले ते सपत्नीक मुकले ॥ " असा मराठ्यांच्या सामर्थ्याचा दरारा यच्चावत अहिंदूंवर बसविला होता, त्या नाना फडणविसाची अशी अेक गोष्ट अैतिहासिक कागदोपत्री सापडली आहे की – नानांनी अेकदा काशीस काही पुण्यकृत्य करावे या हेतूने कर्मनाशा नावाच्या तेथील नदीवर पूल बांधविण्याचे काम चालू केले. पण आरंभीच वाळू नी पाणी यांच्या अडथळ्याने पाया काही टिकेना. त्यांच्याकडे ते बांधकाम सोपविले होते, त्या काशीच्या हस्तकांनी ( गंगामाय प्रसादविण्याचा नी तिच्यावर पूल बांधून घेण्यास ती मान्य व्हावी म्हणून त्या रखडलेल्या गंगामाअीला चुचकारण्याचा त्याच्या परिपाटातला जो ठराविक अुपाय तो याचून ) ब्राह्मणाकरवी तारीख ६–९–१७९७ या दिवशी अनुष्ठानास आरंभ केला! अनुष्टुपाची भर टाकून टाकून ते ब्राह्मण थकले, पण पाया धर धरीना. बिचाऱ्या ब्राह्मणांच्या ताडचे पाणी पळाले, पण पायाखालचे पाणी पळेना, आटेना! पायाखाली वाळू नी पाणी यांची अडचण आली आहे आणि ती निवारण्यासाठी अनुष्ठानाचा अुपाय योजिला आहे, ही बातमी अिकडे नानांना जेव्हा पुण्यास कळली तेव्हा त्यांनी अनुष्ठान बंद करविले आणि अिंग्रजाकडून वेकरनामक यंत्रज्ञ ( अिंजिनियर ) आणविला. त्याने कळीचे यंत्र कलकत्त्याहून मागविले आणि ते लावून पाणी वोलता वोलता आटवून, वाळू टाकून, पक्का पाया टाकून पूल उभारला! जलदेवतेची कळ जिथे पाहिजे तिथे दाबली जाताच ती झटकन शुद्धीवर आली! धर्मभोळेपणाच्या अनुष्ठानाने जे भौतिक सृष्टिनियम, त्यांच्या व्यापारात लवलेश फरक होत नाही पण त्या नियमांची जी 'कळ' त्यांना राबविणारे जे यंत्र, ती कळ दाबताच त्यांचे व्यापार हवे तसे चापून करून

त्या आळ्याच्या शिल्पशास्त्रीय बळकटीपेक्षा अधिक वा उणे ठरणे शक्य नाही. परंतु आडे ठोकताना त्याला समंत्रक पूजल्यावाचून, त्या घराची शकुनावर मुहूर्तमेढ रोवल्यावाचून, वास्तुशांती केल्यावाचून आमच्या मनाला ते घर मक्कम झाल्यासारखे केव्हाही वाटणार नाही! महिनोगणती आम्ही त्या घरात राहायला जाणार नाही. कारण वास्तुशांती झाली नाही! आमचे मन आम्हास सारखे खात राहणार, भीत राहणार! पण आमच्या हे ध्यानात येईना की, मुहूर्ताला भीक न घालता नी वास्तुशांत न करता उभारलेले हिंदुस्थानातील इंग्रजांचे राजवाडे, राज्यकार्यालये, प्रवासी बंगले, गावच्या चाव्यादेखील आमच्या तशा बांधकामाहून कधीतरी कमी बळकट ठरल्या आहेत काय? किंबहुना अगदी सुमुहूर्तावर बांधलेले आणि वास्तुशांत शास्त्रोक्तपणे केलेले आमचे शनिवारवाडे आज ढासळून मातीत मिळाले असता विनशकुनी, विनवास्तुशांती विनधर्मी अशा या इंग्रजांची 'गव्हर्नमेंट हाउसे' मक्कमची मक्कम! त्याचे ढेकूळदेखील, त्या उणीवेने म्हणून, ढासळत नाही! उलट त्या शास्त्रोक्त वास्तुशांत केलेल्या आपल्या हिंदुपदपादशाहीच्या श्रीमंत पंतप्रधानांचे वा महाराजांचे वाडे, त्या वास्तु, 'अगदीच धुळवाण होऊ देऊ नका, त्यांवर स्मृतिपट तरी असाधा लावा' अशी हृदयद्रावक विनवणी करीत त्या इंग्रजांच्या त्याच विनवास्तुशांत, विनमुहूर्ती गव्हर्नमेंट हाउसच्या दारापुढे आज्ञास उभे करावे लागत आहेत!

आम्ही आमचे सिंहगड, सिंधुगड, रायगड असले शेकडो प्रचंड दुर्ग; आणि मुसलमानांनी त्यांचे दिवाणी आम नी दिवाणी खास आमच्या हिंदु वा मुस्लीम शास्त्रानुसार शकुनवंती नी रमल पाहून, वेदांतील सूक्ते नी कुराणातील आयते निर्विघ्नतेसाठी भिंतीभिंतीवर कोरून चिन्तून धर्मशास्त्रदृष्ट्या शक्य तितके बळकट केले – पण आज आधी पुसून मुहूर्तावर बांधलेले सारे प्रचंड दुर्ग नी दिवाणखाने धुळीस मिळालेले आहेत! परंतु शकुन, रमल, वेद, कुराण तर काय, पण प्रत्यक्ष देवासही न मानणाऱ्या (Anti-God) रशियाचे प्रचंड दुर्ग, ती विमाने नी वियाने अक्षरशः वाऱ्यावरदेखील बळकटपणे तरंगत आहेत!

**खरोखर, खडकावर बांधलेल्या आमच्या विशाळगडापेक्षा त्यांचे वाऱ्यावर बांधलेले विशाळगड आज अधिक बळकट ठरत आहेत!**

यावरून या जगातील भौतिक संपत्ती नी सामर्थ्य हे तरी भौतिक सृष्टि-

विज्ञानाच्याच अढळ पायावर अुभारलेले असल्यास टिकते, धर्मशास्त्रीय देव भोळेपणाच्या डोलाऱ्याचे नी देव्हाऱ्याचे विज्ञान अेका ठोकरीसरशी ठिकऱ्या अुडविल्यावाचून राहत नाही, हे स्पष्ट होत नाही काय ?

## यंत्रे तितकी देवते ! हत्यारे तितके देव !!

आगगाडीचे अिंजन म्हणजे काय ? त्या प्रकरणी जे वाष्पगति स्थिति विज्ञानाचे ठाम सृष्टिनियम वैचारिक क्षेत्रात होते त्याची ती घनरूपेली मूर्तीच व्यवहारात अवतरली ! जोवर त्या ठाम नियमानुसार ते यंत्र घडलेले नी चालविलेले आहे तोवर आमच्या अिच्छेबाहेर त्या यंत्राला स्वतंत्र अशी अिच्छाच नाही. देवाने जर मनुष्य घडविला असेल तर त्या अर्थी मनुष्य हाच यंत्राचा देव म्हणावयास हरकत नाही. परंतु आमच्या देवभोळेपणाचा वेडगळ अतिरेक अितक्या थराला गेलेला आहे की, ज्याचा मनुष्य हाच वरील अर्थी देव आहे – त्या यंत्रालासुद्धा आम्ही आमचाच अेक देव मानू लागलो ! आजदेखील आमच्या लाखो लोकात यंत्राची नी हत्याराची पूजा होत आहे ! सुतार रंध्याची, गवंडी करणाची, सैनिक मालाकिरचीची, गवळण रवीची, घरधनीण अुखळ मुसळाची घरोघर पूजा करीत आहे. *नाळकापाळीन केवळ सटवाईची पूजा नसते, तर नाळ* कापावयाच्या कातरीसदेखील देवतासारखी माडून पुजावी लागते ! जणू काय त्या कातराला स्वत ची अशी अिच्छा असते, राग लोभ-मान-अपमान कळतात, आणि म्हणून त्या कातरीला न तुष्टविल्यास ती रागाने नाळ कापायचे साडून पटकन् बाळाचा गळाच कापणार आहे ! आता मात्र सटवाअीशी अेक नवीनच तडजोड झाल्यासारखी दिसत आहे, ती ही की, घरच्या बाळंतपणीन तेवढे सटवाअीचे राज्य, तिथे बाळंत झाल्यास कातर पूजिणे प्रभृति जुन्या मानपान पूजा पार पाडल्या पाहिजेत पण सार्वजनिक प्रसूतिगृहात बाळंत झाल्यास तिथ त्या मानाच्या गोष्टींची सटवाअीने सूट द्यावी. प्रसूतिगृहातील कातर न पूजिली तरी तिन नी सटवाअीने हू का चू करता कामा नये प्रसूतिगृहातील ती चकचकणारी डॉक्टरी चाकू, सुऱ्या, आदि शस्त्र पाहताच सटवाअीच गर्भगळित होताना दिसते ! सारे मानापमान, प्रतिष्ठा टाकणाऱ्या प्रसूतिगृहातील बाळंत पणाकडे दुरून बघायला देखील ती भिते. तेथील बाळंतपणी सटवाअीचे

काहीअेक लागत नाहीत! न सोवळे, न कातर पूजा, न शांतिपाठ पण तिथे बाळबाळंतिणींना अुगीच सतावण्याची सटवाअीची काय छाती आहे! तिची आटनपदेखील डॉक्टरी प्रसूतिगृहाचा अुंबरा ओलांडून आत येत नाही

## युरोप अजिंक्य झाले ते मुख्यत यंत्रबळे!

जोवर युरोप असे आम्हा याचारखेच देवभोळे होते, तोवर तेही आम्ही आज आहोत तसे दुबळे होते दोनशे वर्षांच्या आगमागे त्याचा देवभोळेपणा हटत चालला, तसतसे त्याचे बळ, संपत्ती, साम्राज्य भरभराटत चालली पण हिंदुस्थानच तर नव्हे अवघा आशिया त्याच देवभोळेपणाच्या गुंगीत खितपत पडला, त्यामुळे विज्ञानाची वाट त्यास सापडलीच नाही युरोप सृष्टिशक्तींना आपल्या प्रगतीच्या रथास जुंपून भरधाव चालला असता, आशिया त्या सृष्टिशक्तींना पूजीतच राहिला त्यामुळे आशियात यंत्रशीलपणा असा आलाच नाही पाहा, गत्या हजार वर्षांमध्ये हिंदूत काय किंवा मुसलमानात काय, अेकंदरात वैज्ञानिक शोध असा अेकही लागलेला नाही! नवीन यंत्र असे, हत्यार असे, बळ असे, गत्या हजार वर्षांत आम्ही जवळ जवळ अेकही अुद्भवली नाही! साधी आगपेटी, साधी चाकी (सायकल), साधे घड्याळ, साधा शिळाछाप, साधे छायाचित्र — पण युरोपने शोधले तेव्हा सुचले आम्हास काही सुचले नाही, हिंदू धर्मभोळेपणाची नी मुसलमान धर्मवेडेपणाची निद्रा पिअून झिंगून पडलेला मुसलमानांच्या दिल्लीच्या बादशहाला राजवैद्य फिरंग्यांकडून मागवावा लागला, तर अेका पुलासाठी पाणी आणावयासाठी हिंदुपतींच्या पेशव्यांस अेक यंत्रशिल्पी — अेक अिंजीनिअर — अिंग्रजांकडून मागवावा लागला! मुसलमानांचे सारे देवगंडे पीर, मुल्लाहकीम, गंडातावीज नी याची दरा करू शकले नाहीत ती त्या फिरंग्याच्या शस्त्रवैद्याने दूर केली अनुष्ठान जपतपांनी जो पुलाचा पाया हिंदूंना घालता आला नाही, तो त्या फिरंगी अिंजीनिअरने घालून टाकला! पण तरीनरोन फिरंग्यांच्या यंत्रशीलपणाने त्यांचे विज्ञान कसे वाढत चालले आहे, त्याची अेकेक फळ त्यांचे बळ कसे दुर्जेय बनवित आहे आपणास दुर्लक्षित नाही, हे त्या वेळी आमच्याकडे कोणाच्या लक्षात यावे तसे आले

नाही. यंत्रविद्येचा ओनामादेखील शिकवयास कुणी युरोपमध्ये गेला नाही. जग जाते ना आमची समुद्र ओलांडण्याने !

## आमचे देवभोळेपण अजून सुटत नाही

पण आमच्यात पूर्वी सामर्थ्य असताही आम्ही जगावर चालून गेलो नाही याचे प्रायश्चित्तच आम्हास देण्यासाठी जग आमच्यावर चालून आले. युरोपच्या अवाढव्य यंत्रकळांच्या कैचीत आमच्या राष्ट्राचा, स्वत्वाचा, आमच्या अेका गोष्टीवाचून साऱ्या अितर गोष्टींचा चुराडा अुडाला ! अेक गोष्ट तेवढी जी आमची म्हणून अजूनही टिकली आहे, तिला युरोपचे यंत्रकळही अजून चिरडू शकले नाही, ती म्हणजे आमचा धर्मभोळेपणा ! भौतिक संकटे निवारण्याचे, सृष्टिशक्तींना राबविण्याचे, *भौतिक सामर्थ्य संपादिण्याचे विज्ञान आणि साधन म्हणजे यंत्र,* हे अजूनही आम्हास कळत नाही. अजूनही भूकंपावर अस्पृश्यतानिवारण हा उपाय, सर्व राष्ट्रीय अरिष्टावर अनुष्ठान हा अुपाय, कोणी कमला नेहरू आजारी पडल्या तर त्यांच्या क्षयावर प्रार्थना हा अुपाय, साथ घालविण्याचा बोकड मारणे हा अुपाय, मशीनगन्सचा मारा थांबवावयाचा तर तिच्यापुढे तिच्या गोळ्यांच्या टप्प्यात शांतपणे नसून मरून जाणे आणि त्या मरणाने त्या मशीनगनला दया आणणे हा अुपाय ! अजूनही आमच्या राष्ट्राचे देवभोळेपण सुटले नाही आणि म्हणूनच या नव्या यंत्रयुगाचे धीटपणे स्वागत करून युरोपच्या अजिंक्य सामर्थ्याची ती किल्ली युक्तिप्रयुक्तीने हिरावून घेण्याच्या ठायी हे लोक त्या यंत्रयुगासच अेखाद्या मक्षासारखे भिऊन भूतकाळाच्या भुयारात अधिक खोल खोल जाअून दडत आहेत ! यंत्राने मनुष्य दुबळा होत आहे, यंत्राने मनुष्य भुका मरत आहे, अशी या देवभोळ्या लोकांची कोल्हेकुई सारखी चालली आहे. जणू काय ज्यांच्या टाचेखाली आम्ही ठेचले गत आहो ते युरोप, यंत्रकळांचे धुरीण ते युरोप दुबळे आहे, भिकेस लागले आहे ! आणि आमची पाण्याची पिनरे समळ आहेत ! हे अर्धपोटी, अर्धनग्न, दुष्काळग्रस्त नी रोगग्रस्त आमचे राष्ट्र – यंत्रयुगाच्या शेदोनशे वर्षे अजून मागे रेंगाळत आहे, म्हणूनच बलिष्ठ, सुखी नी सतुष्ट आहे !

या लेखाच्या आरंभीच्या पहिल्याच छेदकात यंत्राविरुद्ध आमच्या जुनाट

मानडेपणाने घेतलेल्या ज्या आक्षेपांना अुल्लेखिले आहे त्यांना शक्य तितक्या लवकर प्रतिकारले पाहिजे समाजकारणात विज्ञानाचे वर्चस्व स्थापिले पाहिजे, तसेच आपल्या राष्ट्राच्या अर्थकारणातही त्याच विज्ञानाची मूर्ता जे यंत्र त्या यंत्राचे वर्चस्व स्थापिले पाहिजे

चापणाऱ्या गिरण्या हे यंत्र अर्थातच त्याच्यामुळे देशावर भयंकर संकट ओढवले आहे, त्या गिरण्यांतील कापड वापरू नका ! अशी आरडाओरड गल्लीगल्लीं चालली होती, चालली आहे टकळी चालविणाऱ्या आमच्या सेना त्या 'टकळी'च्या प्रभावे यंत्राचे सारे यंत्रबळ तुच्छविण्यास सज्ज्या आहेत चरखा चरख्याच्या चक्राओढीने लँकेशायरच्या नी साऱ्या जगातील गिरण्यांना कुलुपे ठोकली जातील अशी प्रतिज्ञा करणाऱ्या सेनानींचा ताफाचा ताफा राष्ट्रीय सभेच्या अुच्चासनावर चरखे फिरवीत बसलेला आहे आणि आता त्याच्या जोडीला दळणकांडणाच्या यंत्रांच्या संकटापासून या देशास रक्षावयासाठी कंबर कसून आलेल्या नव्या सेनानींचा तांडा त्या राष्ट्रीय सभेच्या अुच्चासनावर कुणी जात्याने हाती दळीत नी कुणी अुखळात ताबूळ हाती कांडीत व्यग्र झालेले आढळण्याचाही संभव आहे अर्थकारणातील या मंडळाच्या पक्षाची मुख्य हाकाटी म्हणजे ' यंत्र नको ! '

**धर्मशास्त्रातील भाबडेपणाप्रमाणेच या अर्थशास्त्रातील भाबडे पणासही आजच्या जगात, ह्या यंत्रयुगात जर जगावयाचे असल तर, आपल्या राष्ट्राने ठोकरून दिलेच पाहिजे राष्ट्रीय प्रचाराची सूत्रे या देवभोळेपणाच्या, धार्मिक वा आर्थिक श्रुतिस्मृतिपुराणोक्ताच्या, या पुरातनाच्या हातून हिसकावून घेऊन ती नूतनाच्या, अद्यतनाच्या, हाती दिली पाहिजेत यंत्रयुगाविरुद्ध त्याच्या चाललेल्या भाबड्या हाकाटीची छाप ज्यायोगे राष्ट्रावर पडणार नाही आणि यंत्रबळाचा महती ज्यायोगे राष्ट्रास पटून ते विज्ञाननिष्ठ होअील, यंत्रशील होईल, असा प्रचार शक्य तितक्या नेटाने, निस्पृहतेने आणि निर्भीडपणे आता आरंभिलाच पाहिजे**

• •

### माणसाचे प्राबल्य यंत्राच्या बळावर

यंत्राचे साधन मनुष्याच्या हाती असल्यामुळे मनुष्याची हानीच हानी होत आहे, तो दुबळा बनत आहे, दुःखी बनत आहे, दरिद्री बनत आहे, यंत्र हा मनुष्यजातीला झालेला शाप होय, अशी यंत्राविरुद्ध जे ओरड करतात त्यांनी हे लक्षात ठेवावे की, **यंत्र, हत्यार, कळ म्हणजे शतपटीने अधिक कार्यक्षम झालेले मनुष्याचे अेकेक अिंद्रियच आहे!** कळ म्हणजेच अिंद्रियांची वाढलेली कार्यक्षमता. हत्यार म्हणजेच हाताहूनही दसहस्त्री असा आपला अेक जोडहात. यंत्र म्हणजे आपल्या मूळच्या शक्तीपेक्षा लक्षपटीने शक्तिमान झालेली आपली बहिश्चर अिंद्रिये! जर हत्यार, कळ, यंत्र नसते तर मनुष्य सृष्टीशक्तीवर आज चालवीत असलेली सत्ता चालवू शकता ना. अितके सांगणे म्हणजे यंत्रशक्तीच्या अुपयुक्ततेचे आदी अेक वर्णन होय. यंत्रावाचून, कळीवाचून मनुष्य या जीवनकलहात टिकूच शकता ना, कोल्हा-कुत्रा देखील, त्याला भारी होता, फाडून खाता! मनुष्यास झालेल्या यंत्रकळांच्या साहाय्याविषयी असे म्हटले तरी देखील अतिशयोक्ती होणार नाही की – **शरीराने पाहिले तर मनुष्य हा अत्यंत दुबळा, कळींनेच काय तो प्रबलतम ठरला!**

मूळच्या पिसाळलेल्या श्वापदांसह अरण्यात मनुष्याला पुन्हा अुभा केला तर त्याच्या स्वतःच्या देहाच्या बळे त्याला किती श्वापदांपुढे टिकाव धरता येअील ते अेकदा कल्पून पहा! सिंहासारखी नखे नाहीत, दाढा नाहीत, दात नाहीत, नुसत्या गर्जनेने सारे रान हादरून जाईल असा भीषण आवाजही नाही. साधा तर ससा मारण्यास जिन्की दमनगरे शिणवावी लागतात, तिथे देखील ह्या माणसाचा दुबळा पोळा फट फाडून गाळण्यास शिणवावी लागणार नाही. आगापुढे जशी काळी कावळा, तसा माणूस वाघापुढे! मनात येताच कचकच चावून गिळावा माणूस नुसत्या त्याच्या देहानिशी दुबळा यावास प्रतिकाराला असा अेकही अवयव माणसास नाही! हत्तीपुढे तर माणूस म्हणजे मुंगी! नुसत्या पायाच्या प्रचंड दाबाखाली चिरडावा किंवा त्या अजस्त्र सुंडेने धरून दाणकन् नारळासारखा आपटावा!

तरस, लाग, रानडुकरे यांच्यामुद्धा समोर अुभे राहण्याची त्यांची छाती नाही. रानरेड्याच्या दाताना प्रतिकारील असा त्याला कवही अवयव नाही. मग त्या शिकारी कुत्र्याचीनेच त्याला पाठीसारखेच भीती माणूस घावला वा दाचला तर शिकारी कुत्रा अेका हातीसरशी माणसास फाडून काढल्यास सोडणार नाही फार काय, अगदी, दुबळी, दीन, निरुपद्रवी जी गाय तिची डेरकोळ जर मनुष्याची शुद्ध लागली तर तीच आपल्या शिंगानी त्याचे पोट पाडला नाला पाड शकेल! रानरेड, रानरेल यांच्या त्या अुमत्त हुरुप्यासरशीच माणसाला पळ काढण्यावाचून जगण्याचा दुसरा मार्गच नाही ल्हान मखमाशी! पण त्या माशा त्याला अेकदा का झाल्या की त्यांच्या निघारी दशाच्या भयकर वदनानी तत्क्षणी माणूस मरून जाला – पण त्याना काही माणूस अुलट त्या वा गिळू शकत नाही, त्यांच्या मागे अुड शकत नाही वाळवाळगीच माणसाच्या रक्ताळ घावावर वा डाक्यावर, फटूवर मारता तशी चार्चा मारून अुडून जाअून वावरत करीत माणसाला अुलट वेडाअू शकता! अजगर त्यास नुसत्या आपल्या अजग्र देहाचे वळस घालून चरकासारखा पिळून काढता टीचभर पुरस त काय, पण त्याच्या पायाला कुठून पसे डसेल नी त्याला नाक्ता बोलता ठार मारील याचा नियम नाही! समुद्रनदनद्यामध्ये तर माणसाची दुदशा विचारायलाच नको! आत पाय घसरला की माणूस सुसरीच्या ना मासाहारी मायाच्या आहारी गलाच म्हणून समजाव! माणसाला मूळचे अग तीक्ष्ण सुळे नाहीत, पोट चिरून फाडून टाकणारी शिंगे नाहीत, कानतीचा कासडी किंवा गवत, पाला पाचोळा रक्त हाड न मिळेल ते पचवून नवणारे पोट नाही, थंडी निवारील अशी लोकरीची शाल अगी नाही, तिचा राठ कातडे नाही, घारासारखी दृष्टी नाही, मशासारखे परा सुद्धा नाहीत, गरुडासारखी अवचनीक्ष्ण चोच वा कठछेदक नखरे वा रक्तलिप्सु पन नाहीत, विषारी दात नाहीत दश नाही नागी नाही हिंदी लोकाना निसर्गाने नि शस्त्र नले होते याच्या कितीतरी युग आधी माणसाला सृष्टीने नि शस्त्र केले होते! वरिष्ठ श्वापदाहूनच नव्हे तर पशीमत्स्यमाक्षकाहूनही माणस मुळात पाहिला तर नवळ अगान असा अत्यत दुबळा आहे! अक्षरश गायीहून गाय आहे!

पण तो आज ह्या पृथ्वीतलावर तरी साऱ्या प्राण्याचा राजा, शास्ता, नेता

होऊन मिरवू लागला; सृष्टिशक्तींशीच मल्लयुद्ध करण्यास दंड थोपटून टाकला; वाफ, चुंबक, विद्युत्, रेडियम याना काही प्रमाणात तरी माणसाळवून त्याच्या अजस्र बळावर समुद्र, पृथ्वी नी आकाश या मानवी जगताच्या तिन्ही मंडळात दिग्विजय करीत चालला आहे. कशाच्या बळावर हा अगदी अत्यंत दुबळा माणूस अितका प्रबळ झाला ? कळीच्या हत्याराच्या यंत्राच्या !!

## मंत्रबळे नव्हे, तर यंत्रबळे !

त्याच्या अगच्या पिसविर्शात बुक्कीला कुत्रादेखील भीक घालीत नव्हता; पण ज्या दिवशी माकड-माणसाने पहिला दगड अुचलून फेकला त्या दिवशी त्याला अेक नवी बुक्कीच फुटली. दगड दुरून फेकायचा, हा हत्याराबरशी माणसाची पिसविर्शान बुक्की कृतान्ताच्या बुक्कीसारखी असह्य बनून निराळी होअून अुभी राहिली. हाताने उचलून फेकलेली किंवा हकरेली शिळा म्हणजे 'कृतान्तस्य मुष्टिः पृथगिवस्थिता !' माकडमाणूस झाडाच्या फांद्या घेअून पशूचे कळप झोपडीत, साप, सापसुरळ्या, विंचू ठेचीत चालला. त्याचे विष न बाधणारे नवे हात जे त्याला सापडले त्याच त्या फांद्या, त्या काठ्या, त्या लाठ्या, ते सोटे होत. माणसाला रानडुकरासारखे सुळे नव्हते, त्याची अुणीव माल्याने भरून काढली. रेड्यासारखे टक्करमारू डोके नव्हते, त्याने गदेचे डोके टकरावून त्या सान्याची खोड मोडून टाकली. सिंह, वाघ त्याला जेव्हा तेव्हा नखाग्रांनी भेडसावीत, पण माणसास बरची खंजिरे, कट्यार, खड्गदपाण असली भयंकर नखे फुटताच वाघसिंह चळचळ कापू लागले ! कारण खड्ग म्हणजे आपले अेक वाढलेले नखच नव्हे काय ? अितक्यात माणसाच्या पाठीशी धनुष्य नी हाती बाण प्रकटला. सिंहाची झेप, वाघाची उडी, हत्तीची सोंड, अुंटाची उंची, नव्हे त्या घोर गिधाड गरुडाच्या चोंचीदेखील आणि अुंच अुडणारे पंख – सारी प्राणिसृष्टी माणसाच्या त्या धनुष्याच्या टणत्कारासरशी कुणी ची ची करीत, तर कुणी शेपट्या घालीत रानोमाळ पळून गेली ! कारण जवळ आल्यावर ते लढणार, पण हा धन्वी ते चालून येण्याच्या आधीच त्याचा कंठच्छेद करणार ! कवच ही माणसाची दुर्भेद्य त्वचाच होय. दुर्बीण हा ज्ञानपटीने दर्शनक्षम नी गगनासही पाहता न दिपणारा असा दुसरा डोळा.

दूरध्वनियंत्र हा त्याचा शतपटीने अधिक श्रवणक्षम झालेला नी मुंबईच्या भिंतीशी लावला असता कलकत्याच्या वा लंडनच्या मित्राची हाक ऐकणारा कान आणि ती दारू, ती स्फोटके, त्या गोळ्या, ती बंदूक, ती तोफ, तो विषारी धूर हाच पेटून बाहेर भडकलेला क्रोध ! ही चूल, वैद्याची भट्टी, हा स्टोव्ह म्हणजे मनुष्याच्या पोटातील जठराग्नीची अकेक शाखा, अेक वेळ जे पोटाला पचेना ते पचवून देणारी पोटे ! खल–खुलळ ही त्याची खालची नवी बळकट दाढ; वत्ता–मुसळ त्याची वरची दाद; त्या दोन्ही आता प्रचंड आकार धरुन वाफेच्या शताश्वशक्तीने पूर्वी जसा अेक घास तो माणूस चावी तसे सहजी धान्याचे पोतेच्या पोते अेका चर्वणासरशी रिसून टाकतो. त्याची जुनी अिंद्रियेच काय ती अशी सहस्रपटीने बळ-हत्यार-यंत्रबळे अधिक कार्यक्षम झाली नाहीत, तर माणसास अुपजता अंगी जी मुळीच नसतात ती नवी अद्भुत अिंद्रियेही यंत्रबळे त्याला लाभली आहेत !

लहानशा आडात बेडूक राहतो तितकेदेखील त्याचे अंग मूळचे जलस्तंभक नाही. पण विज्ञानाने त्याला अकस्मात अेक अद्भुत वरदान दिले आणि कासवाहून कठीण, देवमाशाहून प्रचंड, सुसरीची सहस्रे ज्याच्या धक्क्यासरशी स्वतःच चक्काचूर होतात असा अेक प्रचंड अद्भुत जलदेह माणसास दिला – ते बेडर, ती पाणबुडी, त्या विनाशिका, त्या प्रचंड वणिक्‌नौका, वाफ्पनौका, आगनावा, वीजनावा ! अेका मशकाअितके माणसाला वर क्षुद्र म्हटले तर अुडता येत नसे. मूळचा तो मशकाहून धूळभेद; पण विज्ञानास आराधिताच वेदपुराणातील मोठमोठ्या ऋषिपीरपैगंबरानाही मनुष्यास जे देववले नाही असे वरदान माणसास मिळाले आणि प्रत्यक्ष गरुडाच्या बापजन्मी त्याने कधी पाहिले नसतील असे प्रबळ पंख मनुष्यास फुटले ते विमान, ते हे वियान !

ज्या ज्या सिद्धी मोठमोठी जपतपे करकरून देवभोळेपणास मिळाल्या नाहीत किंवा कोणास मिळाल्याशा वाटताच ती अेक अत्यद्भुत, प्रत्यक्ष अीश्वरी नी विशेष कृपाप्रसादी मंत्रबळाची देणगी म्हणून वाटे, त्या त्याहून शतपटीने अत्यद्भुत अशा सिद्धी आजच्या हातात पैशा पासरीच्या भावाने यंत्रबळ लुटवीत आहे ! अतिदर्शन, अतिश्रवण, ध्वनिलेख बोलपटातही (Telephone

Talkies नी ) मनुष्यास अर्पिलेले अतिक्रमण, महासमुद्राच्या तळाशी यानी अवगाहन, गिरिशिखराच्याहि वर आकाशोड्डयन! आणि हे सारे अद्भुत प्रानन्य मुदास वा जेहोवास वा देवास दमडीचाही धूप लावण्याची लवलेश आवश्यकता त्या त्या प्रकरणी तरी नसता! यंत्राने मनुष्य दुबळा झाला नाही, उलट दुबळा प्राणी जो होता तो माणूस आज पृथ्वीवरील, अंतराळातील, महासागरातील प्राण्यांत प्रबळतम जो झाला तो, हत्यार-कळ-यंत्र यांच्याचयोगे होय, मंत्रबळे नव्हे तर यंत्रबळे! शाप नव्हे! तर यंत्र हे मनुष्याला अतिमानुष करणारे विज्ञानाचे वरदान होय!

* * *

श्रीपाद महादेव माटे

## १. पारमार्थिकांनी केलेला रामदासाचा पराभव !

रामदासाइतका दुदवी ग्रंथकार दुसरा कोणी झाला नसेल असे वाटत नाही ! रामदास हा अत्यंत श्रेष्ठ दर्जाच्या पहिल्या प्रतीचा ग्रंथकार झाला. पण इतर श्रेष्ठ दर्जाच्या ग्रंथकारांना जे मान्य धमन ते रामदासाला लाभले नाही. अशा ग्रंथकर्त्यांना अनुयायांचा राबती, अनुकरण करणारे भेटतात, त्यांच्या ग्रंथाची फोड करणारे असतात, आणि त्यांचे पथही वाङ्मयात प्रस्थापित होतात. रामदासाला हे वैभव मुळीच लाभले नाही म्हणून असे वाटते की रामदास हा ग्रंथकार दुर्दैवी ठरला. रामदासाला शिष्य नव्हते असे नाही. त्यांचे अनुकरण झाले नाही असेही नाही आणि त्यांच्या ग्रंथावर टीकाग्रंथ जरी झाले नसले तरी त्यांचा पथ प्रस्थापित झाला नाही असेही नाही. रामदासी संप्रदाय अजूनही सर्वांना परिचित आहे, दासबोधाची पारायणे करणारे हजारो लोक आहेत. मनाच्या श्लोकांची गर्जना करून आणि वाकलेला कुबडी घेऊन हिंडणारे अनेक महंत आहेत. पण हे सारे रामदासाला त्यांच्या भक्तिशास्त्रेत लाभलेले वैभव होय. रामदास हा रामाचा भक्त होता. इतर संत विठ्ठलाचे भक्त होते व काही थोड्यास दत्तात्रेयाचे भक्त होते. रामदासाने रामाची भक्ती फैलावली. पण काही झाले तरी ती भक्ती होती. नरेच लोक विठ्ठलभक्तीत मुरलेले होते, रामदासामुळे काही रामाच्या भक्तीत मुरले एवढाच फरक. या भक्तांना रामदास हा गुरू वाटत होता यात काहीच शंका नाही. पण तो त्यांचा भक्तिमार्गातील गुरू होता. 'ब्रह्माण्ड भरून रामकथा पैलाड न्यावी' याचा साधासुधा व परंपराप्राप्त अर्थच ते जाणतात. आपल्याला संसारतापत्रयातून मुक्त करणारा हा गुरू आहे याची चरणसेवा करावी. याने दिलेला रामनामाचा मंत्र जपावा व देह सार्थकी लावावा. असा परमार्थविषयातील आधीच इतरांनी चोखाळलेला विचार उपासनाभेदाने त्यांनी मनाशी बाळगिला होता. आपला गुरू हा आधी होऊन गेलेल्या मोठमोठ्या संतांच्या मालेतील एक तेजःपुंज मणी आहे, त्यांनी विठ्ठलभक्ती सांगितली होती. हा रामाची भक्ती प्रतिपादितो. एवढाच फरक

आहे असे त्यांच्या मनावर ठसलेले होते. रामदासांची त्यांना पुरती ओळख झालेली नव्हती. समाजात जो भक्तिमार्गाचा आसरा पडलेला होता त्यातलेच ते होते, फक्त उपासनेचे दैवत निराळे होते, इतकेच काय ते! **रामदासांच्या मनाचे बहुविध व्यापार त्यांना कळले नाहीत** हा आपला गुरु आदर्श झालेल्या गुरूहून थोरल्या वानगीचा निराळा आहे याची उमज त्यांना पडलीच नाही.

## ते शिष्य कोठे गेले ?

त्यांचे विविधरूप दर्शन झालेले शिष्य काही तरी असलेच पाहिजेत. त्याने शेकडो मठांची स्थापना केली आणि एकविचारे अनेकांना भारविले. फक्त भक्तिप्रसारासाठी इतक्या यातायातीची आवश्यकता नव्हती, इतक्या मठांची स्थापना नको होती, जगाचे नश्वरत्व कोठेही प्रतिपादिता आले असते, आणि दासबोध व तदितर ग्रंथात एवढा अवाढव्य व्यवहारवाद विवरून सांगण्याचे प्रयोजन नव्हते. पण रामदासाने हे सर्व केलेले आहे. त्याच्या ज्या शिष्यांनी हे सर्व पाहिले व ओळखिले ते कोठे गेले? त्यांचे काय झाले? त्या शिष्यांचे ग्रंथ कोठे आहेत? रामदासांचा व्यवहारवाद पुन्हा ओनकून सांगणारा त्यांचा शिष्य वाङ्मयात कोठे शिल्लक आहे काय? चुकूनमाकून या बाबींचा उल्लेख करणारा कोणी असला तर तो नको. खुद्द रामदासांनी जसा व्यवहारवाद घसनसून, आवळून, ठासून सांगितला आहे तसा त्यांचा विधायक बुद्धीने विचार व उच्चार करणारा कोणी शिष्य आहे काय? मला वाटते, नाही. मग हे सर्व लोक कोठे गेले? ते असले पाहिजेत यात शंकाच नाही. ओवीच्या प्रत्येक अणुरेणूतून शिष्य उत्पन्न करण्याचे सामर्थ्य प्रकट झालेले आहे. या ओव्यांतील व्यवहारवादाचा मोह अनावर आहे. एकेक ओवी म्हणजे एकेक बाण आहे, मनोभूमीत गेला की रुतून बसलाच पाहिजे. याही उद्गारांनी शिष्य होईनात तर मग कशाने होणार असतात? सामान्य लेखक, की ज्यांना विशेष प्रकारचे चातुर्य नाही, उत्कटता नाही, पण थोडे लिहिण्याचे ढंग आहेत त्यांनासुद्धा अनुयायी व शिष्य लाभतात. मग रामदासांविषयी तर बोलावयासच नको. रामदास परम विरक्त तापसी असून निग्रह तुडविलेला चाणाक्ष योगी होता, सर्वांना

चानयाचा उतारपट होता, स्वतंत्र तत्त्वज्ञान लिहिण्याची हुक्त बाळगणारा होता आणि राजवाडे म्हणतात तसा 'महाराष्ट्रवाङ्मयातील उस्ताद' होता अशा पुरुषाला शिष्य लाभेनात तर कोणास लाभणार? मग या सगळ्या शिष्यांचे काय झाले? व्यवहारवाद अथवा प्रपंचविज्ञान प्रतिपादणे ही काय रामदासाची केवळ करमणूक होती? आणि परमार्थप्रतिपादन हा त्याचा निराळा केवळ हव्यास होता! असे मुळीच वाटत नाही परमार्थाच्या आणि भक्तीच्या प्रतिपादनात रामदास जितका रगून जातो त्याहीपेक्षा अधिक तोकडने प्रपंचविज्ञानात तो रमलेला दिसतो ते विज्ञान अवश्य सांगावयाचे आहे अशी त्याची भूमिका दिसते आणि ठसवावयाचे आहे असा त्याचा आग्रह दिसतो ती त्याची रिकामपणाची कामगिरी नाही ते त्याने सहजासहजी केलेले नाही चालू काळाशी जुळते नसते बसाव म्हणून ते वरकरणी केलेले वाक्यांचे नव्हे मनाच्या, चित्ताच्या, विवेकबुद्धीच्या मूळ कंदातून भराभर फुटणारे ते जोरकस पदे आहेत ती निवतनाणी आहे वेचक विचाराचा तो संग्रह आहे त्यात सामान्य विधानाची सारवासारव नाही त्यात तजेलदार कणाकणाची – तपशिलाची रेखीव मांडणी आहे. त्यात आत्मप्रत्ययाचा कस आहे अशा वाङ्मयाने शिष्य व अनुयायी निर्माण होणारच होणार मग ते सर्व कोठे गेले? त्याची विरुदावळी तुम्ही का काय?

रामदासाच्या अंगात दिसून येणारे त्याचे सृष्टिसौंदर्याचे प्रेमही त्यांना एखाद्या सभापणात दिसून आले असले पाहिजे त्याच्या स्वाभाविक रसिकतेला इही नावाहून पोहोचले असले पाहिजे रामदासाच्या प्रपंचविज्ञानाचे स्फुरण जसे त्यांनी पाहिले होते, तसे हे रामदासाचे सृष्टिसौंदर्यज्ञानही त्यांनी पाहिलेले असले पाहिजे हीही रामदासाची शिकवण होती सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यातून हिंडणाऱ्या आणि अरण्याच्या निबिडात एकांताचे सुख अनुभविणाऱ्या या विरक्ताच्या मनाचा व्यापार म्हणजे केवळ इंद्रियदमन एवढाच नसून त्याच्या अंगी कवित्वाचा निर्मल स्फूर्ती आहे आणि त्याच्या प्रतिभेचा विलास नाना प्रकारांनी होत आहे हे त्यांनी खुद्द ग्रंथावरून व सभापणावरून आळखिले असले हीही दासाची शिकवणच होती त्याच्या अनेक शिष्यांपैकी निदान काहींच्या अंगी तरी हे आळखण्याचा रसिकता असली पाहिजे त्या शिष्यांनी ता कुठे आपल्या वाङ्मयात कोठे उमटविला नाही काय? ता कोठे तरा

नाही म्हणून फक्त सत्त्वालाच नाना बुद्धी शिकवाव्यात हे रामदासाच्या मनाने कायमच घेतले होते

तुकारामबोवांनी पारमार्थिक दुःखाने टाहो फोडिला की, "येणे दुःखे माझा पुरा पाहे प्राण" रामदासाला हे उच्च अर्थाचे पारमार्थिक दुःख होतेच परंतु लोकांचे ते अनन्वित दुःख पाहून त्याने हंबरडा फोडिला की, "हे लोक आता कोठे जातील? यांचा आपंगिता आता कोण?" या "चिंतने ऊर फाटता" ह्या चिंता जर घालवावयाची असेल तर "जैसास तैसा जेव्हा भेटे, तेव्हा मनासी थाटे" हाच न्याय प्रस्तुत करावयास हवा पण आपण स्वतः मात्र "कळकटपणाची पदवी असो द्यावी" हा न्याय त्याच्या मनात पक्का झाला अशा प्रकारे लोकांनी प्रपंच करावा आणि तो नेमका करावा हे शिक्षण आता लोकांना दिलेच पाहिजे हा त्याच्या बुद्धीचा निश्चय कायम झाला "संसार मुळीच नासका, विवेके करावा नेटका, नेटका करिता फिका, होत जातो" म्हणून संसाराच्या अंगी फिके पणा येण्याची मुळचीच जर प्रवृत्ती आहे तर तो नेटका करण्याची शिकवण आपण दिली पाहिजे म्हणून रामदासाने एवढी प्रचंड ग्रंथरचना केली! इतर संतांच्याप्रमाणे जर केवळ प्रपंचाचे वैयर्थ्य त्याला शिकवावयाचे असते व केवळ भक्तीचा महिमा गावयाचा असता तर त्याला ही ग्रंथरचना करण्याचे काहीच कारण नव्हते ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम यांच्या अभंगाच्या धर्तीवर त्याने नुसती चार गाणी रचली असती तरी चालले असते "आपण एकाएकी एकला, सृष्टीत भोळा चालला, बहुतांमध्ये एकल्याला यश कैचे?" हे सर्व गोष्टींच्या मागातील मर्म शिकवण्याची त्याला काय आवश्यकता होती? 'ब्राह्मणास ग्रामणीने (ग्रामण्याने) नागवले आम्ही तरी ब्राह्मण, दुर्जन गांजले हे वचन, घरोघरी करून ग्रामणी करून आम्हा मांडले' अशी सामाजिक तक्रार करण्याची त्याला काय आवश्यकता होती? उदंड जागा सिडाले, परी ते धूर्तांचा आळिले, धूर्तापाशी काहीही न चले बापुड्याचे' हे लोकसमूहाचे यशस्वी मर्म उकरून सांगण्याचे त्याला काय प्रयोजन होते? त्याला फक्त देवाचीच भक्ती सांगावयाची होती त्याला आवडती प्रस्थापित झालेली विठ्ठलाची भक्ती सोडण्याची आवश्यकता काय होती? 'प्रचीत तो देव जाणावा कष्टावीण फळ नाही, कष्टावीण राज्य नाही, केल्याविण होत नाही, साध्य जनी" हे

त्रागला थोडी कडवट चव आणिली होती हे खोटे नाही गाहस्थ्य हे सव आश्रमाचे आश्रयस्थान आहे आणि म्हणून तेच युक्तपणाने आचारले पाहिजे हे तत्त्वज्ञान रद्द होऊन ते नाइलाजाने आचरावे लागत आहे अशी समजूत माणसाच्या मनाला होती म्हणजे कोणतेही कृत्य करिताना लोकांना ज्या तत्त्वज्ञानाचा आश्रय लागतो तो खिळखिळा झाला होता रामदासाच्या मनात असे घतले होते की, गाहस्थ्याची उच्च पीठिका पुन्हा प्रस्थापित केली पाहिजे म्हणून त्याने आपल्या शिकवणात त्या गाहस्थ्याला, मग ते व्यष्टीचे असो, की समष्टीचे असो, यश कसे मिळेल याची मीमांसा परोपरीने केली त्याने लोकांना व्यवहारवाद दाखविला त्याने महाराष्ट्र भाषेत प्रपंचविज्ञान रचिले पूर्वीच्या संतपरंपरेतून रामदास आपण होऊन उठला हे अलौकिक धैर्य त्याने दाखविले प्रपंचाच्या अवहेलनेचे तत्त्वज्ञान चालू असता एका वैराग्याने प्रपंचावरची लोकांची श्रद्धा स्थिर करावयास सिद्ध व्हावे हा देखावा तत्त्वज्ञान्यांच्या कित्येकांना उद्वेगकारक तर इतर कित्येकांना हर्षकारक वाटला असेल लोकांना प्रपंच करावयाचेच होते, पण त्यांना सारसुरत करावयाचे होते तत्त्वज्ञानी लोक आपली कवळ गय करितात व म्हणून आपण प्रपंच करिता ही भूमिका त्यांना नको होती ते प्रपंच करीत पण आपले काही तरी चुकत आहे कारण संत व तत्त्वज्ञानी लोक आपल्याला या कामात प्रतिकूल आहेत या जाणिवेची रुखरुख त्यांच्या मनाला होती रामदासाने धैर्य धरून त्यांची ही रुखरुख साफ नाहीशी केली संतकुळात म्हणजे भक्तिपरंपरेत उत्पन्न होऊनच त्याने पुन्हा संतविरुद्ध गर्जना केली व प्रापंचिकांनी संसार मन लावून आणि यशस्वीरीत्या करावा असा नवा संदेश दिला त्याने प्रापंचिकांना संसाराची सनद दिली, हे रामदासाचे राजकारणच होय

## प्रवृत्तीचे पुनरुत्थान झाले

रामदासाने राजकारण केले की नाही याचा वाद मागे एकदा झाला होता व तो अजूनही छपून छपून चालू आहे त्या वादाला माझे हे उत्तर आहे रामदासाने लोकांना प्रपंचाची सनद दिली त्याने व्यवहार विवरून सांगितला आणि प्रपंचविज्ञान रचिले हेच त्याचे राजकारण होय राजकारण करणे म्हणजे ' शिवाजीला मदत केली

असणे, लोकांची संघटना केलेली असणे, गुप्तपणाने कामे करण्याची शिकवण दिलेली असणे " असा अर्थ जे घरतात त्यांचे समाधान होईल इतका पुरावा तर उपलब्ध आहेच, म्हणजे त्या अर्थाचे राजकारण तर रामदासाने केलेच, पण त्याच्याही मागे जाऊन या राजकारणाची जननी जी ' प्रवृत्ती ' तिचेच पुनर्स्थान त्यांच्या हस्ते झाले. राजकारण प्रवृत्तिवादातून उद्भवते पण तो वादच संतांनी व तत्त्वज्ञानी लोकांनी निवृत्तिवादाच्या ओसाड आणि निश्चल वैराण भूमीकडे पिगळीत नेला होता. त्या दूरच्या सीमेपर्यंत तो गेला होता त्या सीमेपासूनच पुन्हा त्याला परत आणण्याचे काम करणे रामदासाला भाग होते म्हणून राजकारणाची उत्थानभूमी जी प्रपंचबुद्धी तीच उच्छिन्न होण्याच्या वाटेला लागली असता तिला पुन्हा नवजीवन देणे हे राजकारणच होऊन बसले होते. हिंसा ही ' मनोवाक्कायकर्मभिः ' म्हणजे आचारात, उच्चारात, फार काय विचारात म्हणजे मनातसुद्धा होता उपयोगी नाही असे तत्त्वज्ञान रूढ होऊन मूळ धरून बसले म्हणजे मग, विंचवाला जोडा मारिला तरी हरकत नाही, नव्हे मारावाच, ही शिकवण देणे हे अवश्यच होऊन बसते. तेच राजकारण बनते, कारण जेथपर्यंत पीछेहाट नेलेली असेल तथून पुन्हा सुरुवात करावी लागते! रामदासाला हेच करावे लागले, आणि त्याचे वैभव हे की, प्रवृत्तिवादाचे आरंभस्थान पुन्हा चाळवून, जागृत करून त्याने प्रपंचावर आलेला हीनत्वाचा आरोप तर उडवून लाविलाच, पण 'तामस, तामस ' म्हणून हिणविलेल्या तेव्हाच्या प्रत्यक्ष राजकारणातसुद्धा हात घातला! शिवाजीच्या राजकारणाशी रामदास एकजीव झालेला होता, त्याने शिवाजीला राजकारणाचा मंत्र दिला हे मात्र खरे नव्हे किंवा शिवाजीशी तो बरोबरीने राजकारणात वागला हेही खरे नव्हे. शिवाजीच्या प्रत्यक्ष राजकारणाला लागून मागे चिकटलेले व त्याच्या यशाला उपयोगी पडणारे राजकारण रामदासाने केले हे मात्र खचित. हे सर्व त्याच्या वाङ्मयावरून कळून चुकते. शिवाजीचे राजकारण अनेक कृत्यांनी भरलेले आहे तर रामदासाच्या राजकारणाला शतशहस्र शब्दांची वाच्यता मिळाली आहे.

• •

## पारमार्थिकांनी चीतपट केली

पण हे सर्व खरे असले तरी रामदासाला पारमार्थिकांच्या हस्ते पराभव खावा लागला हे काही खोटे नाही! एवढा वाग्मी, पण पारमार्थिक वाचाळांनी त्याला चूप बसविले एवढा वाङ्मयमार्ग, पण पारमार्थिक जडभरतांनी त्याची चीतपट केली त्याचे शिष्य शिष्य म्हणून होते तेसुद्धा केवळ श्रद्धाळू पारमार्थिक होते त्यांनी त्याचे गळू चोखिले असेल, पण ते केवळ गुरुभक्ती म्हणून त्यांनी कोयनेच्या डोहात उडी टाकून त्याला बाहेर काढिले असेल पण ते केवळ गुरुभक्ती म्हणून त्यांनी त्याचा पाची आणण्यासाठी सर्पदंश करून घेतला असेल, पण ते केवळ गुरुभक्ती म्हणून! ते सर्व शिष्य रामदासाच्या पारमार्थिक ऐश्वर्याने भारून गेलेले होते. त्यांचा जीव रामदासावर लागला होता, पण रामदासाचा जीव 'शिवबा' वर लागला होता आणि 'शिवबा' तर प्रपंच करणाऱ्यांचा अग्रेसर होता स्वतःचा प्रपंच त्याने केलाच, पण महाराष्ट्रातील लक्षावधी प्रपंच त्याने नव्याने उभे केले आणि त्यांचे ऊर्जित साधिले या शिष्यावर रामदासाचा जीव लागला होता तेच त्याचे कैवल्य झाले होते श्रवणे भरतखंड धुंडिल्यावर मनाला उल्हास झालेले अस्वास्थ्य घालविणारा शिवबा नावाचा नवजवान कर्मयोगी भेटताच रामदासाला आनंदाचे भरते आले तसेच शिवाजी वारल्यानंतर रामदासाने फक्त हाय खाल्ली याला सब "ब्रह्म" झाले. रामदासाचे चरित्र वाचावे म्हणजे त्याच्या मन प्रकृतीत आणि मग शरीरप्रकृतीत पडलेला हा फरक ध्यानात येतो आपल्या ह्या प्रपंचशूर शिष्याच्या मरणाने रामदासाचे अंतःकरण विद्ध होऊन गेले पण त्याचे जे इतर शिष्यगण होते त्यांची स्थोत्रे सुरू झालेली वादावादी वर्जिली म्हणून ते रामदासाचे केवळ पारमार्थिक शिष्य होते एवढाच बोध शिल्लक उरतो

आणि राम-कृष्णाच्या भक्तिपर कथात गुंतून गलेले दिसतात पण काही रामदासस्वामी झालेच नव्हते आणि त्यानी मर्दपणाने प्रपच करावा हा दिव्य सदेश दिलाच नव्हता पुन्हा जिकडे तिकडे परमार्थविचाराचे आणि भक्तीचेच पीक वाङ्मयात आले आणि अशा रीतीने रामदासाचा दिव्य सदेश माग पडला खुद्द शिवाजीला मात्र उत्तम शिष्यशाखा लाभली आणि रामदासासारखा कोणाही समकालीन जोरकस वाङ्मयसेवक पाठीवर नसताना सुद्धा थारल्या महाराजाचे आम्ही शिष्य आहोत असे अभिमानाने म्हणणाऱ्या पेशव्यानी शेवटी दिल्लीचे तख्त गाठले परतु खुद्द रामदासाच्या शिष्यशाखेत आणि इतर वाङ्मयभक्तात खास त्याचे असे कोणीच उरले नाही फार काय सागावे, एकनाथ-तुकारामासारखा रामदास हाही एक भक्तिगान सागणारा सत होऊन गला एवढेच वर्तमान शिल्लक राहिले ! आणि त्याच्या मनामधून " सदा सर्वदा योग तूझा घडावा " एवढीच रामाची प्रार्थना चालू राहली ! *रामाचीच कथा आपल्या गुरूने एकली का वानिली याचे गुरूने प्रत्यक्ष* सागितलेले ज्ञान या मनातून लुप्त झाले परतु प्रपचवादाची ही घसरगुंडी येथवरच थांबली नाही रामदासाला त्याच्या शिष्यानी दिलेल्या तडाख्यातला हाच काही शेवटचा नाही 'प्रपचवादाचा झडा' 'आनदवनभुवना' व फडकविणे हे काही स्वामींचे जीवितकार्य नव्हते तर परमार्थवादाचा पुरस्कार करणे हेच त्याच्या जीविताचे उद्गार होते' असे सावेश प्रतिपादणार त्याचे शिष्यवर आजही शिल्लक आहेतच ! अशा रीतीने परमार्थाचा पुन्हा विजय झाला !! आणि पारमार्थिकानी रामदासाचा पराभव केला !!!

* * *

## २. घोषणांचा जाच

प्रतापी माणसे जशी, तशी आकर्षक तत्त्वे माणसाचा अतोनात छळ करतात आणि हा तत्त्वाचा छळ इतका सूक्ष्म असतो की, वस्त्राला लागलेले काटेरे जसे लवकर बाहेर काढता येत नाही, तसा हा छळसुद्धा आपल्या मनातून आणि जीवितातून दूर करता येत नाही. प्रत्येक गोष्टीत काही एक सूत्र असते, पण या सूत्राचा प्रभाव कोठपर्यंत पोचू द्यावा, याचा विवेक तत्त्विचारकांना राहतोच असे नाही, आणि मग हा घरबंध सुटला म्हणजे या सूत्राच्या तावडीत सापडलेले लोक अगदी जिकिरीला येतात. स्वातंत्र्य, समता, बंधुभाव या शब्दांचे अर्थ सर्वांना कळतात, पण हे अर्थ एकदा व्यवहारात उतरू लागले आणि खाली खाली घसरत जाऊ लागले म्हणजे प्रतिपादक लोक अतिशयोक्ती करीत आहेत, आणि आता यांना परत नेला मारलाच पाहिजे, असे सज्जन माणसांना वाटू लागते. सर्व माणसे सारखी आहेत, या उदार सूत्राचा प्रभाव इतका खोलपर्यंत चालू झाला आहे की, प्रतिक्रिया न होईल तरच आश्चर्य।

### समत्वाच्या सूत्राचा अर्थ

सर्व माणसे सारखी असतीलही, पण ती कोणत्या बाबींपुरती, याचा विचार करणे अवश्य बनते. सर्व माणसे जर सर्व बाबतीत सारखीच असती तर तसे प्रत्यक्षात दिसून आले असते. पण बुद्धी, भावना, प्रतिमा, कुशलता, कर्तृत्व, तितिक्षा, आत्मसंयम – असे किती तरी गुण आहेत की, ज्यामुळे आणि ज्यांच्यातील तरतमभेदाने सर्व माणसे सारखी नाहीत, हेच सिद्ध होते. "सर्व माणसे सारखी आहेत" या मानवप्रणीत सूत्रापेक्षा, "सर्व माणसे सारखी नाहीत" हे सृष्टिप्रणीत सूत्र जास्त खरे आहे. सर्व माणसे जर सारखी असती, तर त्यांच्या प्रती टर विण्याची दगदग आपण कधीच केली नसती. परीक्षा घेतल्या नसत्या मार्क दिले नसते – आपण असले काही केले नसते. पण ती सारखी नसतात, हे

आनंदित होते. पण सध्या अमेरिकेत चाललेला लढा पाहिला म्हणजे, 'गुलामगिरी नष्ट झाली पाहिजे' या घोषणेला 'समत्व आणि बंधुभाव' या घोषणेचे वैभव प्राप्त झाले पाहिजे, असा दावा निग्रो लोक सांगत आहेत, असे दिसेल. आणि या दाव्यातूनच अमेरिकन जीविताला कुरतडणारे अनेक जटिल प्रश्न उत्पन्न होत आहेत.

## अमेरिकन लोक व निग्रो

दोनशेंडीचशे वर्षांपूर्वीच्या गोऱ्या अमेरिकनांना वाटले होते की, आफ्रिकेतल्या निग्रो लोकांना धरून आणून आपल्या गिरण्यात आणि आपल्या शेतवाडीवर कामाला लावले म्हणजे आपले मजार मुग्राने चालतील. त्यांनी निग्रो लोकांना धरून आणले आणि कामाला लावले. पुढे त्यांच्या गुलामगिरीची दया येऊन लिंकनने त्यांना बंधमुक्त केले. पण हे निग्रो लोक बंधमुक्त होण्यावरच संतुष्ट राहिले नाहीत. त्यांना अमेरिकन समाजात आणि अमेरिकन राष्ट्रात प्रवेश हवासा वाटू लागला. वास्तविक पाहता अमेरिकनांच्या मानाने वर्ण, रूप, कर्तृत्व या तीनही बाबतीत निग्रो लोक अगदी निराळे आहेत. रूप आणि वर्ण या बाबतीत तर या दोघांत जमीनअस्मानाची तफावत आहे. त्यामुळे त्यांच्या अगत्या कर्तृत्वाचा उपयोग करून घेण्याचासुद्धा अमेरिकन लोक तयार होत नाहीत आणि त्यांना आता असे वाटू लागले की, या काळ्या आणि अयत कुरूप लोकांच्या पूर्वजांना, आपल्या पूर्वजांनी अमेरिकेत आणून सोडले ही फार वाईट गोष्ट झाली. स्वातंत्र्य, बंधुभाव, समता ह्या घोषणा अमेरिकन राष्ट्राने केलेल्याच आहेत, तर आपल्या बाबतीतही त्या लागू पडल्या पाहिजेत, असा निग्रो लोकांचा दावा आहे.

झाल्ेला आहे. त्याच्यातील काही शास्त्रज्ञानी अशीही सूचना केली होती की, अमेरिकेतला एक उष्ण मुलुखाचा पट्टा या निग्रो लोकाना द्यावा आणि त्याचे एक निराळे राष्ट्र बनवावे किंवा त्याना आफ्रिकेत परत धाडावे, पण निग्रो म्हणत आहेत की, आम्हीही आता अमेरिकन्सच झालो आहो, म्हणून आम्ही निराळे निघणार नाही या तिढ्यातून अमेरिकन राष्ट्राला कसे बाहेर पडता येईल हे कळत नाही समत्व, बंधुभाव आणि स्वातंत्र्य ह्या घोषणा आम्ही केल्या खऱ्या, पण त्या आपआपसात लागू व्हाव्या असे अमेरिकनांचे मत होते! निग्रो लोकानासुद्धा ह्या घोषणा लागू व्हाव्या, पण त्या त्यानी आपआपसात लागू करून घ्याव्या व म्हणून हे निराळे निघाले तर बरे, अशी चांगल्या चांगल्या अमेरिकनांची इच्छा आहे सृष्टीने तुम्हाला दिलेली आणि तुम्ही स्वत कमविलेली सामर्थ्ये कितीही असोत ती ज्याच्या वाट्याला आली नाहीत ते आम्ही तुमच्या बरोबरीचे आहो असे सागू लागले आहेत! सुडाचा जाच हा असा होत असतो म्हणून समाजाचा विचार करणाऱ्यानी सुडाचा डांगोरा करणाऱ्यावर नेहमी पाळत ठेवली पाहिजे

## आफ्रिकेतील वादाचे स्वरूप

आफ्रिकेत तर या वादाला एक निराळेच रूप आलेले आहे. आपल्याला हे माहीत आहे की, या विशाल भूमीत अगदी परवापरवापर्यंत अनेक मागासलेले लोक नांदत होते त्यांची रूप वाईट, त्यांचे वर्ण वाईट, त्यांची संस्कृती अगदी वाईट संस्कृतीच्या अगदी प्राथमिक गोष्टीसुद्धा त्याना माहीत झालेल्या नव्हत्या हे लोक जमात रूपाने राहात आणि एकमेकांशी त्याच हाम्वैर असे अशा त्या भूमीत काही युरोपियन लोक येऊन राहू लागले मूळच्या लोकांच्या मानाने हे अगदी निराळे आणि फार पुढारलेले होते हळूहळू आपल्या कर्तृत्वाने आफ्रिका खंडाचा एकेक टापू त्यानी अगदी बदलून टाकला आपले शास्त्रज्ञान त्यानी या भूमीत चालविले आणि विद्या, कलाकौशल्य, शेती, कारखाने इत्यादींचा मोठा, सुंदर संसार तेथ उभा केला त्यानी खाणीही खणल्या आणि सोन्याच्या लगडींच्या लगडी बाहेर काढल्या आणि हिऱ्याच्या ठिकऱ्या उघडून ठेवल्या आसपासच्या अत्यंत मागासलेल्या लोकाना त्यानी कामावर लावले आणि काम

आपल्याला उपजत बुद्धीने माहीत असल्यामुळे आपण त्याची प्रतवारी लावत' ज्याच्या व्यवहारात एकाला कमी यश मिळते, दुसऱ्याला जास्त मिळते एक दुबळेपणाने गप्प बसतो, आणि दुसरा साहसाने आक्रमक बनतो एकाला मरलेल्या पृथ्वीत खायला मिळत नाही, म्हणून एक पोगवर थापड्या मारत बसतो आणि दुसरा असा गल्ला जमा करता की, तो मुश्किलाना सहसमाजे घालतो

हा फरक धडधडीत दिसत असताना, सगळी माणसे सारखी आहेत, या सूत्रातील मानसिक निष्ठा प्राप्त करून घेण्याची उत्सुकता बहुधा सवच माणस दारीन असतात मग या सूत्राला काही अर्थ आहे का नाही, असा प्रश्न मनाशी उत्पन्न होइल. त्याचे उत्तर असे आहे की, सर्व माणसे कोणत्या बाबतीत सारखी आहेत, हे आपण अनुभवाने ओळखले पाहिजे आता पर्यंतचा जो इतिहास झाला आहे, त्यावरून इतकेच सिद्ध होत की, अन्न, वस्त्र, निवारा ही सव मानवप्राण्याना मिळावी व जीवनात पुढे सरण्याची संधी सगळ्याना मिळावी माणसाचे सारखेपण एवढ्यापुरतच आपण अवश्य मानलेले आहे

यातही एक पोटविचार आहेच अडचणीची परिस्थिती प्राप्त झाली तर ही संधी कोणाला द्यावी आणि अन्न-वस्त्र निवारा कोणाला पोचवावा याचाही विचार करावा लागतो आपल्याला माहीत आहे की, स्पार्टा शहरात दुबळी पोरे मारून टाकण्याची चाल होती वास्तविक पाहता मानवप्राणी म्हणून केवळ जगू देण्याचा हक्क तरी या पोराना सिद्ध व्हायला हवा होता परतु सृष्टीने समर्थ बनविलेली माणसेच जगू देण परिस्थितीने प्राप्त बनल्यामुळे लोकानी दुबळ्याचा नाश केला समाजातली रोगग्रस्त माणसे खच्ची करून गाडण्याची हिटलरची आज्ञा याच तत्वाला धरून होती हाती असलेल्या पुरवठ्याकडे लक्ष देऊन, एखाद्या बक्षात सापडलेल्या माणसापैकी, कोणाला भरपूर हिस्सा द्यावा आणि कोणाला देऊ नये याचा विवेक करणे जर प्राप्त झाले तर, जे त्यातल्या त्यात जास्त समर्थ आहेत, त्याना ता द्यावा, असेच अधिकारी ठरवतात भूतदया खरी, पण ही त्यातल्या त्यात कुणाच्या वाट्याला दाखवायची, हा प्रश्न पडला म्हणजे तारतम्याने समर्थाना सांभाळणे हे न्यायानेच प्राप्त होते पूर्वीच्या काळी ज्याच्याकडे साधन कमी म्हणून हा

विवेक माणसे जास्त करीत असत. पण भौतिक शास्त्रांनी समृद्धी आणून पोचविल्यामुळे आपल्या भूतदयेचा अमलही आपण अधिक विस्तृतपणे करू लागलो आहो. आणि अन्न-वस्त्र निवाऱ्यापर्यंतच नव्हे तर सविधमानत्वापर्यंत आपण येऊन पोचलो आहो. पण एवढ्यावरून सगळी माणसे सारखी आहेत, हे मात्र सिद्ध झाले असे नाही. ती केव्हा आणि कोठपर्यंत सारखी आहेत, याची चाळणा आपण मागणी करीत असतो, एवढेच सिद्ध होते !

## घोषणा अंगलट येत आहेत

सध्याचा मनू असा आहे की, हा समानत्वाचा घोष त्याच्या त्याच्या ताडी चालू राहावा. असे झाल्यामुळे अनेक प्रश्न उत्पन्न होत आहेत. मागासलेले असणे, दुबळे असणे, कर्तृत्वशून्य असणे हा हक्क (privilege) बनू पाहात आहे. आपल्या अंगातील सामर्थ्याची वाढ करून घेण्याला संधी पाहिजे, हा घोष तारम्याने न्याय्य ठरतो. पण आपण कसेही असलो तरी, समत्वाच्या मुद्द्यावर इतरांवर बरोबरीने जीवितातील सर्व सुखसोयी आपल्याला लाभल्या पाहिजेत, असा हक्क जगातील लोक सांगू लागले आहेत. म्हणजे कर्तृत्व एकाचे, शहाणपण, कळकळ, प्रतिमा, ही एकाची आणि ज्याच्या अंगी या गोष्टीचा मागमूसही उत्पन्न व्हावयास अजून बराच अवधी आहे तो, या समर्थांच्या कर्तृत्वातून निष्पन्न होणारे सर्व लाभ आणि भोग त्याच्या बरोबरीने भोगू इच्छितो. समत्वाचा हा अर्थ जगात रूढ होऊ पाहत आहे; आणि त्यातूनच जगात अनेक वाद सध्या चालू होत आहेत.

अमेरिका, आफ्रिका, ऑस्ट्रेलिया आणि काही अशी आशिया येथील निरनिराळ्या वादाकडे थोड बारकाईने पाहावे, म्हणजे भौतिक शास्त्रांनी सक्रिय बनलेली भूतदया मनाशी बाळगून, समर्थ लोकांनी, आपण होऊन केलेल्या घोषणा त्यांच्या अंगलट येत आहेत, असे दिसून येईल. निग्रो लोकांची गुलामगिरीची स्थिती पाहून, लिंकनला त्वेष उत्पन्न व्हावा आणि गुलामगिरीच्या शृंखला तोडून टाकण्यासाठी त्याने स्वकीयांशीसुद्धा जोराचा लढा करावा, हे पाहून मन अगदी प्रसन्न होते. त्याविषयी लोक पशुकोटीतून आपल्या मूळ मानवकोटीत येऊन बसलेले पाहून आपल्या अंगातील मानवता गहिवर

केले. अशा हातीं दमडा येता आणि सुखाने खायला मिळते, हा नवा शोध त्या रानवटांना लागला. तेव्हा कदाचित जबरदस्तीने आणि स्खुशीने ते काम करू लागले आणि हळूहळू त्यांचा समाजस्थिती पालटू लागली युरोपियन लोकांचे पाहून ते बदलू लागले. मग स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव या युरोपियनांच्या घोषणा त्यांच्याही कानी गेल्या आणि ह्या घोषणा आपल्यालाही लागू पडल्या पाहिजेत, असा त्यांनी दावा मांडला. नागरिकत्वाचे समान हक्क ते मागू लागले आणि लोकशाहीच्या गर्जनाही त्यांनी चालू केल्या यातूनच डॉ मालनचे भांडण निघाले आहे.

तो म्हणतो, "आम्ही गोरे लोक निराळे आहो आणि तुम्ही अनन्य लोक निराळे आहा. तुमच्यात आणि आमच्यात फार मोठी तफावत आहे. बहुधा तुम्ही आमच्या बरोबरीचे नसता म्हणून आम्ही तुम्हाला आमच्यात येऊ देणार नाही." या उद्गारामुळे मालनवर चोहोंकडून टीकेचा भडिमार होत आहे. पण अगदी मुळात पाहावयास गेले तर मालनचे काही चूक नाही मालन जर असे म्हणत असला का, तुम्हा लोकांना आम्ही वठीस धरू, आमची कामे तुमच्याकडून करवून घेऊ आणि तुम्ही हक्काविषयी बोलू लागला म्हणजे मात्र तुम्हाला लाथ मारू, तर मालनवर ठपका ठेवावा हे बरोबर पण परवा एकदा त्याने चक्क सांगून टाकले की, "या भूमीची आपण वाटणीच करून घेऊ. तुम्ही निराळे निघा, आम्ही निराळे निघू" या त्याच्या बोलण्यात आक्षेप्य असे काही नाही. दोघ निरनिराळे राहिर आणि आपापल्या कुवतीप्रमाणे ज्याने त्याने आपली सत्कृती व आपले राष्ट्र वाढविर तर दोघही सुखी होतील. पण समत्व, बंधुभाव इत्यादी गोऱ्या लोकांनी केलेल्या घोषणा आपल्याला लागू पडल्या पाहिजेत, असा आफ्रिकेतल्या मागासलेल्या लोकांचा दावा आहे. भांडणाचा जर हाता ता असा हाता!

केवळ त्याच्या शहराच्या रस्त्यावर जिरेमिरे विकावयास वसणाऱ्यानी समत्वाचे हक्क सागू लागावे हे चमत्कारिकच आहे. पण वर म्हटल्याप्रमाणे हे लोक काही घोषणाचा फायदा करून घेऊ इच्छितात यातून हे भाडण निघाले आहे आणि या घोषणाचा जाच इतका आहे की, खरे बोलण्याची कोणाची छातीच होत नाही. यामुळे नद्ववश राष्ट्र निर्माण करावे असा सल्ला कोणी देत आहेत. नद्ववश राष्ट्राच्या नगरी काय लिहिलेले असते, याचा प्रत्यय हा सल्ला देणाराना स्वत च्या घरात येतच आहे! तरीही समत्व आणि बधुभाव या घोषणाची नशा मुसलमानाच्यावर इतकी चढली आहे की, नव्या भाडणाची तयारी आपण आपल्या सलयाने करून देत आहो, हे त्याच्या ध्यानातच येत नाही.

ऑस्ट्रेलियन राष्ट्र या बाबतीत फार सावधानपणाने वागत आहे. ऑस्ट्रेलिया बेटातील फार मागासलेल्या आणि रानटी जमाती आता बहुधा नष्ट झाल्या आहेत आणि तेथे गोऱ्या लोकाचे राष्ट्र तयार होत आहे. प्रस्तुतचा विषय लक्षात घेता, तेथील सरकारने केलेली एक घोषणा लक्षात घेण्यासारखी आहे. त्याने चक्क सागून टाकले की, "आम्हाला ऑस्ट्रेलिया हा देश श्वेतवर्णीया साठीच ठेवावयाचा आहे येथे जागा रगड आहे, म्हणून युरोपातून आणि अमेरिकेतून ज्या कोणी गोऱ्या लोकाना येथे यावयाचे असेल त्यानी खुशाल यावे. आमच्या घराचा दरवाजा त्याना नेहमीच उघडा राहील, कोणकोणत्या देशाचा आहे, हे तपासण्याचे आम्हाला कारण नाही. तो श्वेतवर्णाय असला म्हणजे पुरे." नवलाची गोष्ट ही की, इग्लडातून दरसाल सव्वा लक्ष लोक ऑस्ट्रेलियात वसतीला जात आहेत आणि गाऱ्या लोकाचे एक मोठे थोरले राष्ट्र ऑस्ट्रेलियात जन्माला येत आहे आता त्याच्या या घोषणेमुळे तथाकथित 'उदार आणि नद्ववश-राष्ट्रवादी अगदी चिडून जातात. पण ही त्याची भावना अगदी चुकीची आहे. खिचडी करण्याने भाडणे सुरू होतात आणि कोणालाच सुख लागत नाही हे धडधडीत दिसत असताना ऑस्ट्रेलियाच्या या धारणाला दोष देणे हे हास्यास्पद आहे

## नवी लोकशाही अगदी कमी दर्जाची होईल

आता हिंदुस्थानात होऊ घातलेल्या लोकशाहीविषयी भद्र विचार आपल्या मनांत येणे हे अटळ आहे. सुदैवानं अमेरिकेत किंवा आफ्रिकेत रूपाची आणि वर्णाची जी विलक्षण तफावत आहे ती भारतात तितक्या अंशाने नाही; आणि जी थोडीशी आहे ती सामावून घेण्याची तत्परता लोक दाखवतील असे दिसते. पण संस्कृतीच्या बाबतीत फार मोठाले फरक आहेत. येथे लोकशाही प्रस्थापित होतच आहे; आणि तिला कोणीही आक्षेप घेतलेला नाही. पण याच्यापुढे एक नवा प्रश्न उपस्थित होणार आहे. आजपर्यंत भटक्या जाती, रानटी जाती, इत्यादी नावांनी ओळखले जाणारे लोकही आपल्या लोकशाहीत आता समाविष्ट व्हावयाचे आहेत. किती सहस्र वर्षे झाली कोणास ठाऊक, हे लोक जमातींच्या रूपाने जंगलात, दऱ्याखोऱ्यात, पर्वताच्या माथ्यावर राहत आलेले आहेत. आधुनिक जीविताचाच नव्हे तर सामाजिक जीविताचाही कसलाही संस्कार त्यांच्यावर झालेला नाही. पण त्यांच्या कानीसुद्धा स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव या घोषणा जाऊन पडत आहेत किंवा लवकरच पडू लागतील. संस्कृतीच्या प्रदेशात पुष्कळ वर्षे वावरल्यानेच या घोषणांच्या व्यवहाराला लोक पात्र बनतात, हा न्याय इथपर्यंत सापडेल असे वाटते.

सामाजिक मनाची मशागत झालेली असावीच लागते; तरच या उदार तत्त्वांच्या मर्यादा कोणत्या आणि याचा आग्रह किती धरावा, हे त्या त्या लोकांना कळू लागते. पण एका नव्या राष्ट्राच्या बांधणीत उत्पन्न होणारा अत्युत्साह या घोषणा करीत राहील आणि मशागतीसंबंधाने हवी तेवढी काळजी घेणार नाही. याचा परिणाम वाईट होईल. पूर्वांस्पृश्य लोकांसकट सर्व लोकांच्या मनाची मशागत वेदांपासून तो मतवाङ्मयापर्यंत प्रकट झालेल्या विचारांनी केलेली होती; म्हणून सारासारविवेक आणि न्यायबुद्धी यांची लवकारणी काळाने केल्यानंतरच या सर्व लोकांची लोकशाही प्रस्थापित व्हावयास कोणी तसलीही हरकत घेतली नाही. तरीही अज्ञानामुळे आणि पृथक्भावामुळे ही लोकशाही कमी दर्जाची होईल की काय, अशी शंका विचारवंतांना येतेच येते. पण ज्यांच्यावर कसलेच संस्कार झालेले नाहीत त्या रानटी जमाती जर

का या लोकशाहीत दाखल झाल्या तर उदित होणारी ही नवी लोकशाही अगदी कनिष्ठ दर्जाची होऊन बसेल, आणि रानटी लोकांनी ज्याप्रमाणे पैगंबराचे प्रतिपादन आपल्याकडे ओढून घेतले आणि हिंदुस्थानातल्या अनार्य जमातींनी ज्याप्रमाणे आपल्या चालीराती आणि समजुती आर्य लोकांच्या घरात घातल्या आणि अशा रीतीने एक धर्म आणि एक समाज निकृष्ट बनविला, त्याप्रमाणेच या देशातल्या लोकशाहीचेही होईल. म्हणून ठराविक घोषणांचा मुलाहिजा कितपत ठेवावा याचा विवेक सर्व लोकांनी वेळीच करावयास हवा. या थोर तत्त्वाची किंमत कोणीही कमी करू इच्छीत नाही; किंबहुना भावी जीविताला विशेष प्रकारची नरमाई त्यांनीच प्राप्त होईल, हे सुद्धा खरे आहे. पण याची अंमलबजावणी करताना तारतम्य आणि विवेकबुद्धी सुटता कामा नये, एवढेच येथे सुचवावयाचे आहे.

* * *

# २. गिरिजन आणि परिजन

आपण ख्रिस्ती मिशनऱ्याना नाव ठेवतो नाना प्रकारच्या कारवाया करून आणि पुष्कळदा नाना प्रकारची प्रलोभने दाखवून ते हिंदुधर्मातील लोकाना बाटवितात, याचे आपल्याला स्वाभाविकपणेच मोठे वैषम्य वाटते यावर प्रतिक्रिया सुरू होऊन ख्रिस्ती धर्मात गेलेली माणसे परत आपल्या धर्मात आणण्याची मोहीम जोरात चालू झालेली आहे व तिला यशही चांगले येत आहे ठिकठिकाणचे ख्रिस्ती मन गोंधळल्यासारखे झाले आहेत आणि काही काही ठिकाणचे मन तर अजीनातच उठले आहेत या मनोवाल्याना युरोप व अमेरिका येथील श्रीमंताकडून आणि सुप्रतिष्ठित धर्मसंस्थाकडून चांगल्या प्रकारचा आश्रय असे परंतु अलीकडे हा आश्रय दान करणारी तुट लागला आश्रय देणाऱ्या या कानावर ही वदा गेली की, हिंदुसमाजात प्रतिक्रियेला सुरुवात झाली आहे व बरेच बाटे देऊन जो मन एखादा मनुष्य ख्रिस्ती बनविता त्याच्या छत्राखालून बाहेर बेटे परत हिंदुधर्मात जात असतात अर्थात असला हा आतबट्ट्याचा व्यापार करीत राहणे त्याना नकोसे झाले असले पाहिजे पण याहीपेक्षा बलवत्तर कारण म्हणजे ख्रिस्ती धर्माच्या प्रसारावरची त्याची श्रद्धाच उडाली आहे आणि खुद्द ख्रिस्ती धर्माविषयीसुद्धा आधुनिक काळाला अनुसरून त्याच्या मनात शंका उद्भवली आहे अर्थात काठतरा पृथ्वीच्या पाठीवर चार माणसे आपल्या पैशाने ख्रिस्ती झाली म्हणून त्याच्या आत्म्याचे तारण होणार आहे या गोष्टीचा दूरान्वय त्याना पटेनासा झालेला आहे आणि म्हणून त्याना आपल्या दातृत्वाचा हात एकदम आखडता घेतला आहे अशा प्रकारे हिंदुसमाजातून सुरू झालेला प्रतिक्रिया आणि आश्रयदात्याच अंगात चाललेले दातृत्व यांच्या माऱ्याने जिकीरीस येणारे ख्रिस्ती धर्माचे मन लपून लागले असाव हे खरोखरच आहे

## शिकण्यासारखी गोष्ट

परंतु आपले समाधान एवढ्याने होता उपयोगाचे नाही. आपण ख्रिस्ती मिशनऱ्याना हसतो हे ठीक आहे, पण त्यांच्यापासून एक गोष्ट मात्र निःसंशय शिकण्यासारखी असते. जनसेवेचे व्रत त्याना पटलेले असते; ते आपल्याला अजून पटवायाचे आहे. सुमारे ४५ वर्षांपूर्वी मी एकदा पाडळीच्या स्टेशनवरून सातान्यास टांग्यातून चाललो होतो. माझ्या शेजारी एक युरोपियन बाई बसली होती. तिच्या मांडीवर आपल्या इकडल्या कोणातरी अस्पृश्याची मुलगी होती. टांग्यात बसल्यावर काही वेळाने अर्थातच आमचे बोलणे सुरू झाले. त्या मुलीला व तिला पाहून मला मोठा विस्मय वाटून मी तिला विचारले, 'आपण कोठून आला ?' ती म्हणाली की, मी स्विट्झर्लंडमधील आहे; मला अनेक भाषा येतात; येशूच्या धर्माचा प्रसार करण्यासाठी मी हिंदुस्थानात आले आहे.' आता या स्विस बाईने स्वित्झर्लंडमधील आपल्या घरातून उठावे आणि स्वधर्मप्रचारासाठी गरिबी पत्करून हिंदुस्थानात राहावे, हीच गोष्ट अगोदर विस्मयकारक आहे. परंतु ती धर्मप्रचारासाठी जर आली होती तर येशूचा संदेश लोकांपुढे सांगून तिने संतोष मानला असता की झाले असते. पण येशूच्या धर्माचा प्रसार केवळ तत्त्वाच्या प्रतिपादनाने होत नाही. धर्मप्रसारकाना लोकसेवेचे व्रत पत्करावे लागते. दुःखितांचे दुःख निवारण करणे, रुग्णांची परिचर्या करणे आणि अडाण्याला शिक्षण देणे ही कामे करणे त्यांना अवश्यच असते. तत्त्वप्रतिपादनाला जर या गोष्टींचा पाठिंबा नसला तर आपल्याला धर्मातील भूतदयेचा संदेश लटका पडेल असे त्यांना वाटते. आणि म्हणून या दूरस्थ बाईने महारवाड्यातील मुलाना शिकविण्याचे काम पत्करलेले होते.

## जनसेवेचे व्रत पत्करावे

पुष्कळ तरुण लोक विचारतात की, काय काम करावे ? ज्याच्या त्याच्या कानाशी राजकारणाचा पडघम वाजतच असतो. समाजाकडे लक्ष द्यावयास फार थोड्याना फुरसत उरते. हिंदू लोकांच्या अंगी समाजाकडे बघण्याची वृत्ती जोपर्यंत उत्पन्न होत नाही, तोपर्यंत त्यांचे

लोकशाही राजकारणसुद्धा पुढे सरणार नाही. लोकांत शिरावे ते त्यांना काही तरी उच्च दर्जाचे सामान्यांस शिकवावे, त्यांचे रागलोभ जागृत करावे आणि त्यांना कोणत्या ना कोणत्या तरी चळवळीत गोवून घ्यावे, एवढ्यावरच हे लोक संतुष्ट असतात. म्हणजे असे की, या लोकांचा त्यांना उपयोग करून घ्यावयास हवा असतो. कोणी कोणत्याहि मताचा असो, त्याच्या विचाराची धारणा हीच असते. लोक ही ओळखून असतात. हे आपल्याकडे का आलेले आहेत, याचा उमग त्यांना लवकर पडतो. त्यांच्या मनात आपला उपयोग करणाराला करून घ्यावयाचा आहे, कळण्याचा चतुरपणा अगदी अशिक्षित असूनसुद्धा त्यांच्या अंगात असताच असतो, आणि मग या आलेल्या पाहुण्यांच्यासंबंधाने काही संशयाची बुद्धी त्यांच्या मनात उत्पन्न होते. आपल्या समाजातील अज्ञ लोकांची अपेक्षा खरोखर अशी असते की, कोणीतरी आपल्या न्यायासाठी झगडावे, आपले अज्ञान कोणीतरी घालवावे, आपल्या अडीअडचणीत त्यांनी उभे राहावे व आपल्याला जर कोणी छळणारे असले तर आपली बाजू घेऊन कणखरपणे त्याचा प्रतिकार करावा. काय काम करावे म्हणून विचारणाऱ्या तरुण हिंदू मुलांना मी ही गोष्ट हजारदा सांगितली आहे की, काम पुष्कळ आहे पण ते तुमच्या चवीचे असेलच असे माझ्याने म्हणवत नाही. काही विशेष प्रकारचा नगारा असला, वर्तमानपत्रात नाव वाजण्यासारखी असली किंवा 'तुष्ट दाने महापुण्य' या पद्धतीचे एखादे काम असले तर ते तुम्हाला हवे असते. पण मी जे काम तुम्हाला सांगतो त्यात कीर्ती नाही, जाहिरात नाही अन् चुरचुरीतपणाही नाही. तुम्ही जनसेवेचे व्रत पत्करा. असे म्हटले म्हणजे या उत्साही तरुणांना ही फार

हा आक्षेप बालीश आहे. धर्मप्रसारासाठी का होईना, पण अत्यंत बिकट अशी जनसेवा ते करतात हे शिल्लक उरतेच. बरे, तुम्हाला तरी तीच गोष्ट व्हावयास हवी आहे. आपला धर्म टिकावा व त्याच्यामध्ये डोळसपणाने तो आचरणात यावा, अशीच तुमची इच्छा आहे ना? मग ही फलद्रूप होण्याला आपणही जनसेवेचे व्रत का पत्करू नये? खिरस्ती मिशनऱ्याच्या सेवेपेक्षा आपण केलेली सेवा आपल्या लोकाना फार जल्द पटेल अन् ती त्याच्या अंगीही लागेल. ज्याची भाषाही आपल्याला समजत नाही, जो आपल्या देशाचाही नव्हे आणि ज्याचा उपकार घेतल्यामुळे कदाचित त्याचा धर्मही पत्करावा लागेल, त्याच्याकडून सेनेचा उपकार घेण्याऐवजी तो स्वकीयाकडून घेण्यात आपल्या माणसाना जास्त गोडी वाटेल. आपण त्याच्यात जातच नाही आणि दुसरे कोणी गेले की ते आपल्याला सोसत नाही, या आपल्या दुष्टपणाचा काय उपयोग आहे? आपले बरे करणारा त्याना कोणी हवा असतो आणि तुम्ही तर त्याच्या वाऱ्यालाही फिरकत नाही; मग अशा परक्याच्या आश्रयाला तो जावो म्हणून काहीतरी करावे असे ज्या तरुणाना वाटते त्यानी हे जनसेवेचे व्रत अवश्य पत्करावे.

## याचेच नाव धर्मश्रद्धा

आमच्या या तरुण मित्रानी सेन्सस रिपोर्टाच्या म्हणजे शिरगणतीच्या कोशाचा थोडासा तरी अभ्यास करावा आणि सरकारने जे नानाप्रकारचे जातिविषयक वाङ्मय प्रसिद्ध केले आहे तेही डोळ्याखालून घालावे. म्हणजे ज्याना आपण आपले आपले म्हणतो त्याना आपण कोठे राहू दिले आहे याचे ज्ञान त्याना होईल. आणि अशा लोकासमधाने आपण कसल्या अपेक्षा ठेवतो, हे पाहून त्याच्या जिवाला लाज उत्पन्न होईल. तीस कोटी आणि बत्तीस कोटी हे आकडे मोठे तोंडभर आहेत, पण उच्चारताना आपली दाढे लाजेने मिटली पाहिजेत. समुद्रावर जर एखादे आरमार चालू असले तर त्या एकदर आरमाराचा वेग कोण ठरविते, हे आपल्या या उत्साही लोकाना माहीत असते काय? या आरमारात जे सगळ्यात कमी वेगाचे जहाज असते ते त्या साऱ्या आरमाराचा वेग ठरविते! वर्गातील मद्बुद्धीच्या मुलाच्या गतीनेच एकदर वर्गाची गती ठरविणे शिक्षकांना भाग

पडते. आपल्या समाजात कोण्यवधी प्रजा अशी आहे की, जिच्या वस्तीवर अजून मस्तूतीची पहाट फटफटलीसुद्धा नाही. किती शतके झाली कोणास ठाऊक ! पण अज्ञान, दास्य अन् लाचारी याच्या तिमिरात ही प्रजा सारखी पिचत पडली आहे. विठ्ठल जसा अठ्ठावीस युगे विटेवर उभा आहे, तसे हे सारे लोक अठ्ठावीस युग कदमात उभे आहेत. म्हणून ज्याला कुणाला याच्या सबंधाने थोडेतरी ममत्व असेल, थोडीतरी स्वत्वाची आपुलकी असेल, त्याने या लोकांच्या नितिनात शिरावे आपला निर्वाह स्वतनपणे करावा, पण त्याच्या सेवेचे मन मान चालवावे आणि आपण आपल्या नेहमीच्या कर्दमातून या माणसाच्या प्रयत्नाने हळूहळू बाहेर पडत आहो हे त्या माणसाच्या प्रत्ययाला आणून द्यावे. याचेच नाव स्वदेशवृत्ती, याचेच नाव धर्मश्रद्धा. फार काय सागावे, याचेच नाव माणुसकी असे आहे

## उद्धाराची खरी किल्ली

सागितले तर वाईट वाटेल परतु साधे भूतदयेचे शिक्षणसुद्धा आपल्याला मिळावयास हवे. आचारकाड अन् भूतदया याचे द्वद्व जर उत्पन्न झाले तर आपण आचारकाडाला महत्त्व देतो आणि भूतदया वाऱ्यावर सोडतो. एकदा एका आडवळणी रेल्वेस्टेशनवर काही तरी कामानिमित्ताने वडार म्हणा किंवा दुसरे कोणीतरी म्हणा, अशा लोकांची थोडीशी वस्ती झालेली होती. स्टेशन मास्तराची वडील पत्नीण पोक्तशी समाधित बाई होती तिला लहान मुलाच्या रोगाची काही माहिती असे. एके दिवशी त्या वडारांपैकी एक बाई आपल्या लहान मुलाला घऊन मास्तराच्या घरी आली तोंड उघडे ठेवून पोर धापा टाकीत होते आणि त्याच्या पोटाचा कोयळा वर खाली होत होता. या वैद्यीणबाई पुढे आल्या अन् त्यानी रोगाने दाखवून त्या मुलाच्या आईलाच त्याचे पोट चाचपावयास लावले. इथे पोट दाटर लागत आहे का, तिथे मऊ लागत आहेत का, अशा अनेक पृच्छा या सोवळ्यात असलेल्या बाईने केल्या आणि पोराच्या दुखण्याचा अदाज केला. त्या माउलीला स्वाभाविकच वाटत होते की आपल्या लेकराला वैद्यीणबाईनी जवळ घेऊन पहावे. परतु तिला माहीत नव्हते की, आचारकाड आणि भूतदया याचा जर लढा उत्पन्न झाला तर हे लोक आचारकांडाचा महिमा

जास्त मानतात! खरोखर ही बाई जर जल्द पुढे आली असती, तिने मुलाला जवळ घेतले असते आणि साक्षेपाने त्या मुलाची तिने परीक्षा केली असती, तर ती जास्त धर्मशील ठरली असती, पण आचारधर्माचा पगडा आपल्या बुद्धीवर इतका बसलेला आहे की, साध्या भूतदयेचे आवाहनसुद्धा आपल्या मनाला लवकर पोचत नाही. मी हे स्वकीयांना हिणविण्यासाठी लिहीत नाही; स्वतःच्या समाजाचे यथारूप दर्शन तरुणांना व्हावे यासाठी लिहीत आहे. ते जर या अज्ञान्यातून बाहेर पडले अन् निर्मळ मनाने या सर्व मागासलेल्या समाजात शिरले तर ते आर्त लोक त्यांचे दोनही हातांनी स्वागत करतील. धर्मश्रद्धा, भूतदयान्वित आणि सर्वांच्याहीवर म्हणजे दुसऱ्याच्या अंगातील मानवता ओळखण्याची माणुसकी ज्यांच्या अंगी आहे अशा तरुण लोकांच्या दहा-दहा, पंधरा पंधरा टोळ्या जर रामोशी, मांग, वारली, ठाकूर, नागली, भील, गोंड, खाड अशा नाना प्रकारच्या जातींत जाऊन जनसेवेचे मठ करून राहिल्या तर त्यांच्या हातून खरोखरी देशसेवा झाली असे म्हणता येईल. देश म्हणजे देशातील दगड किंवा माती नव्हे, देश म्हणजे देशातील माणसे ही केवळ आकाराने असलेली माणसे खऱ्या खऱ्या माणुसकीत आणून सोडणे आणि आज जी हिंदुधर्माच्या केवळ वळचणीखाली ती उभी आहेत तेथून, धास्तनपुस्तन, पुसूनपुसून, शिक्षण देऊन, सत्कार करून त्यांना हिंदुधर्माच्या चतु सीमेच्या आत खखशीतपणे प्रवेश करून देणे याचे नाव धर्माची आणि देशाची सेवा होय. म्हणून शेवटी एवढेच सांगावयाचे की, खिस्ती मिशनऱ्यांच्या प्रयत्नाकडे थोड्या उच्च अर्थाने आपण पहावयास शिकले पाहिजे, जनसेवेचे व्रत आपण पत्करले पाहिजे. हिंदुसमाजाच्या उद्धाराची ही खरी खरी किल्ली आहे.आपल्या अंगी अस्मितेपणा फार असतो, आपण अतिशय तुसडेपणाने वागतो. आपल्या अंगचे ममत्व सख्यासोयऱ्या पर्यंतच पसरते. लोकांना दूर ठेवल्याने धर्माची जपणूक होते, असे आपल्याला वाटते. हे सारे बदलले पाहिजे. बदलले तरच आपला तरणोपाय आहे एवढेच शेवटी निकराने सांगावयाचे आहे

● ●

याने कशाचीही लुडबुड करू नये, असे आग्रहाचे प्रतिपादन लोकशाहीची सत्ता करीत असते. अर्थात त्या त्या मानाने आपल्या लौकिक जीवनाविषयी धर्मही उदासीन बनत चालला आहे! आणि म्हणून देशातील प्रजांच्या सुखसंवर्धनाच्या कामी धर्माने आपल्या साहाय्याला यावे अशी गूढस्थ अपेक्षा एखाद्या लोकशाही सरकारने बाळगली तरी ती सफल होण्याचा संभव आता फारसा उरलेला नाही.

काळातील सुधारणेचा डंका या लोकांच्या कडेपठारावर आणि दऱ्याखोऱ्यात-सुद्धा थोडाबहुत तरी जाऊन पोचला आहे; त्याची झोपमोड झालेली आहे आणि देशात चाललेल्या प्रचंड घडामोडींकडे थोड्या कुतूहलाने आणि थोड्या अस्वास्थ्याने ते पाहू लागले आहेत. त्यांना प्राप्त झालेल्या या जागृतीचा आदर कसा करावयाचा, याकडे लक्ष देणे राज्यसंस्थेला आता प्राप्तच आहे.

## राज्यसंस्थांनी साथ द्यावी

जेवढ्या प्रश्न आपल्या शासनक्षेत्रात येत असतील तेवढ्या साऱ्या अमुक एका दर्जापर्यंत तरी सुमस्कृत झाल्याच पाहिजेत असा आधुनिक कालातील लोकशाही सरकारांचा बाणा आहे. हा बाणा लोकहितबुद्धीमुळेच केवळ उत्पन्न झालेला असतो असे नव्हे. एकदर प्रजेची तोलदारी अमुक इतकी वाढलेली असल्याशिवाय राज्ययंत्रच पुरेसे बळकट बनत नाही आणि टिकून राहत नाही आणि म्हणून आपल्या शासन-क्षेत्रातील कोणीही माणसे अतिशय मागासलेली राहू देणे या सत्तेच्या हिताचे नसते. आधुनिक राज्यसंस्थेच्या या यथार्थ समजुतीने मागासलेल्या लोकांचे काम आपोआपच होते व चालू काळात हेच घडून यावयास हवे. रानटी व अर्धसंस्कृत लोकांना जागृती आलेली आहे, हे जरी कोणाला अमान्य असले तरी त्या त्या लोकांना अज्ञानात व दुरवस्थेत राहू देणे हे आपल्याच हिताचे नाही, हे लक्षात घेऊन आपल्या सरकारने आता त्यांच्या सुधारणेचा उपक्रम केला पाहिजे. सत्ता आणि साधने ही हाताशी असल्यानंतर लोकसुधारणेच्या

भीजवाऊन आहे. राखेच्या ढेपळावर पाण्याचा एक थेंब पडला तर तो पहिल्याने थोड्याशा जागलाच ओलेपणा आणतो, परंतु हळूहळू आणि कोणाच्या लक्षात न येता तो सबंध ढेपळा ओला झालेला दिसतो. हे अत्यंत सौम्य कार्य केशाकर्षण न्यायाने घडून येते. हिंदुसंस्कृतीच्या प्रसाराचे काम आजपर्यंत याच न्यायाने घडून आलेले आहे. जर कोणाला या कामी शंका असेल तर त्यानी ख्रिस्ती मिशनऱ्याना जाऊन विचारावे. ते त्याना सांगतील की ज्याना आम्ही अगदी रानटी समजत होतो त्या लोकांच्यातहि हिंदुसंस्कृती जाऊन पोचलेली आहे. इंग्रजी राज्य सुरू झाल्यानंतर इकडे येऊन दाखल झालेल्या ख्रिस्ती मिशनऱ्याना आभाळ ठेंगणे झाले होते. ते उघड उघड म्हणत असत की, हा सारा हिंदुस्थान देश आम्ही शेपन्नास वर्षांत ख्रिस्ती करून टाकू. आमच्या या समाजातील जेवढी म्हणून वेगुण्ये त्याना जमा करता येण्यासारखी होती तेवढी त्यानी जमा केली आणि युरोपातील अनेक देशांच्या लोकात आणि ख्रिस्ती धर्माच्या पथापथात ती प्रसिद्ध केली, अर्थात या साऱ्या ठिकाणाहून ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या झुंडीच्या झुंडी हिंदुस्थानात येऊन दाखल झाल्या. पण काम सुरू झाल्यानंतर त्यांच्या ध्यानात येऊ लागले की, येथील अत्यंत अज्ञान जातींची मनोभूमीसुद्धा वाटले होते तितकी कोपराने खणण्या सारखी नाही. अगदी अडाणी जातींनासुद्धा हिंदुत्वाची आळख झालेली आहे आणि त्या बाबतीत तिची मनोभूमी टणक बनलेली आहे. परंतु हिंदुधर्माने केलेले हे काम फार अल्प आहे. आणि या कामात योजना हे नाव पावण्या सारखा प्रयत्न फारसा झालेला नाही, ही गोष्ट मान्यच करावयास हवी. आता प्रस्थापित झालेल्या लोकशाहीने सत्ता आणि साधन यांचा उपयोग जर मुत्सद्दीपणाने केला तर हिंदुधर्माने आरंभिलेले काम झपाट्याने चालीस लागेल.

आपल्या ऐहिक आणि लौकिक जीवनातून धर्माला अलग काढणे याचा अर्थ धर्मशून्य बनणे असा नव्हे. आजपर्यंत जी कामे धर्म करीत होता ती राज्यसंस्थेनेच प्रत्यक्ष करणे ही आपली खरी उन्नती आहे. यालाच सध्या civic virtues म्हणतात नागर गुण म्हणून म्हणतात. त्यांची शिकवण पूर्वीच्या काळी धर्माच्या द्वाराच होत असे. पण, सध्या या गुणांसाठी आता कोणी धर्माकडे बघत नाही. आपल्या जीवितात घडून चाललेला हा फरक असंस्कृत आणि रानटी लोकांच्या सुधारणेच्या कामातही लागू केला पाहिजे

सर्वा त्याना दिली आणि अभिमान शाबाळून जगता यत, असं त्याना दाखवून दिले म्हणजे या जाती बरोबर वरा होतील

काही जाती अशा आहेत की, त्याच्या अगी हा स्वतत्रपणाचा हट्ट मुळाच नाही आपण परिग्रपणाने वागणार असा हट्ट त्या मळाच धरीत नाहीत इतकच न्हे, विमलपणाने त्या दूर राहिलेल्या आहेत सुसस्कृत लोकाकडे पाहताना त्याचे डोळे दिपतात आणि या नागरजीवनात पाऊल टाकताना त्याना थरकाप होतो याच्या मनात विश्वास उत्पन्न करणे, आणि आपण इतर चार चाराप्रमाणच आहो असे त्यास वाटावयास लावणे, हे सरकारचे त्याच्या राजनीतील पाहले कर्तव्य आहे त्या प्रदेशात ते राहतात त्या प्रदेशातील खनिजसपत्ती किंवा वनसपत्ती ही बाहेर कशी काढावी याच्या काही योजना जर सरकारने त्या त्या ठिकाणीच केल्या तर त्याचा प्रादेशिक अभिमान सभाळल्यासारखा होईल आणि नव्या धनाच्या बळावर आपले प्रपच जागच्या जागी सुधारू करता येण्यासारखे आहेत, असं त्याना वाटू लागल जेथे काळजा असल तथ कारखाने काढाव हा न्याय जर बरोबर आहे, तर जेथे माणसे आहेत तेथच आसपासची दोलत जागृत करावी आणि त्याना प्रपचाची साधन उपलब्ध करून द्यावी, हा न्याय कितीतरी पटीने जास्त बरोबर आहे पागला मिळाले खरे, पण तेवढ्यासाठी आपल्याला आपली भूमी सोनवी लागली असं जर दिसले, तर माणसाला उपरेपणाचा जाणीव उत्पन्न होते, आपण मगण आहो असं त्याला वाटू लागते आणि कगार बनल्याने आपण कोठतरी पोगापाठीमाग वणवण करीत चालला आहो, अशी आशाळत त्याच्या मनाला येत हे सारे सहज चुकावता यण्यासारख आहे ज्या ठिकाणी ते ते लोक असतील त्या ठिकाणच्या आसपासच्या मुलखात चाल करता यण्यासारखे धद सरकारने सुरू कराव म्हणजे या लोकानी वर सागितलेली दु खे होणार नाहीत हे धद सुरू झाले म्हणजे त्याची नवा गाव वसतील आणि याच्या मागोमाग शाळा, दवाखान, कचेऱ्या लोकलबोर्ड नगरपालिका हे आधुनिक काळातील सारे ऐश्वर्य तथ आपसुखच प्राप्त होईल

० ०

पवित्र जळाचे प्रोक्षण

याच्यापैकी काही जातींना इंग्रज सरकारने गुन्हेगार हे नाव दिलेले आहे. महाराष्ट्रात अशा अनेक जाती आहेत. खरी गोष्ट अशी आहे की, गुन्हे केल्याशिवाय सरकारने त्याना गन्यतरचे ठरू दिलेले नाही आणि मग त्या त्या जातींना त्यांनी गुन्हेगार हे नाव दिले. पूर्वीच्या काळी किल्ल्याच्या रक्षणाचे काम रामोशाकडे असे, पण किल्ल्याचा महिमा सपल्यानंतर रामोशाचा धदाही बुडाला. त्याच्या अगात रग होती आणि ते भीक मागावयास तर कधीच तयार झाले नसते. मग त्यानी वाटमारीस सुरुवात केली आणि सरकार म्हणू लागले की, तुमची जात गुन्हे-गाराची आहे. गुन्हा केलेला माणूस रामोशी असतो याचा विपर्यास होता होता गुन्हेगाराची जमात असते, असा सिद्धान्त प्रस्थापित व्हावयास आदाच सागितलेला इतिहास कारण झाला. समाजाची काळजी बाळगून जर इंग्रजानी या लोकाना पोट भरण्याचे एक निराळे साधन उपलब्ध करून दिले असते, तर गुन्हेगार हे वाईट नाव त्याना प्राप्त झाले नसते. मराठ्याचे आरमार बुडाले आणि त्यावरचे लोक काही धदा न उरल्यामुळे समुद्रावर वाटमारा करू लागले. इंग्रजानी त्याना तावडतोब गुन्हेगार हे नाव दिले. पण जर त्यानी या लोकाना उपजीविकेचे नवे साधन वेळेवरच प्राप्त करून दिले असते, तर याही जातीवर गुन्हेगार शिक्का बसला नसता. आता आमच्या स्वदेशी सरकारने त्या चुका भराभर दुरुस्त कराव्या.

सागण्याचे तात्पर्य असे की, ज्या जात सर्व तऱ्हेच्या संस्कृतीपासून अगदी दूर राहिल्या आहेत आणि विमिस्तपणाने अग चोरून बसलेल्या आहेत; ज्या अर्धसंस्कृत, पण हटिग्रपणाने वागण्याची इच्छा बाळगून आहेत आणि ज्या गुन्हेगार या नावाला प्राप्त होऊन बसलेल्या आहेत, त्या सर्वावर आपल्या सुधारणेच्या जळाचे पवित्र प्रोक्षण सरकारने केले पाहिजे आणि हे करताना त्यांच्या जीवितात ज्या धर्माने थोडाफार प्रवेश केलेला असेल त्या धर्माचे ऋण मान्य करून दशवार्षिक परिगणना करताना त्याची मोजणी त्यानी हिंदुधर्मातच केली पाहिजे. सरकारने एवढे कर्तव्य बजावले म्हणजे मग अजूनहि धर्मसंस्थेन

त्या उपयुक्त गोष्टी शिल्लक राहिल्या आहेत आणि त्यांची किंमत राज्य-गेलेल्या देता येण्यासारखी नाही, त्या दराल लेखाच्या घरी पोचविण्यास हिंदु समाजातील तरुण सुधारकांनी जोमाने सिद्ध व्हावे.

* * *

दत्तात्रय केशव केळकर

# धर्माची रेशमी काढणी !

जुलमाचा प्रतिकार करणारी पौरुषवृत्ती बधिर करणारे आणखी एक साधन म्हणजे धर्म हे होय. पौरुषवृत्तीची खच्ची करण्यात काही धार्मिक कल्पनांचे साहाय्य झाले आहे हे अप्रिय असले तरी सत्य आहे. कोणत्याही धर्मातील मध्यवर्ती कल्पना ही जुलूम व पारतंत्र्य यांना विरोधकच आहे हे खोटे नव्हे. 'परोपकार. पुण्याय पापाय परपीडनम्' ही सर्व धर्मांची मध्यवर्ती कल्पना होय. या कल्पनेला मूर्त स्वरूप म्हणून विश्वजित यज्ञ, सुवर्णतुला, अन्नसत्रे, धर्मशाळा, पाणपोया, देवालये, अनेकविध दाने यांचा पुरस्कार करून निकृष्ट वर्गांची दुःखे हलकी करण्याचाच धर्माने प्रयत्न केला आहे. तसेच प्रत्येक माणूस परमेश्वराचा अंश आहे अशी घोषणा करून पारमार्थिक दृष्ट्या सर्वांचा दर्जा समान होय असेही

कोणता फायदा ? ' वैदिक आर्य एके काळी अनार्यांना जिंकीत, आयुष्यातील सुखे भोगीत 'पश्येम शरद शतम् । जीवेम शरदः शतम्' असे उत्साही उद्गार काढीत सुखाने नांदत होते. पण तो काळ ओसरल्यावर जगत् दुःखमय आहे, संसार असार आहे, ऐहिक सुखाच्या मृगमरीचिकेतून जितक्या लवकर सुटता येईल तितके चांगले, वगैरे विचाराचा प्रवाह जो एकदा सुरू झाला तो येथ आजतागायत. ज्या महाभारतग्रंथात 'कर्मयोगो विशिष्यते' असा उपदेश करणारी गीता अंतर्भूत आहे त्या महाभारत ग्रंथातही 'जगात सुखापेक्षा दुःखच जास्त आहे हे निःसंशय' असा उपदेश आहे. (शांति. २०० )

सस्यश्यामला व मलयजशीतला अशा या आपल्या सुवर्णभूमीत राहत असता संसार दुःखमय होय ह्या नामर्दकारक विचारसरणीची पकड लोकांच्या मनावर कशी बसली ह्याचे भारताचार्य वैद्य यानाही आश्चर्य वाटते. ते लिहितात की, 'हा एक खरोखर चमत्कारच आहे की चार्वाकाशिवाय सर्व निरनिराळ्या मताचे भारतीय आयतत्त्वज्ञानी जगात दुःख भरलेले आहे असे एकमनाने मानतात. सर्वांच्या मनावर हेच एकसारखे आरूढ झालेले आहे की, या जगातील वैभव क्षणभंगुर आहे. मोक्षधर्माच्या शांति पर्वातील भागात पहिल्या अध्यायात जगताच्या नश्वरत्वाचे पूर्ण विवेचन केलेले असून वाचणाऱ्याच्या मनात जगताविषयी विराग उत्पन्न करण्याचा चांगला प्रयत्न केला आहे किंबहुना ज्यास मोक्ष साधावयाची इच्छा आहे त्यास प्रथम वैराग्यच पाहिजे, असे आपल्या सर्व तत्त्वज्ञांचे मत आहे.' (पृ. १६ ) ते पुढे लिहितात की, भारतीय आर्यांच्या बहुतेक तत्त्वज्ञानाचा संसारत्यागाकडे साधारणपणे कल आहे. या गोष्टीचे एकप्रकारे आश्चर्य वाटते. कारण ज्या देशात ते राहत होते त्यात भौतिक सुखसाधने सर्व प्रकारची भरलेली होती, अर्थात जगताचा कंटाळा येण्यास भारतवर्षात कोणतीच परिस्थिती अनुकूल नव्हती. कदाचित असे असू शकेल, की भारतीय आर्यांचा स्वभाव मूळापासूनच वैराग्ययुक्त असावा आणि एकंदर देशातील राज्यव्यवस्था ही हळूहळू या त्यांच्या मनाच्या प्रवृत्तीस वळकटी आणण्यास साधनीभूत झाली असावी. ज्या समाजात निरनिराळ्या व्यक्ती समाजाच्या कल्याणाविषयी, सर्वांचा संबंध न राहिल्याने विचार करीत नाहीत, त्या समाजात समाष्टिरूपाने निरुद्यमाचा अहंभाव उत्पन्न होत नाही. प्रत्येक व्यक्ती आपआपल्या सुखदुःखाच्या

विचारानच प्रासली जाते एकंदर समष्टिरूपाच्या समाजाची सुखदु खे त्याच्या मनासमोर उभी राहत नाहीत किंवा त्याची काळजी तो वाहत नाही राष्ट्ररूपी समाज दीर्घायुषी असल्याने राष्ट्रविषयक कल्पनानी प्रत्येक मनुष्याच्या मनात जागृती असल्यामुळे त्याच्या क्षणिक सुखदु खाचा विसर त्यास पडतो आणि ससार हा केवळ सुखमय आहे अशी भावना त्याच्या मनात राहत नाही हिंदुस्थानातील राज्ये हळूहळू भारतकालात एकतन्त्री राजसत्ताक झाली अर्थात क्षत्रियाखेरीज इतर वर्गाचा म्हणजे ब्राह्मण, वैश्य, शूद्र यांचा राष्ट्रीय कारणाशी सबध बहुतेक नाहीसा होऊन राष्ट्रीय व्यवहाराविषयी त्यास काळजी राहिली नाही राष्ट्रीय जीविताची अहंभावना त्यांच्या ठायी नष्ट झाली व तो ता आपल्या सुखदु खानी व्याप्त होऊन एकंदरीत ससार दु खमय आहे अशी कल्पना सामान्य लोकात प्रसृत झाली असावी या गोष्टीचे कोणतेही कारण असो, भारतीय प्राचीन आयतत्त्वज्ञानाचा कल ससार दु खमय आहे असेच मानण्याकडे आहे यात सशय नाही अर्थात ससारचक्रातून सुटून जाण्याचा सरळ व एकच उपाय म्हटला म्हणजे संसारत्याग होय असे त्याचे मत होणे साहजिक आहे ' ( महाभारत-उपसहार पृ ४८७ )

## सर्वं दु खम् !

बुद्धधर्माची सर्व शिकवणच मळी 'सर्वं दु खम् या तत्त्वावर उभारलेली होती पण या दु खवादाच्या छायेतून पश्चात्तही सुटली नाहीत त्रिविधतापान पोळलेला प्राणीच मोक्षास अधिकारी होय अशी एकदर मांडणी असल्याने ससाराविषयी तिरस्कार उत्पन्न होईल असेच ससाराचे वर्णन करण्याचा अध्यात्म प्रयत्नाचा प्रचारच पडून गेला ससारात असता प्रत्यक्षदर्शी सामाजिक जबाबदारी आहे ह्याचीही आठवण बुद्धी व ससारातून जितके लवकर निसटता येईल तितके बरे या विचाराने ससाराकडे पाठीशी परकेपणाने पाहण्याची वृत्ती वळावली ज्ञानदकालीन आर्य म्हणत असत की, ' देवाना अर्पण न करिता व मित्राना न देता जो भुक्त स्वतःच खात राहतो तो पापी होय तसेच समाजाच्या सुस्थितीचा विचार करण्याची जबाबदारी ज्यांच्यावर होती त्या स्मृतिकारानीही आश्रमव्यवस्थेचा उपदेश केला व मनुस्मृतीप्रमाणे स्पष्ट सांगितले की, ' वेदाध्ययन, प्रजापालन,

यज्ञयाग वगैरे जे धर्म द्विजांना सांगून दिलेले आहेत त्यांची सांगता झाल्याविना जो मोक्षाची इच्छा धरील तो मोक्षाऐवजी अधोगतीस जाईल!' तसेच माणूस जन्मास येतो तो तीन ऋणे घेऊन येतो. ती फेडल्याशिवाय मोक्षाचा विचार करणारा अधःपातास जातो, असे स्पष्ट बजावण्यास कमी केलेले नाही. पण आध्यात्मिक ग्रंथकारांनी समाजशास्त्रकारांची ही शिकवणूक धाब्यावर बसवून जाबालोपनिषदाच्या मुखाने 'ज्या दिवशी वैराग्य उत्पन्न होईल, त्या दिवशीच संसाराचा त्याग करून संन्यास घ्यावा' अशी स्पष्ट अनुज्ञा दिली. इतकेच नव्हे तर संसाराविषयी जुगुप्सा उत्पन्न व्हावी अशा प्रकारे संसार हा तापदायक होय अशी शिकवणूक सुरू झाली. सर्व दर्शनग्रंथांनी 'संसार हा दुःखमय होय, त्यातून सुटणे हा मोक्ष व त्याचा मार्गदर्शक आपले दर्शन किंवा शास्त्र' अशी मूळ भूमिकाच घेतलेली आहे. सांख्यकारिकाकार लिहितो की, 'दुःखत्रयाने होरपळलेल्याला मोक्षाची जिज्ञासा उत्पन्न होते.' अशा रीतीनेच त्याने ग्रंथाची सुरुवात केली आहे. न्यायदर्शनकार लिहितो की, 'गोड लागणाऱ्या विषाने कालविलेले अन्न जसे त्याज्य होय तसे दुःखाशी चिकटलेले सुख हे त्याज्य होय.' योगदर्शनकार लिहितात की, 'संसारातील सर्व सुखांचा अंत दुःखात होत असल्याने विवेकी माणसांना सर्व दुःखमयच दिसते. ब्रह्मसूत्रावरील भाष्यकाराकडे पाहिले तरी हीच वृत्ती आढळते. शंकराचार्य 'ये हि संस्पर्शजा भोगाः दुःखयोनय एव ते' या गीताश्लोकावर भाष्य करताना लिहितात की, 'नहि संसारे सुखस्य गंधमात्रमप्यस्ति!' संसारात सुखाचा गंधही कसा तो सापडणार नाही!

### संतांचा टाहो असाच!

प्राकृत संतकवींनीही हीच परंपरा पुढे अटळ चालविली. संतमंडळींतील 'आधी प्रपंच करावा नेटका', 'यत्न तो देव जाणावा' व 'शक्तियुक्ति जये ठायीं। तेथे श्रीमंत नांदती' अशा प्रकारची समाजधर्माची व पौरुषाची आठवण शिवाजीकाळी जागविणाऱ्या रामदासांनीही दासबोधाच्या पूर्वार्धांत संसाराविषयी उद्वेग उत्पन्न होईल अशा रीतीने, परंपरेस अनुसरून, संसाराचे हिडीस चित्र रेखाटण्यास कमी केले नाही. आणि तेही अगदी सविस्तर! दासबोधाच्या तिसऱ्या दशकात 'जन्म

दुःखाचा अंकुर। जन्म शोकाचा सागर। जन्म भयाचा डोंगर। चळेना ऐसा ॥' अशी सुरुवात करून शरीराचे मूळच मुळी अमंगळ कारण—' अत्यंत दोष त्या विटाळा। त्या विटाळाचाचि पुतळा। तेथ निर्मळतेचा सोहळा। काय घडे ॥ वरिवरि दिसे वैभवाचे। अंतरी पोतडे नरकाचे। जैसें झांकणें चर्मकुंडाचे। उघडताचि नये ॥' असे जन्मक्रियेचे व शरीराचे वर्णन करून आहे. नंतर नारार स्त्रीही मोहक दिसले तरी, आत 'अंत्रें हाडें आणि आंतडीं। नाना दुर्गंधाची पोतडीं। अमूप स्वयवती शातडा। कपाळवाणी ॥' यांची जाणीव मानवास अहानग लागविली पाहिजे परलोकचा नरक टाळवयाचा असल्यास ह्या शरीरांतील नरकाचे नित्यस्मरण राहिले पाहिजे 'एवं मळमूत्र आणि वमन। हेंचि देहाचे जीवन। येणेंची देह वाढे जाण। यदर्थी संशय नाहीं ॥' याप्रमाणे देहदुर्गंधीचे व गर्भवासाचे वर्णन दहा ओव्यांत पैटविले आहे! दुसऱ्या समासातही संसार हाचि दुःखमूळ। लागतीं दुःखाचे इंगळ ' अशी सुरुवात करून दुसऱ्या, तिसऱ्या चवथ्या व पाचव्या अशा समासांत बालपण, तारुण्य, वृद्धपण अशा तिन्ही अवस्थामध्ये जन्मापासून मरेपर्यंत जीवाला अहर्निश दुःखाचे कसे चटके बसत असतात याचे सविस्तर विवरण करण्यास सुमार अनीचशे ओव्या खर्ची घातल्या आहे यानंतर पुन्हा निर्धिवतापाचे वर्णन आहे ते निराळेच या वर्णनातयाप्रमाणे सामान्यत संसार जर इतका दिदीस व अमंगळ असेल तर त्यातून जितक्या लवकर पार पडता येईल तितके बरे, असे वाटणे स्वाभाविकच नाही का'

करण्याची कल्पना नष्ट न झाली तरच नवल. किंबहुना प्रतिकार तर राहोच, पण, 'तैसा ससारें दुःखावला । त्रिविध तापें पोळला । तोचि एक अधिकारी जहला । परमार्थासि ॥' या कल्पनेप्रमाणे संसारातील आपत्तींबद्दल परमेश्वराचे उपकार मानण्याची उलटी प्रथा सुरू झाली. तुकाराममहाराजांनीही आपत्तींचा असाच गौरव केला आहे. ते म्हणतात, 'बरें झालें देवा निघालें दिवाळें, बरी या दुष्काळें पीडा केली । अनुताप तुझा राहिलें चिंतन, झाला हा वमन मवसार । बरें झालें देवा बाईल कर्कशा, बरी हे दुर्दशा जनामध्यें । बरें झालें जगीं पावलों अपमान, बरें गेलें धन गुरेंढोरें । बरें झालें नाहीं धरिली लोकलाज, बरा आला तुज शरण देवा ॥' वास्तविक तुकोबादि भक्तश्रेष्ठांनी मौलांनी सत्तेचा धुमाकूळ थयथयाट करीत असताही स्वधर्म व स्वभाषा यांचे तेज सतत कायम राखले व गोब्राह्मणप्रतिपालक छत्रपतींच्या राज्याभिषेकाची भूमिका तयार करून ठेवली, हे मी विसरलो नाही. हे खरोखर असताही प्रवृत्तीपेक्षा निवृत्तीवर, जनताजनार्दनापेक्षा स्वर्गीय जनार्दनावर त्यांनी भर दिला तो त्या कालच्या प्रवरपरंपरेस धरूनच होता. *मात्र आता बदलत्या* **कालानुरूप व विज्ञानवृद्धीला अनुसरून इहलोकही आनंदमय करण्यास झटले पाहिजे.**

## दुःखवादाची अखंड परंपरा

ही आदर्श आनंदमय परिस्थिती अद्याप दूर क्षितिजावरच असून संसारदुःखवादाची परंपरा आजतागायत अखंड चालू आहे. आजचे विद्यमान साधुसंत हे पूर्वीच्या परंपरेतच रुळलेले. पण आजच्या नव्या युगातील धर्ममताचा चिकित्सक इतिहास लिहिण्याचा बाणा बाळगणाऱ्या परंपरावाद्यांचाही स्थिती संसार हा आनंदमय होय असें म्हटल्याने नाकास मिरच्या झोंबल्यासारखी कशी होते, हे तुम्हास पहावयाचे असेल तर *नवयुगधर्मसाराच्या शब्दात आम्हेल. ब्राह्मधर्मी लोक संसार हा आनंदमय* होय असे मानतात. त्याचे खण्डन करताना नवयुगधर्मकार स. कृ. फडके लिहितात की, "ब्राह्माच्या लेखात वर्णन केलेल्या प्रेमानंदाचा एक शतांशही अनुभव ज्यास खरोखर प्रत्यक्षात येत असेल ते त्रिवार धन्य होत. ज्या संसारास यादवांच्या रामराज्यात श्रीज्ञानेश्वरांनी 'इंगळाची शेज' म्हटले तीच या

इंग्रजांच्या विसाव्या शतकात पुष्पवृष्ट्या झाली काय ! 'ह्या संसारासारखें दु:ख आणिक नाही' असे स्पष्टपणे म्हणणाऱ्या राजगुरु समर्थांपेक्षाही आम्ही अधिक समर्थ झालो, नव्हे ? 'प्रपंच साधुनि परमार्थाचा जेणें लाहो केला, तो नर भला भला ॥' अशा उक्तींतील संतांचा खरा आशय तेच जाणोत. पण ह्याच संतांनी स्वतः संसाराची आस्था कांहींचीही दाखविली नाही, इतकेंच नव्हे तर संसारात सुख मानणाऱ्यास मूर्खांतला शिरोमणी म्हणण्यासही कमी केलें नाही, ही गोष्ट विसरता येत नाही. अशा जगात एकही धर्म नाही की ज्याने विषयसुखाचा त्याग सांगितला नाही. संसार सुखमय नाही, सुख वाटत असेल तर तो सुखाचा भास आहे. हा अनुभव कांही आजच्या हिंदुस्थानचा नाही. तो सिद्धान्त दिक्कालातीत आहे." (पृ. ६४८) या उताऱ्यावरून दुःख-वादाच्या परंपरेची अखंड साखळी दिसून येते. याचा परिणाम दुःखाचा, अन्यायाचा, जुलुमाचा प्रतिकार करण्यापेक्षा मोक्षाचे साधन म्हणून आपत्तींचा आनंदाने स्वीकार करण्यात होतो.

**ह्या ईश्वराचा न्यायच !**

धर्मसंपांतील या मनोवृत्तीला पोषक अशी दुसरी एक कल्पना म्हणजे ईश्वर करतो ते सर्व आपल्या कल्याणाकरिताच करतो— स्थूल दृष्टीला क्वचित अन्याय दिसला तरी त्यात सर्वत्र ईश्वरी सूत्रच असते, ही होय. एका इंग्रज कवीने हा आशय एका कल्पित कथेने मांडला आहे. ती अशी की, रानावनात राहणाऱ्या एका संन्यासी बोवाना जगाची रहाटी पाहण्याची इच्छा होऊन ते एकदा आपली पर्णकुटी सोडून शहराच्या रस्त्याला लागले. वाटेत त्याना एक वाटाड्या भेटला व ते दोघे बरोबरच गमतीगोष्टी करीत चालले. एवढ्यात मुसळधार पाऊस सुरू झाला, म्हणून रस्त्यालगतच असलेल्या एका भव्य प्रासादात ते शिरले. मालकाने मोठ्या प्रेमाने त्यांचे स्वागत करून त्यांना बडी मेजवानी दिली. पण निरोप घेताना वाटाड्याच्या वाटाड्याने पाणी पिण्याचा चांदीचा पेलाच गिरवाव घातला ! बोवा चपापले, पण बोलले नाहीत. पुढे दुसऱ्या मुक्कामी त्यांचे स्वागत करणारा यजमान अगदी कंजूष भेटला. तेथे त्यांना कष्टामानेंतरच गुजराण करावी लागली. पण तेथून निघून जाण्यापूर्वी या वाटाड्याने पूर्वीचा चांदीचा पेला

तेथ ठेवून दिला! बुवाजी बुचकळ्यात पडले, पण बोलले नाहीत. तिसऱ्या मुक्कामी त्याचे स्वागत चांगले झाले. पण तेथे तर त्याचा मोबदला म्हणून तेथून जाण्यापूर्वी मालकाच्या तान्ह्या अर्भकाची मानच बागड्याने मुरगळली! आता मात्र बुवाजींचा संताप अनावर झाला. पण ते क्रुद्ध नजरेने बागड्याकडे पाहू लागले तो, तो तेजःपुंज देवदूताच्या रूपाने दिसू लागला! देवदूत म्हणाला, "झाला प्रकार पाहून अन्याय, अन्याय म्हणून तुम्ही मनात चरफडला असाल. अदूरदृष्टी लोक असेच ईश्वरी न्यायाच्या नावाने खडे फोडतात. पण तुम्ही पाहिलेल्या सर्व प्रकारात ईश्वरी घटनाच आहे. उधळ्या माणसाच्या घरून मी पेला चोरला व कृपणाच्या घरी ठेवला, यात त्या दोघानाही धडा घालून देण्याचाच माझा उद्देश होता. तिसऱ्या ठिकाणी मी लहान्या अर्भकाची मुंडी मुरगळलेली पाहून तुम्हाला संताप आला. पण त्यातले इंगित असे होते की, ह्या अर्भकाचा बाप एके काळी फार देवधर्मी होता. पण हे मूल झाल्यापासून त्याचे लक्ष देवधर्मावरून फार उडाले होते. मूल मेल्याने त्याचे लक्ष आता पुन्हा देवधर्माकडे वळेल!" या गोष्टीने वर्तीला मनावर ठसवावयाचे आहे ते हे की, प्रत्येक आपत्ती ही जाहीर अपायकारक व अन्यायप्रेरित दिसली तरी ईश्वराच्या न्यायी जगात प्रत्येक गोष्ट ही परिणामी सुखदायी व रमणीयच असते!

विचारण्यासारखेच होय. सृष्टी म्हटली म्हणजे ती अपूर्ण असावयाची व अपूर्णातूनच ती पूर्णाकडे मार्ग आक्रमण करीत असावयाची. जगात दु:ख, अन्याय, आपत्ती भरलेल्या आहेत यात आश्चर्य मानण्यासारखे काहीच नाही. आश्चर्य हे, की हा दु:खपूर्ण जगातही स्निग्ध, प्रेम, आनंद वगैरे सुंदर वस्तु नांदताना आढळून यावयात. जगात जे अपूर्ण म्हणून दिसते ते पूर्णतेचेच एक स्वरूप होय. What appears as imperfect is the manifestation of the perfect मोठा मासा लहान माशाला गिळतो हे पाहिले, म्हणजे आपणाला असे वाटते की सृष्टीत सर्वत्र कलहाचेच साम्राज्य नांदत आहे; पण या कलहप्रिय सृष्टीतच अत्यप्रेम, स्वार्थत्याग वगैरे वावरत असतात ना? प्रत्येक घडीला कोणीतरी प्राणी परलोकची वाट धरीत आहे, म्हणून येवढ्याच गोष्टीचा विचार करू लागलो तर सर्व जग ही एक भयाण स्मशानभूमीच दिसू लागेल, व माणसाचा सर्व उत्साहच गळून पडेल. पण माणूस हा मृत्यूचा विचार न करता आपण जणो अजरामर आहोत अशा भावनेनेच विद्या आणि अर्थ यांचा संचय करीत असतो. आणि हीच त्याची जगाविषयीची खरी भावना होय. मूल प्रथम चालू लागले म्हणजे इतक्या वेळा पडत असते, आपटत असते की ते पाहून त्याच्या असहाय आपत्तीबद्दल कळवळाच येईल. पण मूल धडपडत असता पुन पुन्हा उठून धावण्याचा जो एक विलक्षण उत्साह त्याच्या नसानसातून उसळत असतो त्याकडेच अधिक लक्ष पुरविले पाहिजे. कारण त्याच्या प्रथम प्रयत्नातील स्खलन हे खरे नसून अंतिम विजय हाच खरा होय. खरी स्थिती अशी आहे की जग हे दु:खपूर्ण आहे यावर माणसाचा खरा विश्वासच नसतो. सतारीच्या तुटलेल्या तारा तुळतीत असता जो त्याला वैताग येतो त्यावरून तो सतारीचे मोल ठरवतो, की तारा एकदा जुळल्या म्हणजे त्यातून निघणाऱ्या सुरेल नादब्रह्मावरून? तात्पर्य, जगातील दु:ख हे जगातील भरून उरलेल्या आनंदरूपाखाली अपरिहार्य रीतीने असणारी सावली होय. छाया ही खरी नव्हे व तिच्या दर्शनाने उद्वेग उत्पन्न होण्याचेही कारण नाही. अशा प्रकारची ही कवीवर्यांची विचारसरणी आहे, व तिचे मूळ सूत्र हे की, जगात दु:ख दिसते त वस्तुत दु:ख नसून शुभ्र सुखाच्या पाठीशी असणारी ती कृष्णछाया होय. या दु:खाच्या कृष्णछायेमुळे जगातील अविनाशी सुख उलट खुलूनच दिसावयास हवे!

## वैषम्याचे तात्त्विक समर्थन !

प्रत्येक तत्त्वज्ञानाला जगातील दुःखाचा अथवा वैषम्य नैर्घृण्याचा विचार करावाच लागतो आणि त्याचे काहीतरी निश्चित उत्तर देणे जरूर आहे असे प्रत्येक तत्त्वज्ञान मानते. जगात दुःख दिसते ते सुखाचेच एक अंग होय हे वर दिलेले तत्त्व हे त्याचे एक उत्तर होय. पण सुखाची कृष्ण पार्श्वभूमी म्हणून तरी सर्वज्ञ ईश्वराच्या सृष्टीत दुःख का असावे? सृष्टी ही सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, परमकारुणिक अशा परमेश्वरानेच निर्माण केली तर तीत रोग, दुष्काळ, गुलामगिरी यांना थारा कसा मिळाला व परमकारुणिक परमेश्वराने यांना नंगा नाच घालू कसा दिला? इच्छास्वातंत्र्य मानवास दिले असल्याने त्याने ह्या आपत्ती ओढवून घेऊ नयेत असे म्हणून एका शंकेची समजूत काढावी तो, वाईट कृत्याचा मोह पडण्याची स्थिती तरी का उत्पन्न केली वगैरे शंका मनातून सोडण्यास तयारच. त्याचे समाधान करण्याकरिता निरनिराळ्या उपपत्त्या सुचविण्यात आल्या आहेत. नव प्लेटोमतानी सुचविले की, सृष्टी ही परमेश्वरी आज्ञा पूर्णपणे मानीत नाही म्हणून जगात वैगुण्ये उत्पन्न होतात. पारशी, ज्यू, ख्रिश्चन धर्मांनी कारुणिक परमेश्वराच्या जोडीला क्रूरकर्मा अहरिमन किंवा सैतान मानिला आहे व तो परमेश्वरी घटना नेहमी हाणून पाडीत असतो व त्यामुळे जगात अन्याय, दुःख वगैरे उत्पन्न होतात असे प्रतिपादिले आहे. आपल्याकडील सांख्यांनी सत्त्व, रज, तम असे प्रकृतीचे तीन गुण मानिले असून त्यांपासून वैषम्य निर्माण होते अशी कल्पना केली आहे. पण या सर्व कल्पनांना परमेश्वराच्या सर्वशक्तिमत्त्वाला बाध येत असल्याने मायावाद्यांनी सर्व शंकांचा थोडक्यात निरास करण्याची अशी कल्पना काढली की सर्व जगच मुळी आभासात्मक होय! त्यातील सुखेही आभासात्मक व दुःखेही आभासात्मक! हा आभास, ही माया झाडून टाका की हे जग, त्यातील सुखे, दुःखे ही सर्वच धुक्याप्रमाणे वितळून जातील व मग दुःख, अन्याय दुःसह म्हणून ओरडण्याचे कामच राहणार नाही!

त्यापेक्षा उघड असे प्रतिपादणे काय वाईट की, जगात वैषम्य-नैर्घृण्य, दुःख, अन्याय, आपत्ती आहेत त्या आम्हाला दिसताहेत, जाणवताहेत,

कुरूपता, रोगराई, भूकंप, वगैरे आपत्ती देवाने का निर्माण केल्या हे आम्हास कळत नाही. पण या सर्वांचा प्रतिकार करीत राहण्यासाठी देवाने बुद्धी दिली आहे, तिचा निरलस उत्साही मनाने उपयोग करून या आपत्तींची तीव्रता जितकी कमी करता येईल तितकी करण्याचा कसून प्रयत्न करू या, भौतिक शास्त्राच्या अभ्यासाने रोगराई, दुष्काळ वगैरेंचा परिहार करू या आणि कृत्रिम उच्चनीचपणा व गुलामगिरी यासारखी मानवानेच आपल्या हाताने उठविलेली भुते सघटित प्रतिकाराच्या मनाने गाडून टाकू या. ह्या प्राजल विचारसरणीचा राजमार्ग सोडून तत्त्वज्ञान्यानी कल्पिलेल्या उपपत्तीच्या जगलात शिरले म्हणजे अन्यायप्रतिकाराची वृत्ती भावावून जाते. मग त्या वृत्तील दैवी आपत्तीबरोबर **मानवी आपत्ती ह्याही विश्वरचनेचा एक अवश्य भाग होय असे वाटू लागते व प्रतिकारवृत्तीचे मानवी मनातील बीजच खुडले जाते!**

या सर्व तत्त्वज्ञानाचा परिणाम जगाकडे उदासीन, निरुत्साही दृष्टीने पाहण्यात होतो. सर्व जगच जर पारमार्थिक दृष्ट्या मिथ्या व आभासात्मक तर या आभासात्मक जगातील अन्याय, आपत्तीही आभासात्मकच. मग त्या दूर करण्याविषयी प्रयत्न तो काय करावयाचा?

## हतबल करणारे भूत – दैववाद

आभासात्मक जगातील अन्याय, आपत्ती परमार्थत आभासात्मक असल्या तरी आभास कायम असेपर्यंत तरी त्याचा जुलूम जाचणारच मग आभासात्मक स्थितीत तरी त्याचा प्रतिकार का करू नये अशी शका साहजिकच उद्भवेल. त्या शंकेलाही गप्प बसविणारे जे एक तत्त्व तत्त्वज्ञानाने पुरस्कारिले आहे तेही वैराग्यवाद व जगन्मिथ्यावाद याच्याइतकेच अन्यायपरिमार्जनाची वृत्ती हतबल करणारे आहे. ते तत्त्व म्हणजे दैववाद अथवा कर्मवाद होय. या जन्मीचे सर्व दुःख हे पूर्वजन्मीच्या आपल्याच कृत्याचे फळ व 'भोगनैव सक्षय' या न्यायाने त्याविषयी कुरकुर न करिता ते निमूटपणे भोगूनच सपविले पाहिजे हे कर्मवादाचे मुख्य सूत्र होय. प्रस्तुत जन्म हा पूर्वसचिताचा परिपाक असल्याने प्राणी जन्मास येताच त्याची जीवयात्रा व त्यातील सुखदुःख प्रसंग हे ठरूनच जातात.

बुद्धिबल व शरीरबल प्राप्त होणे न होणे पूर्वकर्माधीन; श्रीमंत आईबापाच्या पोटी जन्म लाभणे पूर्वकर्माधीन, स्वतंत्र देशाच्या मोकळ्या वातावरणात नांदावयास लाभणे किंवा परतंत्र देशाच्या कोंदट हवेत कुजत पडणे दैवाधीन; उच्च कुलात व जातीत जन्मास येणे वा *अस्पृश्य कुलात* जन्म काढणे दैवाधीन. येथून तेथून सर्वच आयुष्यपट जन्मांतरकृत पापपुण्याच्या दोऱ्यांनी *विणलेला* ! इहजन्मीच्या आपत्ती या पूर्वसंचिताचे फळ, त्या टाळण्यात अर्थ नाही, भोगूनच त्यांचा सक्षय केला पाहिजे. या जन्मी पुण्य केले तर पुढील जन्मीच्या आपत्ती टाळता येतील आणि सर्वच आपत्ती एकाच सदरात गणलेल्या. मग *त्या उपजत बुद्धीत कमतरता असण्यासारख्या असोत किंवा हलक्या जातीत* जन्मास येण्यासारख्या असोत !

जातीतील उच्चनीच भाव ही तर केवळ अहंकारी मेंदूतून निघालेली मानीव कल्पना होय. पण तीही पूर्वसंचिताचाच परिणाम ठरून गेली. आयुष्यातील सर्व आपत्ती, मग त्या मनुष्याने निर्माण केलेल्या असोत किंवा मानवी परिहाराच्या आवाक्याच्या बाहेर असोत, सर्वच आपत्ती ह्या पूर्वा-*र्जित पापाच्या शिक्षेच्या स्वरूपाच्या समजल्या म्हणजे मग काही आपत्ती मानवी असल्या तरी त्यांच्या परिहाराचा विचार करण्याचे कारणच उरत नाही. कारण शिक्षा भोगून जितके लवकर सुटता येईल तितके सुटणे एवढेच उरते. प्रत्येक आपत्ती ही अदृष्ट पूर्वार्जित पापाची शिक्षा असे मानले तर विद्यमान आपत्तीत आणखी भर पडत चालली म्हणून तरी काय बिघडले ?* हीच विचारसरणी विधवेला बजाविते की, ' बाई, पुन्हा लग्न करण्याचा वेडगळ विचार मनात देखील आणू नका. तुझा नवरा का मरावा याचा तू विचार केलास का ? तुझा नवरा मेला याचे कारण पतिसहवासाचे एवढेच सुख तुझ्या नशिबी लिहिलेले होते ! उरलेले आयुष्य तू ब्रह्मचर्येने घालवावे अशीच ईश्वरी इच्छा आहे. नाही तर तुझा नवरा मरता का ? तेव्हा ईश्वरी इच्छेचा निषेध करू नका. '

हीच विचारसरणी शूद्र व अंत्यज यांचेकडे वळून म्हणते, ' द्विजांची सेवा करण्यात तुम्ही कमी कशाकरिता मानता ? सेवाधर्म हा परमेश्वरानेच तुमच्या वाट्याला लावून दिला आहे. स्वतः भगवान् कृष्ण सांगतात की, ' परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् '. ऋषिवर्य मनुही असेच बजावितो

ना१ ' एकमेव तु शूद्रस्य प्रभु कर्म समादिशत् । एतेषामेव वर्णानां शुश्रूषामन सूयया ॥ ' तुम्हाला शूद्रयोनीतच परमेश्वराने या जन्मास घातले, तर तुमच्या हातून द्विजांची शुश्रूषा व्हावी म्हणून. यात तुमच्या इच्छेचा प्रश्न नाही. पूर्वसंचिताप्रमाणे तुम्हाला योग्य तो वर्ण प्राप्त झाला आहे. तेव्हा त्या वर्णाला उपदिष्ट असे कर्म करा म्हणजे पुढील जन्मी तुम्हास उच्चतर वर्ण प्राप्त होईल ' वगैरे ! अशा रीतीने **जातिभेदादि मानवी आपत्ती ह्या दैवी घटनेचा एक भाग असून कोणत्या जातीत जन्म यावयाचा हे स्वतःच्या पूर्वसंचितावरून ठरत असल्याने मानवकृत मानवी उच्चनीचपणाचा प्रतिकार करण्याचे मनोबीजच अशा रीतीने दग्ध केले जाते.**

**याची बाधा राष्ट्रालाही**

या दैववादाचे भूत नुसत्या व्यक्तीच्या मानगुटीसच बसून समाधान न पावता, ते सबंध समाजाला किंवा राष्ट्रालाही झपाटू शकते, असेही मानण्यात येते. राजा प्रजेला त्रास देऊ लागला तरी प्रजेचेच दुर्दैव. अतिवृष्टि–अनावृष्टीसारख्या आपत्तींची वोळवण प्रजेचे दुर्दैव म्हणून केली, तर काहीतरी शोभेल. पण उन्मत्त सत्ताधारी प्रजेला छळू लागला तरीही 'प्रजेचेच पूर्वसंचित,' अशी विचारसरणी सुरू होते. अशी दुर्बल विचारसरणी प्रचंड अवलंबिली जात असे, याचे संस्कृत भाषेतील अव्वल दर्जाचा इतिहासकार कल्हण याने स्पष्ट पुरावे दिले आहेत. संस्कृतमध्ये ज्या ग्रंथाला अव्वल दर्जाचा इतिहासग्रंथ म्हणता येईल असा एकच ग्रंथ उपलब्ध आहे. तो कल्हणकृत ' राजतरंगिणी ' नामक काश्मीरचा इतिहास हा होय. काश्मिरातील राजांची दानत चांगली नव्हती. प्रजेवर जुलूम करण्याचीही त्यांना चटक लागलेली होती व सामान्यतः हल्लीच्या संस्थानिकांत दिसून येणाऱ्या अनेक दुर्गुणांनी त्यांच्या चेमनात घर केले होते. इतिहासकार कल्हणाने इतिहासकाराच्या भूमिकेतून त्यांच्या राजांच्या दुर्वर्तनाचे निःपक्षपातीपणे वर्णन केले आहे, व निर्भीडपणे टीकाही केली आहे. पण या अन्यायाचे परिमार्जन कसे करता येईल याची कल्पना करताना कल्हण दैववादावरच आला आहे. एके ठिकाणी तो स्पष्ट म्हणतो की, ' राजाच्या हातीं मरोगर कळसूत्री बाहुल्या

इतकीच सत्ता असते. प्रजेच्या शुभाशुभ नशिबाप्रमाणेच तिला सुष्ट किंवा दुष्ट राजा मिळत असतो. वृक्षाना अनुग्राहक अभ्राकडून अमृतजल किंवा अशनिपात प्राप्त होतो, तो त्याच्या पूर्वसुकृतदुष्कृतानुरूपच.' परकीय क्रूर राजा मिहिरगुल याच्यासंबधी कल्हण लिहितो की, 'या अनन्वित जुलूम करणाऱ्या राजाचा प्रजेने खूनच पाडावयास हवा होता' पण तसे घडले नाही याचे कारण उग्र देवता त्याचे रक्षण करीत असाव्यात हेच धरले पाहिजे एव भद्रोऽपि यद्राजा भूय न हतो जनै । तत्कर्मकारयद्भि तदैवैरेव रक्षित ॥ (१–३२४) ही विचारसरणी कल्हणाची होय ही विचारसरणी ज्या प्रजेच्या मनात रुजली ती प्रजा राजाने कितीही जुलूम केला तरी 'आलें देवाजीच्या मना । तेथ कोणाचें चालेना' असे म्हणत हात बाधून, मान पुढे करून, अन्यायाचे तडाखे निमूटपणे सोशीत उभी राहिली तर नवल कसले ?

## पारतंत्र्याची फिकीर कशाला ?

ह्या दैववादाच्या विचारसरणीची छापड डोळ्यावर अद्यापही कायम आहे. गीतारहस्याचे परीक्षण करणारे गोविंदसुत यानी हिंदुस्थानच्या पारतन्त्र्याला उद्देशून काही वर्षांपूर्वी लिहिले होते की, 'प्रतिकूल दैव आले की सर्व गोष्टी प्रतिकूल होतात. अशा प्रसगी सर्व देशावर सारखा खराप फिरविणारी यांत्रिककला पाश्चात्याच्या हाती का न यावी !' गोविंदसुताच्या मते यांत्रिककला पाश्चात्याच्या हाती गेली, हे केवळ त्याचे दैव ! स्वातन्त्र्यप्राप्तीची इच्छा खोट्या धार्मिक कल्पनानी कशी ठेचली जात असे तेही याच प्रकारच्या उद्गारावरून लक्षात येईल. स्वातन्त्र्य नष्ट झाले, याविषयी तो लिहितो की, 'आपली सपत्ती, ऐश्वर्य, स्वराज्य सर्वस्व गेले. जाऊ द्या ! कुछ फिकीर नहीं ! ही सर्व जड सपत्ती आहे. 'अभय सत्त्वसशुद्धि' वगैरे गीतेत सागितलेल्या सव्वीस लक्षणानी युक्त दैवी सपत्ती आपल्या राष्ट्रात होती, तिची परपरा गेली याबद्दल मात्र राहून राहून हळहळ वाटते आजकाल स्वराज्य, सपत्ती, ऐश्वर्य यांबद्दल लोकाची अहोरात्र धडपड चालली आहे. पण दैवी सपत्ती आणण्याचा कोणीही प्रयत्न करीत नाही ही राष्ट्राला शरमेची गोष्ट आहे. जड ऐश्वर्य, सपत्ती, स्वराज्य यानी प्राप्त होणारे ते रजोत्मक सुख खरे नव्हे. आत्मोन्नती व्हावी म्हणून लोक जिवापलीकडे

उदार होत आहेत ही आनंदाची गोष्ट होय. पण आत्मोन्नती कशात आहे याचा कोणीच शोध करीत नाही. संपत्ती, ऐश्वर्य, स्वराज्यप्राप्ती इत्यादि बाह्य ऐश्वर्यांच्या अभावात अवनतीचे मूळ नाही. त्यामुळे तत्प्राप्त्यर्थ अहोरात्र जी धडपड चालली आहे ती व्यर्थ आहे.'

अशा रीतीने शासक सत्ताधारी वर्गाला आपल्या सत्तेची पकड घट्ट करण्याला काही धर्मकल्पनांकडून अचानक मदत होत असते, आणि धूर्त सत्ताधारी त्याचा उपयोग करून घेतातहि. सुभाषितकार म्हणतो की, 'धार्मिकाला आपला धर्मच तेवढा सत्य वाटतो, तत्त्वज्ञान्याला सर्वच फोल वाटतात, आणि सत्ताधीश मुत्सद्याला सर्वच धर्म उपयुक्त वाटतात!' अर्थात मूठभर लोकांच्या जुल्मी सत्तेपुढे विराट्स्वरूपी जनता शतकानुशतके मान वाकवीत असलेली आढळून यावी हा जो इतिहासातील अद्भुत चमत्कार त्याची मीमांसा अज्ञान पोषण व जुल्माची जाणीव मारून टाकणारी विचारसरणी या प्रकारांत दिसून येते.

* * *

# २. विचारदौर्बल्याचे शेवाळे

विचारस्वातंत्र्य हे प्रगतीपर संस्कृतीचे चैतन्य होय हे चैतन्य जेव्हा मावळू लागते तेव्हा आम्ही मरगळू लागलो आणि सर्वच मागे पडलो चैतन्य कोळपण्याचा हा काल चार-एक हजार वर्षांवर मानला जातो त्याची बीजे तर काही उपनिषदे आणि बौद्ध व जैन वाङ्मय यांतील निवृत्तिवादात रुजलेली अशी अदमासे तीन हजार वर्षांइतकी प्राचीन आहेत अश्वमेध यज्ञाच्या ज्वालांनी निवृत्तिवादाला फुटणारे धुमारे दग्ध करण्यात सहस्र वर्षे लोटली तरी बीज कायम टिकले इस्लामी आक्रमणानंतर तर यज्ञ थंड पडला आणि निवृत्तिवादाची पकड घट्ट होत चालली यामुळे उत्पन्न झालेल्या संस्कृतीच्या स्थिरावस्थेच्या दर्शक म्हणून ज्या चार दोन गोष्टी पुढे सांगण्यात येणार आहेत त्या अमुक एका शतकात एकदम अवतीर्ण झाल्या असे नव्हे पावसाळ्याच्या सुरुवातीला आकाशात काळेकुट्ट मेघ दाटून येऊन वीज चमकू लागल्या म्हणजे पावसाळा सुरू झाला असे आपण म्हणतो पण हे मेघ निर्माण होण्याची तयारी आधी कित्येक महिने चालू असते तोच न्याय येथे लागू करावयाचा तर विचारांच्या स्थिरावस्थेची सुरुवात म्हणून हर्षवर्धनाच्या नंतरचा काल हा एक ठळक प्रारंभस्थान म्हणून मानण्यास हरकत नाही येथून पुढच्या हजार बाराशे वर्षांच्या काळाचे प्रमुख लक्षण म्हणजे **प्रारब्धवादाची पकड व विचारस्वातंत्र्याचा लोप हे होय**

### प्रारब्धवादाची पकड

पैकी पहिल्या प्रारब्धवादाची पकड कल्हणासारख्या इतिहासकारावरही दिसावी हे दुर्दैव कल्हणाने आपला इतिहासग्रंथ समाप्त केल्यानंतर थोड्या काळाच्या आतच काश्मीरचे राज्य मुसलमानांच्या स्वाधीन पडले आणि काश्मीरानंतरील इतर प्रांतांतही तोच प्रकार घडला त्या काळच्या मनोवृत्तीचे एक प्रमुख लक्षण म्हणजे प्रारब्धवादात प्रकट होणारे राष्ट्राचे मनोदौर्बल्य हे होय त्याची योग्य कल्पना कल्हणाच्या

उद्गारावरून चांगली येईल. अनेक राजवंशांचा उदयास्त वर्णन केल्यावर या इतिहासकाराच्या मनावर जो ठसा उमटला तो येवढाच की, जगातील सर्व व्याप व वैभव ही क्षणभंगुर होत. ग्रंथारंभीच तो लिहितो की, "अखिल जीवमात्र हे क्षणभंगुर आहे हे ज्या सज्जनांना कळले असते त्यांना कोणता रस आवडत असेल तर तो शांतरस होय. आणि तोच अनेक ऐतिहासिक उलाढालींनी भरलेल्या माझ्या ग्रंथात प्रधान रस आहे!" (१.२३)

या भूमिकेवरूनच तो इतिहासाकडे पाहत असल्याने जेथे जेथे राजाच्या अनन्वित जुलमी कृत्यांचे वर्णन करण्याचा प्रसंग येई तेथ तेथ प्रजेचे दुर्दैव किंवा ईश्वरी कोप असल्या शब्दांचाच जप करताना तो आढळतो. काश्मीरचे सिंहासन एके काळी मिहिरगुल नावाच्या एका परकीय राजाने बळकाविले होते. हा राजा अत्यंत जुलमी व क्रूरकर्मा म्हणून प्रसिद्ध असल्याचा मागे उल्लेख केलाच आहे. त्याच्याविषयी कल्हण तळतळून लिहितो, "इतक्या अनन्वित छळ करणाऱ्या राजाचा प्रजेने खून पाडावयास हवा होता." मग का पाडला नाही? कल्हण याचे जे उत्तर देतो ते तत्कालीन विचारवंतांच्या मनोवृत्तीवर चांगला प्रकाश पाडणारे आहे. तो लिहितो, "या राजाचा खून पाडला गेला नाही याचे कारण या देशातील उग्रदेवता त्याचे रक्षण करीत असाव्या हेच असले पाहिजे." किती विचित्र कल्पना! सर्व तऱ्हेची घोर पातके करणाऱ्या राजाचे रक्षण म्हणे देवता करीत होत्या! राज्यकारभारात स्वारस्य थोडीही हलवता येत नाही या निराशेने पोळनडलेल्या मनाचे हे निष्फळ उद्गार होत एवढाच याचा अर्थ! राजकर्त्यांनी आपल्या बांधवांना कत्लाम घातले तरी ते देशातील उग्रदेवता सौम्यपणाने पाहत. उलट प्रजेने हात उगारला की मग मात्र राष्ट्रातील सर्व देवतांचे उग्र तेज प्रकट होऊन इहलोकीची महद्देवता जी राजा तिचे रक्षण करण्याकरिता तिच्याभोवती एक अभेद्य वलय निर्माण करीत! कारण राजा म्हणजे साक्षात ईश्वराची विभूती. त्याला प्राप्त झालेले ऐश्वर्यपद हे पूर्वीच्या अनंत जन्मांच्या सुकृताचे फळ. तेव्हा त्याने कितीही जुलूम केला तरी ते ईश्वरी सूत्र, ती विधिघटना, तो धर्मनिर्णय असे म्हणून तो निमूटपणे सोसावा हीच विचारसरणी सर्वत्र पसरलेली. या प्रकारात फरक पाडावयाचा असल्यास तो फरक विधिपूर्वक प्राणप्रतिष्ठित केलेली, जागती मानलेली, दगडाधोंड्यांची दैवते घडवून

आणतील तेव्हा. आपण हाडामासाची चालतीबोलती माणसे हे परिवर्तन घडवून आणू ही धमकच नष्ट झाली होती.

दोन–तीन हजार वर्षांच्या दीर्घ कालखंडातील अनेक राजाच्या उत्कर्षापकर्षाचे वर्णन करणाऱ्या या इतिहासकाराच्या मनावर ऐहिक वैभवाच्या क्षणभंगुरत्वाचा ठसा उमटला तर नवल नाही! पण अनेक राजाच्या अन्यायी टोळाचे अनेकवार चिडून वैतागून वर्णन करण्याचा प्रसंग आला असताही अन्यायी राजसत्ता नष्ट कशी करता येईल याविषयीची कल्पना मात्र त्याला सुचलेली दिसत नाही. वेळी अवेळी तो फक्त विधिवत्नेचेच तुणतुणे वाजविताना आढळून येतो. राजकारणाकडे कठोर विवेकवादाच्या दृष्टीने पाहण्याची धमक ओसरलेली दिसते. नजरे आणि कुंडल्या सतत पाहत बसणाऱ्यांना इसवीसनपूर्व चौथ्या शतकातील चाणक्याने मूर्खांत काढले होते, तर अकराव्या–बाराव्या शतकात कल्हणासारखा चौकस इतिहासकारही नक्षत्राचे आणि कुंडल्यांचे महत्त्व गाऊ लागला होता. एके ठिकाणी तर तो स्पष्ट लिहितो की, "प्रजेच्या प्रारब्धानुसारच तिला सुष्ट किंवा दुष्ट राजा मिळत असतो. काही वृक्षांना मेघाकडून अमृतजल मिळते आणि काहींना त्याच मेघापासून विद्युत्प्रपात मिळतो हे त्याच्या पूर्वसुकृताचे फळ होय! (७।३४१)-

### पुराणप्रियता

या कालात शास्त्र, कला, वाङ्मय, धर्म, तत्त्वज्ञान या सर्व प्रांतात बुद्धिमान पुरुष चमकले नाहीत असे नव्हे. पण कोणत्याही बौद्धिक प्रांतात मूलगामी नवे स्वतंत्र विचार मांडले गेले नाहीत. या कालानंतर स्मृती होण्याचे बंद पडले. आठव्या शतकानंतर देवलस्मृतीचा कर्ता हा शेवटला स्मृतिकार होऊन गेला त्यानंतरचे सर्व धर्मशास्त्रकार हे निबंधकार होत. त्यांनी नवीन स्मृती न रचिता जुन्या स्मृती या अनुल्लंघनीय मानल्या. आणि त्यांनही एकमेकांशी विरुद्ध असणाऱ्या सर्वच स्मृती प्रमाण मानून त्या सर्वांचा समन्वय करण्याचे काम आपल्या शिरावर घेतले. हिंदुस्थानसारख्या खंडतुल्य देशातील अनेकविध समाजांना सांस्कृतिक दृष्ट्या एकसूत्रात गोवावयाचे तर निरनिराळ्या काळी आणि निरनिराळ्या स्थळी प्रचलित असलेल्या आचारविचारांचा समन्वय करणे इष्ट होते हे नाकबूल

करता येणार नाही. पण हा समन्वय करताना जुन्या काळच्या सर्व स्मृती ह्या नव्या काळावर बंधनभूत आहेत हे जे मूलभूत गृहीतकृत्य म्हणून स्वीकारले गेले, ते प्रारंभी समन्वयाच्या दृष्टीने सोइस्कर असले तरी अंती विचार-स्वातंत्र्याला मारक ठरले. जुन्याबद्दल अभिमान कितीही प्रखर असला तरी काल काही कोणाकरिता थांबत नाही. नव्या गरजा उत्पन्न होत असतात, नव्या अडचणी टोचत असतात. नवे अनुभव येत असतात. त्यांना अनुसरून आचार-विचारांची नवी मांडणी करणे जरूर पडते. तशी मांडणी या काळातही थोडी-बहुत करण्यात आलीच. आणि त्याचे एक ठळक उदाहरण म्हणजे कलिवर्ज्याची यादी हे होय. पण हे फेरफार करीत असताना त्यांनी जी भूमिका स्वीकारली ती मात्र अशी की, काल बाईट येत चालला, पूर्वीच्या लोकांचे तेज आपणात राहिले नाही, त्यांना अनेक गोष्टी पचत, त्या आपणास आता पचणार नाहीत. तेव्हा युगऱ्हासानुरूप आपल्याला आचारविचार बदलले पाहिजेत.

ही भूमिका स्वीकारण्यात पूर्वीच्याचा मान राखला जातो व आपणाकडे कमीपणा घेतल्यामुळे विनयही शोभून दिसतो. पण हा विनय प्रमाणाबाहेर गेल्यास विचारस्वातंत्र्य काळवंडते व मन खुरटे होते, ते कसे हे स्वप्रत्ययसिद्ध असे जे ज्योतिषशास्त्र त्यातही प्रामाण्याचे बंड माजले यावरून लक्षात येईल. दीक्षितांच्या ' भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास ' या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीस जोडलेल्या प्रवेशनात चिंतामणराव वैद्य उद्गारतात की, " अनेक ज्योतिषाचार्यांनी ' प्रत्यक्ष ज्योतिष शास्त्र ' हा सिद्धान्त मानून आपल्या नावाने ग्रंथ लिहिले. पण आपल्या दुर्दैवाने सूर्यसिद्धान्तकाराने मात्र आपली माहिती साक्षात सूर्यापासून मिळाली अशी छाप आपल्या ग्रंथात दिली आणि तेव्हा-पासून ज्योतिषात शब्दप्रामाण्याचे बंड सुरू झाले आणि शास्त्राची वाढ खुंटली. " या शब्दानीच अधःपतनविषयी खेद दर्शवीत लिहितात, ' वेदांग ज्योतिष शास्त्र वैदिकांच्या पाठात आहे त्याविषयी एक मोठा चमत्कार आहे. तो असा की, ग्रंथाकडे लक्ष दिले तर वैदिकांच्या पाठातल्या पुष्कळ श्लोकांत काही काही अशुद्ध आहेत आणि असे असून सर्व ब्राह्मणांच्या मुखी सर्व देशभर एक पाठ ! आणि या पाठाची वाचना शास्त्रात वेदाप्रमाणे मानण्यात येते ! ( पृ. ७१ ) नवे ग्रंथ प्राचीन थोर महनीय कर्त्यांच्या या देवांच्या नावावर प्रसृत करण्याची रूढी ही जुन्याचा मान राखणारी असली

तरी विचारस्वातंत्र्यास विघातक होय.

## आत्मसंतुष्टता व वास्तवविमुखता

*या काळात परमुलुखातील मुशाफरी खुंटल्याने विद्येच्या बाबतीत बाहेरून काही घेण्यासारखे आहे ही कल्पनाहि उरली नाही.* अनेक शतके शास्त्र, विद्या, कला वगैरेंच्या क्षेत्रात अखिल जगाच्या आघाडीवर मिरविल्यामुळे आमच्या पंडितांची दृष्टी स्वतःच्या ज्ञानानेच दिपून गेली आणि ते आपल्याच मानीव जगात निरवू लागले. भोवतालच्या सत्यसृष्टीशी ते पारखे होऊ लागले. उलट राजकीय क्षेत्रात ज्यांच्याशी झुंजावयाचे होते ते मुसलमान पंडित ग्रीक आणि संस्कृत विद्या अत्यंत कसोशीने आत्मसात करीत होते. आपले पंडित प्रायः राजाश्रयावर गब्बर होत आणि आपल्या आश्रयदात्याच्या औदार्याचे व आपल्या विद्वत्तेच्या वैभवाचे अनिरिक्त वर्णन करण्यातच गढून गेलेले असत. मासला म्हणून याज्ञवल्क्य स्मृतीवरील आपल्या मिताक्षरा नावाच्या टीकेच्या शेवटी ११ व्या शतकातील विज्ञानेश्वराने स्वतःविषयी व आपल्या आश्रयदात्याविषयी जे उद्‌गार काढले ते पाहा : *आमच्या कल्याणनगरासारखे* ( दक्षिण हैदराबादेजवळील ) नगर अखिल अवनीतलावर आज दुसरे कोठेही नाही, पूर्वी झाले नाही, पुढे होणार नाही. आणि या नगरीतील श्रीविक्रमासारखा पृथ्वीपति दुसरा पाहावयास सापडणार नाही की ऐकावयास मिळणार नाही. आणि या त्याच्या पदरी असलेला पंडित जो विज्ञानेश्वर त्याला तर दुसऱ्या कोणाची उपमाच नाही. *कल्पवृक्षाच्या तोलाची ही त्रिपुटी कल्पान्तापर्यंत नांदो !*

*महंमद गझनीच्यावरोबर हिंदुस्थानात आलेला हुषार आणि चौरस* बुद्धीचा मुस्लिम पंडित अल्बेरुणी याने आमच्या मखलीत उत्पन्न झालेला हा दोष अचूक हेरला होता. आपल्या ग्रंथाच्या आरंभीच हिंदुस्थानातील लोकांच्याकडून रूर ती माहिती मिळविण्याच्या मार्गातील अडचणींचे वर्णन त्याने केले आहे. त्यात हिंदू पंडितांच्या प्रतिनिविष्टतेविषयी तो लिहितो, " हिंदू लोकांना असे वाटते की, जगात आपल्या देशासारखा देश नाही, आपल्या राष्ट्रासारखे राष्ट्र नाही, आमच्या राजासारखे राजे नाहीत, धर्मासारखा धर्म नाही आणि शास्त्रासारखे शास्त्र नाही ! अहंकार, प्रतिनिविष्ट,

वृत्तीचा तात्पर्यपणा हे सर्वत्र या हिंदूच्यात रोमरोमी भरलेले आहेत. त्याना असे वाटते की, जगात जर कोठे शास्त्र, विद्या, कला असतील तर फक्त आपल्या देशात. तुम्ही जर खुरासानमधील किंवा पर्शियामधील विद्वानाच्या विषयी त्यांच्याशी बोलणे काढलेत, तर ते तुम्हाला तत्काल मूर्खात काढतील. ते जर यांनीसे का हाईना बाहेरच्या देशात फेरफटका करून येतील तर आपली चुकी त्यांच्या तात्काळ लक्षात येईल, पण ते देशाबाहेर पाऊल टाकून इतराच्यात मिसळतील तेव्हा ना! त्यांचे पूर्वज काही आपल्या खुरट्या वर्तनाचे नव्हते. त्यांचा एक प्राचीन विद्वान ज्योतिषी वराहमिहिर याने लिहिले आहे की, "ग्रीक लोक हे पवित्र नसले तरी त्यांनी शास्त्रात इतरांच्यापेक्षा वरचढ केली असल्याने त्यांच्याविषयी पूज्यभाव बाळगला पाहिजे."

परकाय प्रवासाने केलेले हे रोगनिदान अगदीच अयथार्थ नव्हते. पूर्वी-सारखा निर्बंधसंचार चालू राहिला असता, दिग्विजयी या नात्याने, धर्मोपदेशक या नात्याने, सौदागर या नात्याने पूर्वीसारख्या त्रिखंडातील मुसाफरी सुरू असत्या, तर परदेशात चाललेल्या नव्या प्रयोगाची दखलगिरी राहिली असती. पण धाडसी मुसाफरीला प्रोत्साहन देणारा धार्मिक, सामाजिक व आर्थिक व्यवहारातील लवचिकपणा नष्ट झाल्यामुळे असो वा खंडप्राय भारत देशच पुरून उरण्यासारखा असल्याने असो, ही मुसाफरी दहाव्या शतकानंतर बंद पडली. यामुळे युरोपमध्ये पंधरा या सोळाव्या शतकापासून पुढे विद्येच्या अनेक क्षेत्रात जी विलक्षण जागृती झाली त्याच्याविषयी नुसती पुसट कल्पनाही आमच्याकडील पंडितांना आली नाही. आपल्याच तेजाने दिपून गेलेले आमचे पंडित फक्त त्या त्या विषयावरील पूर्वाचार्यांनी लिहिलेल्या ग्रंथावर टीका, उपटीका, उपोपटीका लिहून पूर्वाचार्यांच्या शब्दांचा कीस काढण्यात धन्यता मानू लागले. युरोपमध्ये मध्ययुगीन कालात हाच प्रकार झाला होता. या काळातले पाश्चात्य पंडित प्राचीन ग्रीक वाङ्मयगुरू होमरचे काव्य कसे भिंतीत बसले होते याचे टीकाशास्त्राचा इतिहासकार वर्णन करतो की, होमरच्या काव्यांची भाष्ये म्हणून विद्वानुपिद्यांचा कुट्टन कुट्टन वक्रगाळ केलेल्या घनगर्तांचा गाळीव अर्क होय. असाच प्रकार आमच्याकडेही झाला शंकरा-चार्यासारख्या अव्वल दर्जाच्या तत्त्वज्ञान्यांनीही स्वतंत्र ग्रंथ न लिहिता प्रस्थान त्रयीवर भाष्य लिहून त्यांची एकवाक्यता करून आपले तत्त्वज्ञान त्यांच्या

नुगानून वदविले. ही परंपरा आठव्या शतकातल्या शंकराचार्यांपासून जी सुरू झाली ती विसाव्या शतकातल्या गीतारहस्यकार टिळकाचार्यांपर्यंत अखंड राहिली. हजार वर्षे चालत आलेली आपली ही परंपरा ओळखूनच टिळकांनाही आपले कर्मयोगाचे तत्त्वज्ञान स्वतंत्र ग्रंथरूपाने न मांडता गीतेवरील भाष्याच्या रूपाने मांडणे अवश्य वाटले. पण आता ही वृत्ती सोडून कालानुरूप नवे आदर्श स्वतंत्र मांडले पाहिजेत.

## विचारस्वातंत्र्याचा लोप

विचारस्वातंत्र्य कसे लोपू लागले होते याची अनेक शास्त्रांतील उदाहरणे देता येतील. पैकी दृक्प्रत्ययनिष्ठ जे ज्योतिषशास्त्र त्यातील विशेष रोचक होत. त्यातील संपातचलन व ग्रहण हे दोन विषय पाहू. आधुनिक खगोल विज्ञानवेत्त्यांच्या मताने संपाताचे विलोम-गतीने संपूर्ण भ्रमण होते असे मानले जाते. आपल्या ज्योतिषाचार्यांनीही हे संपूर्ण भ्रमण मानणारा मुञ्जाल नावाचा आचार्य दहाव्या शतकात होऊन गेला. पण मुंजालाचे मत खरे मानले तर श्रुतीतील अमक्या मासात अमुक ऋतु येतो या वचनाला विरोध येतो म्हणून भास्कराचार्यांचा सतराव्या शतकातील टीकाकार मरीचिकार मुनीश्वर याने मुंजालास दोष दिला व संपाताचे आंदोलन मानणेच योग्य असे ठरविले. त्यावर विद्वद्वर्य शं. बा. दीक्षित आपल्या भारतीय ज्योतिःशास्त्र या ग्रंथात लिहितात, 'मरीचिकारांनी मुंजालास दोष दिला तो त्यांच्या दृष्टीने ठीक आहे. पण संपाताची प्रदक्षिणा पूर्ण होणे न होणे हे आपल्या हाती नाही हे मरीचिकारांच्या ध्यानात आलेले नाही!' (पृ ३३७) स्मृतिपुराणादि ग्रंथांतून वर्णिलेली युगगणनेची पद्धतीही ज्योतिषशास्त्रास संमत नाही. पण ती स्मृतिप्रमाण असताही रोमकसिद्धान्त नावाच्या ग्रंथाच्या कर्त्याने स्वीकारली नाही म्हणून ब्रह्मगुप्ताने त्यावर टीका

पूर्वेकडून पश्चिमेकडे जाताना रोज दिसतात तो आपला भ्रम नसून ते त्याचे वास्तविक भ्रमणच होय आर्यभट्ट हा एकच एक ज्योतिषी मात्र असा होऊन गेला, की ज्याने हे सामान्य मत चुकीचे ठरविले सूर्यचंद्रादिकांचे भ्रमण हे वास्तविक नसून पृथ्वी आपल्या आसाभोवती फिरते व त्यामुळे उत्पन्न झालेला हा दृक्‌भ्रम होय असे त्याने निःसंदिग्धपणे प्रतिपादन केले आहे. पण नंतरच्या ग्रंथकारांनी त्याला जवळ जवळ मुळात काढले येथे 'मुळांत काढले' हे शब्द मी अतिशयोक्तीने लिहीत नाही कारण सातव्या शतकातील ब्रह्मगुप्त याने आर्यभट्टाविषयी असे टाकून लिहिले आहे की, या आर्यभट्टाने इतक्या चुका केलेल्या आहेत की, त्याची गणती करणे अशक्य आहे तो विचारतो, पृथ्वी जर खरोखर फिरती असती तर तिच्यावरचे डोंगर-पर्वत ढासळले नाहीत कसे? दुसरा एक लल्ल नावाचा ग्रंथकार शंका प्रदर्शित करतो की, पृथ्वी जर फिरत असती तर सूर्योदयी घरट्याबाहेर पडलेल्या पक्ष्यांना सायंकाळी आपली घरटी कशी सापडली असती? (दीक्षित—पृष्ठ १९७, १९७, २२८)

यावरून शास्त्रशुद्ध विचारसरणी कशी घरंगळीस लागली होती हे दिसून येईल. सानटिझाने मृत्यू स्वीकारला, पण मते सोडली नाहीत यामुळे त्याचे नाव ग्रीसच्या इतिहासात अजरामर होऊन राहिलेले आहे गॅलिलिओने धर्मच्छळापुढे नमते घेतले तरी त्याच्या पश्चात धर्ममतांना धूप न घालता शास्त्रीय सत्याची निष्ठेने जोपासना करणारी परंपरा युरोपमध्ये निर्माण झाली. तशी परंपरा आपल्याकडे मात्र दुर्दैवाने निर्माण झाली नाही. उत्तरोत्तर विवेकवादी तर्कनिष्ठ विचारप्रवाह आटत जाऊन अंधश्रद्धेचे वैराण वाळवंट सगळीकडे पसरू लागले व गूढविद्येचे वड मात्र राहिले. साक्षी पुराव्याचे सत्यासत्य ठरविण्याच्या बाबतीत दिव्य करण्याची पद्धती मान्यता पावली मनुस्मृतीपेक्षा याज्ञवल्क्याच्या स्मृतीत दिव्य करण्याच्या पद्धतीचा विस्तार झालेला आढळतो सातव्या शतकानंतरच्या काळात लिहिलेल्या भवभूतीचे मालतीमाधव, राजशेखराचे बालरामायण व कर्पूरमंजरी यांच्यामध्ये मांत्रिकाचे प्रस्थ आहे. सन ११२३ च्या सुमारास गांगयदेव नामक राजाने मुक्ती मिळविण्याकरिता आपल्या शंभर स्त्रियांसह गंगेमध्ये उडी घेतली असे

त्याच्या भुलनेच एका ताम्रलेखात लिहून ठेविले आहे ! ‡ शत्रूवर जय मिळविण्याच्या बाबतीतही पुराणग्रंथातून जारणमारणाचे मंत्र सविस्तर देण्यात येऊ लागले. दहाव्या–अकराव्या शतकातील ‘ अग्निपुराण ’ हा एक शन फोडाच आहे. त्यात ‘ सर्वदा जपहोमाद्यैः पाठान्यैश्च रणे जय ’ रणांगणावर जय मिळला तोही जप, होम, मंत्रपठण यांनीच असा सिद्धान्त मांडून ॐ मारय ॐ छिंद असले शत्रूला मारण्याचे मंत्र दिलेले आहेत ( अ १३० ). राजेलोक असल्या गोष्टींवर विश्वसून सैन्य उभविण्याच्या कर्तव्याकडे सर्वथा दुर्लक्ष करीत असे येथ सांगावयाचे नाही. पण विवेकवादापेक्षा गूढवादाची छाया दाट पसरत चालली होती एवढेच दिग्दर्शित करावयाचे आहे.

आर्य चाणक्याच्या काळी असले प्रकार सामान्य जनतेत रूढ होते. देवतेची मोठी पोकळ मूर्ती करून तिच्या आत लपून नागून देवता बोलते आहे असे भासविणे, वारुळात आधीच सोने पुरून ठेवून वारुळातील नागाच्या आराधनेने प्राप्त झाले आहे असे दाखविणे, अंगाला लसलसणारी रसायने चोपडून नदीत वा सरोवरात उभे राहून वरुण राजा आहोत असे भासविणे, असले प्रकार चाणक्याने वर्णन केले आहेत. पण ते कशाकरिता ? तर धूर्त राजाने या सर्व साधनांचा उपयोग मूढ व अज्ञ जनतेला फसविण्याकरिता करावा म्हणून ! फलज्योतिष, मुहूर्तविद्या वगैरेवरही त्याचा विश्वास नव्हता. तो सांगतो की धूर्त राजानी स्वतःचा बडेजाव वाढविण्याकरिता व लोकांना भूल पाडण्याकरिता या विद्यांचा अवश्य उपयोग करावा, पण स्वतः मात्र यांच्या नादी लागू नये कारण नक्षत्रांच्या नादी लागणाऱ्यापासून ऐश्वर्य दूर जाते असे त्याने स्पष्ट प्रतिपादन केले आहे. पण पुढे पुढे हे विवेकवादी धोरण मागे पडून अंधश्रद्धा जोरावत चालली महमद बिन कासीमची लढण्यास दाहीर बाहेर पडला तो उत्तम मुहूर्त निवडून पडला आणि शत्रूला बुधग्रह अनुकूल होता त्याच्या परिहारार्थ बुधाची सुवर्णमूर्ती आपल्या पाठीशी बांधून घेतली पण होऊन काय झाले ? तर दाहीर मारला गेला ! † गुप्तांच्या काळी पुराणांना आधुनिक संस्करण प्राप्त झाले असे मानण्यात येत. या

‡ Epigraphia Indica, II p 4

† Elliot, I p 169

पुराणामध्ये चाणक्याने मोळमण्यणाच्या म्हणून झिडकारलेल्या सर्व मोळघट समजुतांचा जणू काही उत्साहाने पुरस्कार करण्यात आला! या पुराणकारानी वंशानुचरितवर्णनाच्या अनुषगाने जुन्या इतिहासाचे थोडेबहुत रक्षण केले हे खरे, तसेच अग्निपुराणासारख्या काही पुराणानी नानाविद्याचा सग्रह केला हेही खोटे नाही पण हा भाग सोडून दिला तर बाकीचा भाग निरनिराळ्या क्षेत्राच्या वर्णनानी आणि उपास्यदेवतेसबधीच्या महा अतिरजित कथानी भरलेला आहे. यामुळे धार्मिक भावनेला अवास्तव महत्त्व प्राप्त होऊन शास्त्र, विद्या, कला याच्या जोपासनेला तात्त्विक दृष्ट्या मूल्य कमी देण्यात येऊ लागले

## सामाजिक तत्त्वज्ञानाची विकृती

या कालात समाजधारणात्मक तत्त्वज्ञान विकृत होऊ लागले. जातिभेदाची बधने अधिक कडक झाली निरनिराळ्या जातीत पूर्वी अन्नोदकव्यवहार होत असे तो मद पडून खोवळ्या ओवळ्याचे बड मर्यादेबाहेर वाढले. वैदिक काळात व्रात्य लोकाना आर्य लोकाच्या सघात समाविष्ट करून घेण्याकरिता व्रात्यस्तोम नावाचा स्वतत्र विधी असे याचा उल्लेख मागे आलाच आहे. मनुस्मृतीच्या काळी म्हणजे खिस्ती शकाच्या प्रारभी ही स्थिती पार पालटून गेली व्रात्य याचा अर्थ व्रतकर्म न करणारे असा झाला व त्याच्याकरिता यज्ञाचे पुरोहितत्व स्वीकारल्यास प्रायश्चित्त घ्यावे लागू लागले "व्रात्याना याजन कृत्वा त्रिभि कृच्छैर्व्यपोहति।" याजन या पदाचे स्पष्टीकरणही मेधातिथी व कुल्लूक या टीकाकारानी व्रात्यस्तोमादि याजन असे केले आहे. धर्मसूत्रकाराच्या काळी अन्नोदकव्यवहारावर कडक बधन नसे आपस्तब धर्मसूत्रकार लिहितो की, शूद्राच्या घरचे अन्न सेवन करू नये असे कोणी म्हणतात, पण तो जर धार्मिक वृत्तीचा असेल तर त्याच्या हातचे अन्न घेण्यास हरकत नाही (१६१८) हे धोरण लुप्त होऊन त्यांत दुसरे टोक गाठले ते तीन भय्ये आणि चार चौके याचे! नवव्या दहाव्या शतकापर्यंत मिश्रविवाह बद पडले नव्हते सातव्या शतकातील बाद बरीकर बाणभट्ट यानं आपल्या एका शूद्र सावत्र मातेपासून झालेल्या चद्रसेन नावाच्या पारशव बधूचा उल्लेख केला आहे दहाव्या शतकातील सुप्रसिद्ध कवी व काव्यमीमांसक राजशेखर हा स्वत ब्राह्मण असून त्याची पत्नी

पाहणारे भूत केलीच थडग्यात गाडले गेले असते. आमच्या मुसलमानांपैकी बहुसंख्य लोक हे पूर्वीचे हिंदू होत. काहींनी पूर्वीची चालरीतही राखली. मुंबई इलाख्यातील खोजा आणि कच्छी मेमन यांच्यात हिंदुधर्मशास्त्रातील वारसा-पद्धती १९२० पर्यंत रूढ होती. हे दोन्ही समाज पूर्वीचे हिंदू. ‡ अशा लक्षावधींना शुद्ध करून हिंदुधर्मात घेणे हे राष्ट्रीय कर्तव्य होते. पण भ्याड अंधश्रद्धेने हिंदुसमाज झपाटला गेला असल्याने तो स्वतःचे गाल चोळीत नुसता पाहत बसला! समुद्रयान करणे हे पाप मानण्यात येऊ लागले मलबार किनाऱ्यावरील राजांना पूर्वापार चालत आलेला समुद्रावरील व्यापार हाती ठेवावयाचा होता, पण समुद्रयान करणे हे तर शास्त्राने निषिद्ध ठरविले. तेव्हा त्यांनी अशी किंचित तोड काढली की, प्रत्येक हिंदू कुटुंबातील एकेका व्यक्तीने इस्लाम धर्म स्वीकारावा आणी दर्यावर्दीपणा चालवावा! * असल्या तर्कदुष्ट विचारसरणीने आपण आपल्या शत्रूचे संख्याबळ वाढवीत आहोत याची या राजे लोकांना कल्पनाही नसावी इतका स्वतंत्र विचारशक्तीचा अधःपात झालेला होता.

## व्यावहारिक शास्त्राची हेळसांड

जातिभेदाची बंधने दृढ होत गेल्याने निरनिराळ्या हरहुन्नरीच्या विद्याकडे श्रेष्ठ वर्णाचे लोक दुर्लक्ष करू लागले. वैद्यकीसारखा अत्यंत समाजोपकारक असा धंदा तर प्राचीन काळापासूनच निकृष्ट मानण्यात येत होता. भैषज्याविषयी अनादर हा तैत्तिरीय संहितेइतका प्राचीन आहे. ब्राह्मणेन भेषज्यं न कार्यम् ( तै. सं. ६–४–९–३ ) असा तैत्तिरीय संहितेत उल्लेख आहे. 'चिकित्सतात् पुण्यतमं न किंचिदपि सुश्रुम' असे ज्या धंद्याविषयी सुश्रुतात यथार्थ स्तुती आहे त्या धंदेवाइकाविषयी औशनस स्मृतीने 'नृपाया विप्रत चौर्यात् संजातो यो भिषक् स्मृत'। ब्राह्मणाने चोरून क्षत्रिय स्त्रीशी संबंध ठेवला असता तिच्या पोटी झालेला पुत्र हा भिषक अथवा वैद्य होय! असले मुद्दाम विधान केले आहे. ज्ञानेश्वरीनेही वैद्यकाला

‡ History of Dharmashastra by P. V. Kane, Vol II, P 339
* सावरकरसाहित्य, भाग २, पान ९४.

हीन लेखले आहे, आणि ' आयुर्वेद हि आघवा। याच मोहरा पांडवा। जो जिवाकरण मरावा। जीवरातु॥' (१३.२२४). असले सर्व प्रकार युरोपात झाले तरी ते लोक त्यांतून बाहेर पडले. पण आम्ही मात्र गुरफटूनच राहिलो आणि शास्त्रकलादिकात मागासत चाललो. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर बुद्धीवरील ही कोळिष्टके आता झाडून टाकली पाहिजेत.

युरोपमध्येही अंधश्रद्धेचे तमोयुग दाट माजले होते. पण पंधराव्या सोळाव्या शतकानंतर त्यांच्या बुद्धीला लागलेले ग्रहण सुटले आणि आपल्याकडे दिवसेंदिवस खग्रास होत चालले असा एकंदरीत प्रकार झाला. कृष्णमिश्रानंतर दोन शतकांनी शनैश्वराच्या काळी आमच्याकडे व्यवहारनिपुण हेमाद्री व्रतवैकल्यांच्या याद्या तयार करीत होता, तर त्याच काळी पाश्चात्यात उपाध्यायवृत्तीचा रॉजर बेकन हा शास्त्रीय प्रयोगाचे महत्त्व लोकांना पटवीत होता. आणि शास्त्रीय ज्ञानाच्या जोरावर माणसाला हवेतून उडताही येईल असे भविष्य वर्तवीत होता. राधामाधवचंपूच्या प्रस्तावनेत राजवाडे लिहितात की, "शहाजींच्या हयातीत युरोपात डेन्मार्क बेकन इत्यादि विचारवंत सृष्टपदार्थ-संशोधनकार्याचे वाली जारीने पंचभूतांचा शोध लावण्यास लोकाना प्रोत्साहन देत होते आणि आपल्याकडे एकनाथ, तुकाराम, दासोपंत, निपटनिरंजन इत्यादि संत पंचमहाभूतांना मारून ब्रह्मसाक्षात्कारात राष्ट्राला नेऊन मुक्त करण्याच्या खटपटीत होते. अशांना स्क्रू, टाचणी, बंदूक व तोफ यांचा विचार वमनप्राय वाटल्यास त्यात नवल नसले?" (पृ. १०७).

पाश्चात्यांचे आजचे श्रेष्ठत्व हे त्यांच्या भौतिक शास्त्रातील प्रगतीत व लोकशाही संघटनेत आहे. **ज्याचे शास्त्र त्याचे शस्त्र आणि ज्याचे शस्त्र त्याचे शासन अशी ही शास्त्रशस्त्रशासन त्रिपुटी अपरिहार्य आहे.** शिवाय शास्त्राने नुसत्या शस्त्रालाच तीक्ष्णता येते असे नव्हे तर ते शस्त्र वापरणाऱ्या बुद्धीलाही येते. शास्त्राच्या उपासनेने बुद्धीला शिस्त लागते, वृत्तीला निर्भयपणा येतो, अंतःकरणात आत्मविश्वास वाणू लागतो. यांचा साकल्याने परिणाम म्हणजे शास्त्रवेत्त्यांची संस्कृती उन्नतीच्या मार्गाला लागते. लोकशाही पद्धतीने ऐक्याची भावना सर्व राष्ट्रांत पसरून दृढमूल होते. मुसलमानांच्या पुढे हिंदूंना नामोहरम व्हावे लागले तरी मुसलमानांची संस्कृती हिंदूंच्यापेक्षा फारशी श्रेष्ठ नव्हती. नव्या विद्या हस्तगत करण्याचा

उत्साह त्यांच्यात होता; पण शास्त्र, विद्या, कला, धर्म यापैकी कोणत्याच बाबतीत त्यांच्याजवळून शिकण्यासारखे काहीच नव्हते. यामुळे शिवाजीने त्यांच्याच तोडीची शिस्त व संघटना निर्माण करिताच तो औरंगजेबाच्या प्रबल सेनेलाही पुरून उरला. पण मोगल आणि मराठे या दोघांचे सामने खेळले जात असता पाश्चात्त्य राष्ट्रांत एक नवीन अपूर्व अशी शक्ती निर्माण होत होती. त्या शक्तीपुढे एकाएकीच मोगल व मराठे दोघेही निष्प्रभ ठरले.

### पाश्चात्यांचे बलस्थान

पाश्चात्यांचे बळ त्यांच्या श्रेष्ठ शस्त्रांत व शिस्तीत आहे हे हिंदूंनी ओळखिले होते. पण त्यांची श्रेष्ठ शस्त्रे आणि श्रेष्ठतर शिस्त या दोन्हींच्याही पाठीशी असणारे त्यांचे खरे बळ ओळखिले गेले नव्हते. हे त्यांचे श्रेष्ठतम बळ त्यांच्या शास्त्रीय प्रगतीत होते. दिल्लीदरबारचे रुपेरी छत फोडण्याचा भीमपराक्रम करणारे सदाशिवरावभाऊ आमच्यात होते, पण यःकश्चित घड्याळ करणारा जिनगर आमच्यात नव्हता. इंग्रज हे शत्रूचे सैन्य दहापाच मैलांवर असता आपल्या दुर्बिणीतून न्याहाळीत होते, तर आम्ही नक्षत्रांकडे पाहून ज्योतिष्यांना मुहूर्त विचारीत होतो. स्टीफन्सन् हा आपल्या ख्रिस्तपुराणाच्या शेकडो प्रती छापखान्यातून छापून काढून गोरगरिबांना वाटीत होता, तर त्याच काळी एकनाथी भागवताची एकएक प्रत चार महिने खपून आम्ही हाताने लिहून काढीत होतो. पाश्चात्यांचे हे शास्त्रीय प्रगतीतील मर्म आम्ही ओळखिले नव्हते.

### हिंदूंचे अक्षम्य अज्ञान

त्याचे एक कारण म्हणजे हिंदूंचा विश्वसंचार थांबला होता व ते कूपमण्डूकवृत्तीचे झाले होते. या वृत्तीचे उत्तम निदर्शक उदाहरण म्हणजे त्यांचे भूगोलाचे ज्ञान होय. नाना फडणीस त्यातल्या त्यात चौकस व जागृत बुद्धीचा मुत्सद्दी असल्याने सवाई माधवराव पेशव्यांच्या शिक्षणक्रमात हरतऱ्हेच्या ज्ञानाचा समावेश करावा असे त्यास वाटे. पण त्या काळी खुद्द हिंदूंचे भूगोलविषयक ज्ञान

हिंदुस्थानच्या बाहेरील प्रतापवैभवी मुसलमानांचे होते. मुस्तुनिया, राम वगैरे काही तुरळक नावे त्यांच्या कानावरून गेली असतील तेवढीच पण बाकीच्या जगाची त्यांना कल्पनाही नव्हती. नाना देशांचे नाना सौदागर हरतऱ्हेचे, हरनमुन्यांचे जिन्नस विकण्यास घेऊन आपल्या बंदरी येत. तसले पदार्थ तयार करण्याची कारागिरी आपल्याकडे नाही याची अस्पष्ट जाणीव असे. पण परकीय सौदागर जेथून येतात त्या सातासमुद्रापलीकडे कोणते देश आहेत, तेथे शास्त्र, विद्या, कला कोणत्या उन्नतावस्थेस आल्या आहेत याची कधी चौकशीच केली गेली नाही. इंग्रज हे शास्त्रविद्येने आपल्यापेक्षा पुढारलेले आहेत हे त्यांना दिसत होते. तोफा व दारूगोळा तयार करण्याच्या विद्या थोड्याबहुत ते त्यांच्यापासून शिकत होते. अहमदाबाद, पुणे वगैरे ठिकाणी तोफांचे कारखाने उभारले जात होते पण या विद्येच्या पाठीमागे असलेल्या शास्त्रीय प्रगतीची यथार्थ कल्पना त्यांना झालेली नव्हती. ती होणे तर शेपन्नास तरुण बुद्धीचे विद्वान आणि कारागीर विलायतेस पाठवावयास हवे होते. जपानने हे मर्म ओळखले आणि म्हणून अवघ्या पन्नास वर्षांच्या मुदतीत शास्त्रीय प्रगतीत आपले राष्ट्र पाश्चात्य राष्ट्रांच्या मालिकेत त्याने आणून बसविले. आम्ही हे मर्म ओळखले नाही म्हणून पाश्चात्यांच्या आधीन झालो. आता स्वातंत्र्यप्राप्तीनंतर तरी हे मर्म ओळखून आपण विज्ञानाची उपासना निष्ठेने चालवू या

* * *

# ६. विज्ञानाची उपासना

मुनापुराच्या परिसरात अणुभट्टीचा उपन्यास करून आपला भारत देश विज्ञानविकासाच्या आद्यतम क्षेत्रात पदार्पण करीत आहे. गेल्या दोन-तीन दशकांत पाश्चात्य देशांत विज्ञानाच्या प्रगतीने आश्चर्यकारक उच्चांक गाठला. या काळात आपला भारत देश दास्य शृंखलांनी बद्ध झालेला असल्याने पाश्चात्त्यांच्या घोडदौडीपुढे तो मागसला तर आश्चर्य कसले? आता भारत स्वतंत्र झाला आहे. स्वातंत्र्याचे वारे वाहू लागून अवघे पहिले दशक संपण्यापूर्वीच अणुभट्टीचे उद्घाटन करून आपल्या जागरूकतेची व बुद्धिमत्तेची चुणूक दाखवीत आहे. इतकेच नव्हे तर युरोपाच परकीय खंडातून बाहेर पडत असलेल्या आशिया खंडातील देशांत प्रथमतः अणुभट्टीची आस्थापना आपला भारतपुरुषच करीत आहे. पंजाबमधील भाक्रा नानगल व ओरिसातील हिराकुड येथील धरणांसारख्या अमाप पाणीपुरवठ्याच्या व विद्युन्निर्मितीच्या अफाट योजना त्याने नुसत्या मनात घोळवीत न ठेवता अथवा नुसत्या कागदावर मनःकल्पित आराखडा काढूनच ठेवल्या नाहीत, तर स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या अवघ्या दशकात काही प्रमाणात प्रत्यक्ष अमलात आणून चालू झालेल्या दिसत आहेत. साधी कागद टाचण्यांची टाचणी देखील जो परतंत्र भारत परदेशांतून मागवीत होता तोच आपला भारत आता टाटानगर कारखान्यात प्रचंड पोलादी नळ्या भट्टीतून आणीत आहे. चिरौंजर कारखान्यासारखे कारखाने या खंडातून गिरण्यांना लागणारी यंत्रे निर्माण करीत आहेत, आगगाड्यांची इंजिने तयार करणारे परातूर व चित्तरंजन येथील प्रचंड कारखाने पुढील वर्षी दोनशे इंजिने तयार करण्यास सिद्ध आहेत. विशाखापट्टम येथे बोटी बांधण्याचे व बंगलोर येथे विमाने तयार करण्याचे कारखाने सुरू झाले आहेतच आणि दक्षिण ध्रुवावरील चालू संशोधनाच्या कार्यात भारतीय शास्त्रज्ञही भाग घेत आहेत. याप्रमाणे भारत विज्ञानोपासना करीत आहे आणि आता विज्ञानदेवतेची अखंड उपासना करण्यावाचून अन्य मार्ग नाही.

## विज्ञानवेत्त्यांपुढील जटिल प्रश्न

विज्ञानाची उपासना कोणत्याही स्वतंत्र स्वाभिमानी राष्ट्राला यापुढे टाळता येणार नाही. कारण विज्ञानप्रगतिपथात दोन पावले मागे असलेल्या राष्ट्रांनी 'शांतिरस्तु पुष्टिरस्तु' असा कितीही मंत्रजागर केला तरी बलवान राष्ट्रे त्यांना धूप थोडाच घालणार? आणि ती धूप घालणार नाहीत हे स्पष्ट असता डोळे झाकून घेणे अनिष्ट ठरेल. वस्तुस्थिती अशी की, विज्ञान देवता ही कमलासनावर उभी राहिलेली लक्ष्मी व महिषासुरमर्दिनी अशी दोन्ही रूपे धारण करून आलेली आहे. ती भक्ताला धनधान्यसमृद्धीचा वरही देते आणि शत्रूचा निःपात करण्याकरिता शस्त्रेही पुरविते. विज्ञानदेवी ही संरक्षकही आहे व संहारकही आहे. गेल्या महायुद्धात शास्त्रज्ञांना अणुभट्टीतून एक अभिनव शक्ती वश झाली; पण केले काय, तर तिला डिवचून तिच्या हस्ते जपान देशातील हिरोशिमा व नागासाकी ही दोन मोठी शहरे निमिषार्धात जाळून राख करून टाकली! यामुळे या विज्ञानशक्तीचे संहारक रूप सौम्य कसे करावयाचे व संग्राहक रूप उज्ज्वल कसे करावयाचे हा प्रश्न विज्ञानवेत्त्या राष्ट्रांपुढे आज दंड थोपटून उभा आहे.

निसर्गावर मात करण्याची अनेक सुखस्वप्ने विज्ञानाला हस्तगत झाली आहेत. पण मानवाच्या मनावर मात करण्याची विद्या हस्तगत करण्यात तो अद्याप तरी हतबुद्ध ठरला आहे. यामुळे शस्त्रास्त्रांच्या चढाओढीत शत्रूवर मात करण्याच्या ईर्षेने रशिया-अमेरिका यांसारखी बलिष्ठ राष्ट्रे अणुस्फोटाचे चाचणी प्रयोग करीतच आहेत. आणि आता त्यात इंग्लंडही सामील झाले आहे. या चाचणी-वजा प्रयोगाने शे-दीडशे मैलांपलीकडील प्राण्यांनाही कसा कडू अनुभव चाखा-वयास सापडतो याची कल्पना अमेरिकेने केलेल्या हायड्रोजन-स्फोटाच्या

ती हस्तगत झाली असल्याने तिला तो विषारी, जारिणी पूतनेसारखी वागविणार की यमाला वश करून सत्यवानाला दीर्घायुष्य लाभू देणाऱ्या सावित्रीप्रमाणे तिचा सदुपयोग करून घणार हे कालपुरुषच ठरवील !

## भीषण, भयानक शंका

प्रबल राष्ट्रातील परस्पर अविश्वास, स्वत च श्रेष्ठत्व इतरावर लादण्याची खुमखुमी व त्याकरिता सहारक शक्तींची उपासना ही जोवर नगा नाच घालीत आहेत तोवर 'कालोऽस्मि लोकक्षयकृत् प्रवृत्त ' या श्रीकृष्णाच्या उक्तीप्रमाणे लोकक्षयाची म्हणजच अखड मानवजातीच्या सहाराची नांदी तर अणुस्फोट करवाने गात नसेल ना ? अशी भीषण भनायक शकची चमक आपल्या मनातून गत्यास नवल कसले ? दुसऱ्या जागतिक युद्धात हिरोशिमा व नागासाकी या जपानी शहरातील लाखो लाक सख्येला निमिषाधात भस्मसात करणाऱ्या अणुबॉम्बची आठवण ताजी असल्याने मानवजातीच्या सहाराची कल्पना ही आता कल्पित सृष्टीतील उरलेली नाही. वरील स्फोटाच्या शतपटीने अधिक भीषण असलेल्या हायड्रोजन बॉम्बच्या स्फोटाची चाचणी अमेरिका व रशिया ही बलिष्ठ राष्ट्रे इतर कनिष्ठ राष्ट्राच्या विनतीला झिडकारून उघडपणे करीत आहेत आणि इग्लड फ्रान्सन इजिप्तला व रशियाने हगरीला ओरबडण्याचे जे प्रकार सुरू आहत, त्यावरून शांततेचा मत्र चचळ ठाणी टरणार असे वाटू लागले आहे. अशा स्थितीत तिसऱ्या महायुद्धाचे हामखुद पटून त्यातून फकल्या जाणाऱ्या हायड्रोजन बॉम्बने अखड मानवजातीचा सहार तर होणार नाही ना अशा शका आपणाला टोचू लागऱ्या आहत जादूगारान मत्र पठन करून ब्रह्मसमध वश करावा, पण काही काळ मागल त स्वैरपणे दिल्याबर अती ताच समध जादुगाराच्याच मानगुटीवर बसावा असा तर प्रकार हाणार नाही ना ? मत्तीचा ध्यास घनलेल्या एका पौराणिक राजपुत्राला देवदूत वश झाला असता त्याने चाधाशीपणे वर मागितला, की मा ज्यावर हात फिरवीन ते सोने व्हाव. 'तथास्तु ' म्हणून देवदूत अतधान पावला ! राजपुत्रान अनक वस्तूवरून हात फिरविला आणि पाहता पाहता त्या सर्व सुवर्णमय होऊन चमकू लागलेल्या पाहून त्याची छाती चप झाली, ऐय्याशीने त्या त्या मिशा कुरवाळू लागली. पाहतो वा शिपाही सानरी

झालेल्या. पुढे वहात खूप होऊन स्वतःची पाठ थोपटू लागला. तो काय झाले? तर होडामाणाची पाठ सोनेरी होऊन पाहता पाहता राजपुत्रच सोनेरी मुडदा होऊन पडला!

असेच काहीसे अभद्र पर्यवसान तर या अणुविभाजनाच्या रहस्याचे होणार नाही ना? म्हणजे सृष्टीचे एक एक गूढ रहस्य आपण उकलले म्हणून शास्त्र बेहाय होऊन हातवार करीत असता त्याच हातानी तो मानवतेची मान कापून तर घेत नाही ना? भस्मासुराला भोळ्या शंकराने वर दिला की, तू ज्याच्या मस्तकावर हात ठेवशील तो तात्काळ भस्मसात होईल या वराने हुरळून गेलेला भस्मासुर मानवजातीचा संहार करण्यास निघाला पण मोहिनीने त्याला भुरळ घालून न कळत स्वतःच्याच डोक्यावर हात ठेवण्यास सांगितले आणि मोहिनीला भस्मसात करण्याकरिता उचललेला हात मोहिनीला भुलून स्वतःच्याच मस्तकावर ठेवताच भस्मासुर स्वतःच खाक झाला. हायड्रोजन बॉम्बच्या शक्तीत असे काही भीषण प्रकार घडून सबंध मानवजात तर भस्मसात होणार नाही ना?

## शतवार विचार करावा लागेल

अर्थात या शक्तीमधील बलिष्ठ राष्ट्रानाही हायड्रोजन स्फोटाचा युद्धकालीन संहारशस्त्र म्हणून वापर करताना निवार विचार करावा लागेल. त्यातच अणुविभाजनाच्या प्रयोगाचे भविष्य दडलेले आहे. कारण एकदा युद्धाचा भडका पडला म्हणजे इर्षेला पडून कोणीही माघार घेण टाळील. त्या इर्षेच्या भरात अखिल मानवजातीचा संहार होईल अथवा ती कल्पनातीत होरपळून निघेल. पाचसहा हजार मैलावरही आपली शस्त्रे उड्डाण करू शकतील अशा तऱ्हेची बलिष्ठ राष्ट्रे मारू लागली आहेतच. पण या बलिष्ठ राष्ट्रानाच आपले शस्त्र वापरण्यापूर्वी निवार विचार करण्याची परिस्थिती निर्माण झाली आहे. याचे कारण असे की, जगात एकाच राष्ट्राला ही अणुस्फोटाची विद्या साध्य झाली असती व ती ते गुप्त राखू शकले असते तर त्या राष्ट्राने उन्मत्त होऊन इतर राष्ट्रांना पायी लोळण घ्यावयाला लावण्यास मागे पाहिले नसते. हिरोशिमावर बॉम्ब टाकून अमेरिकेने जपानला धडाधडा दाती तृण धरून, हात बांधून शरणागतीने यावयास भाग पाडले हे आपण पाहिलेच. पण आता [illegible] रशियाच पाशी हा शस्त्राही एकाच

राष्ट्राची मिराशदारी राहिलेली नाही. यामुळे हत्येच्या दहशतीने अराड झाला आपणापुढे नाकपुडया पादाक्रयास सार या स्वप्नात आता कोणत्याही बलिष्ठ राष्ट्राला झिगत राहता येणार नाही. चार वर्षापूर्वी चीनच्या पूर्वेस असलेल्या कोरिया देशात अमेरिका व रशिया या दोन बलिष्ठ राष्ट्रांनी दंड थोपटून एकमेकास आव्हान देऊन पाहिले. पण दोघही तुल्यबल आहात असे पाहताच दोन भाडखोर माजरे जशी दूर बसून एकमेकावर गुरगुरतात तसे ही बलिष्ठ राष्ट्रे नुसते गुरगुरण्यात समाधान मानून घेऊ लागली आहेत! नुकत्याच म्हणजे १९५६ मध्ये सुवेझ कालव्याचे इजिप्तने राष्ट्रीयीकरण करताच इंग्लंड फ्रान्सने इजिप्तवर ऑँग्र पेकले व इस्रायलने इजिप्तचा काही भाग तोडून गिळंकृत करण्याचा घाट घातला. पण रशियाने जागतिक युद्धाची धमकी देताच अमेरिकेने इंग्लंड फ्रान्सला थोपटून धरलेले आपण पाहत आहोतच.

तिसरे महायुद्ध पेटणारच नाही अशा स्वप्नात राहणे भ्रामक ठरेल. पण ते पेटले असता व त्यात हैड्रोजन बॉबचा भन्पा उडविला असता ज्या जिनोवर साम्राज्य गाजवावयाचे ती जित राष्ट्रेच नष्ट झाली तर ' जित मया ' ही गर्जना कोणासमोर करावयाची अशी समस्या जय्या राष्ट्रापुढे नाक राजान पाहू लागल. आइन्स्टाइनसारख्या शास्त्रज्ञांनीही निभीडपणे जाहवले आहे की, या हायड्रोजन बाॅबचा अतिरेकी वापर कल्यास त्यातून पेटल्या गेलेल्या विषारी किरणानी सर्व वातावरण विषारी बनेल. जीवितच अशक्य झाल्याने प्रदेश निर्जन होईल. अशा स्थितीत जित्याने त्याच्यावर जेतेपणाचा तोरा मिरवावयाचा व त्यांना शोषून घरून आपण पुष्ट व्हावयाचे तेच नष्ट झाल्याने जितान्नाही जित प्रदेशातील उरलेसुरले दगड चघळीत बसावे लागेल. म्हणूनच आगामी तृतीय महायुद्धात हायड्रोजन बॉम्बचा किंवा त्याहीपेक्षा प्रखर अस्त्राचा शोध लागल्यास त्याचा वापर करण्यापूर्वी अखंड मानवजात नष्ट होणार नाही ना याचा आक्रमक राष्ट्राला विचार नाहे करावा विचार करावा लागेल. याचाच अर्थ नवनवी संहारक विषारी अस्त्र हस्तगत झाली तरी ती प्रमाणाबाहेर वापरावयाची की, अल्प प्रमाणात वापरावयाची याचा विवेक राखावाच लागेल.

## कचाचे अनुकरण करावे

वस्तुत हायड्रोजन बॉम्बमध्ये संकलित केलेली शक्ती ही स्वतः निरलस, निःस्वार्थ शक्ती आहे. तिच्यावर पापी नजर टाकून डिवचलेच तर ही महिषासुरमर्दिनी तुमचे मर्दन केल्याशिवाय सोडणार नाही. उलट तिला सगुण केलेत तर ती हसतमुखाने अनंतहस्त अगणित शक्तिसंपत्ती तुम्हास बहाल करील. अल्प प्रमाणात वापरले असता विष हेही अमृतासारखे उपकारक ठरते हे वैद्यराज आपणास पटवून देतातच ना? अणुशक्ती हीही योग्य प्रमाणात आणि संहाराकरिता नव्हे तर स्वास्थ्य संवर्धनाकरिता वापरली तर अपार सुखसंपत्ती आपणापुढे लोटांगण घालील. अशी ही अमर्याद साधनसंपत्ती आपण लाथाडणार काय?

विज्ञान विस्तार हा शाप का वर हे आपण ठरवावयाचे आहे. हा शाप ठरेल या भीतीने गांगरून जाऊन नाक दाबून बुडी मारून जलसमाधी घ्यावयाची, की या नवीन हस्तगत झालेल्या प्रचंड शक्तिप्रवाहात सुखैनैव पोहत जावयाचे हा प्रश्न आपणापुढे उभा आहे. अशा स्थितीत विज्ञानाच्या दिपवून टाकणाऱ्या जागतिक संवर्धनाकडे हताश नजरेने बोटे मोडीत पाहत बसणे हे क्षुद्र वृत्तीचे दुर्बलतेचे ठरणार नाही का? स्वतंत्र भारताच्या परंपरेच्या ते विरुद्ध जाईल. भारताचे सुवर्ण लुटण्याकरिता आजवर अनेक लोभिष्टांनी स्वाऱ्या केल्या. अनेक वेळा बलभीम भारताने त्यांना पिटाळून लावले. यापुढे आक्रमण झाल्यास आक्रमकांना गारद करण्यास त्यांची विज्ञानविद्या आमच्यात असली पाहिजे. संजीवनी विद्येचा हरण करण्याकरिता कचाने असुरांचा गुरु शुक्राचार्य याचे शिष्यत्व पत्करले नाही का? तसेच स्वतंत्र भारताने बलिष्ठ राष्ट्रांतील शास्त्रज्ञांचे शिष्यत्व स्वीकारले पाहिजे. मात्र कचाचेच उज्ज्वल ध्येय डोळ्यापुढे ठेवून कचाने देवयानीच्या आहारी जाण्याचे जसे कसोशीने टाळले तसे परकीय राजकारणी वारांगनेच्या आहारी जाण्याचे तितक्याच कसोशीने आपण टाळले पाहिजे.

• •

आहे. विज्ञानाची उपासना तुमची राहणी ही दिवसेंदिवस अधिकाधिक सुखमय करीत चालली आहे ती सवडीमोल मानावयास तुम्ही खरोखर तयार आहात काय? खंडाळ्याच्या घाटात उंच पर्वतावरून खोल दरीत धो धो कोसळणाऱ्या जलप्रवाहाच्या तालावर भिंगरीप्रमाणे फिरणारी विद्युच्छक्ती ही तुमच्या मुंबापुरीतील अनेक छोट्या-मोठ्या गिरण्या, सरसाने चालविते आणि घरी-दारी नवलाचे दिवे उजळते. ही जी विजेची अजब करामत, तिला धिक्कारण्यास तुम्ही खरोखर तयार आहात काय?

विज्ञानाने धर्मभावनेला धक्का दिला अशी हाकाटी एकीकडे करीत असतानाच देवळाच्या गाभाऱ्यात नंदादीप तेवत ठेवलात तरी मंडपात विद्युन्माला लावण्यास तुम्ही कमीपणा मानीत नाही, इतकेच काय पण खुद्द गर्भागारात देवतेच्या मूर्तीवर शांत पण भरघोस प्रकाश टाकणारी ट्यूबलाइट नळी वापरताच ना! पूर्वी देवालयाचे शिखर तेलाच्या पणत्यांनी उजळत होता ते धार्मिक, आणि आता स्वातंत्र्योत्सवाच्या शुभदिनाला विद्युद्दीपकाच्या सहस्रावधी दीपिका उजळल्या ते मात्र भौतिक? का हे सर्व कलियुग कलियुग म्हणत कपाळावर हात मारीत अपरिहार्य म्हणून करता? पूर्वी तुमचे आजोबा-पणजोबा काशीयात्रेला जात ते बैलगाडीतून जात व वाटेत अनेक चोराचव्हाट्यांना तुम्डी देत वर्षभरांनी सुखरूप परत येत. आल्यावर काशीविश्वेश्वराला धन्यवाद देत, इष्टमित्रांना बोलवून सुखासमाधानाचे सुस्कारे टाकीत मावंदे करीत. आज वाफेने भरधाव झोंझावत फिरणाऱ्या आगगाडीने गेला तर दोन तीन दिवसात काशीयात्रा उरकाल आणि विमानाने उड्डाण करीत गेला तर एक दोन दिवसात काशीची गंगा रामेश्वराला अर्पण करून तेथील सेतु आणून गंगेला वाहण्याचे पुण्य संपादन कराल. मग ज्या विज्ञानविद्येने ही यात्रा सुलभ केली त्या विद्येची भौतिक व जड म्हणून तुम्ही हेटाळणी करीतच राहणार काय? आणि त्याहीपेक्षा अधिक महत्त्वाचा प्रश्न म्हणजे तुम्ही पूर्वीप्रमाणे वर्षभराचा रखडता प्रवास खरोखर स्वीकाराल का? वैराग्यवृत्तीचे साधुसंत आजही काशी-रामेश्वराची यात्रा पायी करणारे आहेत. पण सामान्यजनहो तुम्ही पूर्वीचा गडद्वर प्रवास पुन्हा स्वीकाराल का? मुळीच नाही. तुम्हीच कशाला? आजचे आपले बहुजनसमाजाला सदुपदेश करीत फिरण्यात उभे आयुष्य वाहणारे साधुसंत व शंकराचार्यादि आचार्यांचे स्थान विभूषित करणारे आचार्य हेही

वाहतुकीच्या अध्ययावत वाहनांचा उपयोग करीत असलेले आपण पाहत आहोच ना ? आणि ते करतात ते कालानुरूप सर्वस्वी योग्य असेच आहे. तेव्हा जनतेची जी सुदीर्घ-अव्याहत सेवा विज्ञानाच्या उपासकांनी केलेली आहे तिची जडविद्या, भौतिकविद्या म्हणून हेटाळणी करणे योग्य नव्हे.

## हे कर्तृत्व विज्ञानाचेच

विज्ञानवृद्धीच्या दुरुपयोगाने शिसारी येऊन गांधी-टॉलस्टाय सारखे लोकनेते पुनश्च प्राचीन युगातील राहणी स्वीकारूया असा आर्तस्वर उठवीत असत. पण आपले पूर्वज आपल्या पेक्षा खरोखरच अधिक सुखी होते काय ? आजच्या विज्ञानसमृद्ध युगापेक्षा प्राचीन काळी आपत्ती खरोखर कमी होत्या का ? सुखलोलुपांच्या आधाशी आकांक्षा सोडा, पण बहुजनसमाजाच्या मूलभूत गरजा ज्या अन्न, वस्त्र व आरोग्य ह्या विज्ञानविकासापूर्वी आपणास भेडसावीत नव्हत्या का ? दुर्गादेवीच्या दुष्काळासारख्या दुष्काळांनी उग्र स्वरूप धारण केले की हजारो माणसे मृत्यूच्या खाईत लोटली जात. उलट आज विज्ञानाने समृद्ध केलेल्या वाहनांतून हजारो मैलावरच्या देशातील धान्य आपण अल्प काळात आणू शकतो. अशाही अफाट संपत्तीत काही मानवांची अन्नान्नदशा होत असेल तर त्याला धना-धीशांची स्वार्थलोलुपता जबाबदार होय, विज्ञानाची कुचराई नव्हे. अनावृष्टी-ऐवजी अतिवृष्टी होऊन नद्यांनी तुफान मांडले तर खेडोखेडी गिळकृत केली जात. पण प्रचंड धरणे बांधून या बेमुर्वत थयथयाट करणाऱ्या नद्यांनाही नम्र करण्याचे जे प्रयोग चालू आहेत ते विज्ञानाच्या उपासनेनेच ना ? पर्वतावरून उड्या मारणाऱ्या प्रवाहाच्या अजस्र कानठळ्या बसणाऱ्या गागाटाकडे व बेफाम थैमानाकडे 'आश्चर्यवत् पश्यति' असा काहीसा भयभीत व काहीसा आश्चर्य चकित होऊन पाहत बसण्याचा काल मागे सारला आहे तो विज्ञानानेच ना ? अशा घोंघों वाहणाऱ्या धुंद प्रपाताच्या तांडवनृत्यातून आपली चक्रे फिरवून घेऊन विद्युत्शक्तीने मोठमोठी नगरे असंख्य प्रकाशकिरणांनी उज्ज्वलित करीत आहे ते विज्ञानच ना ? म्हणूनच जीवन सुखमय करण्याची इतर अनेक साधने बाजूस सारली तरी आपणा सर्वांच्या प्राथमिक गरजा त्या मनसुबाद पुरविण्यात विज्ञानाने

जी विस्मयनीय कामगिरी दाखवली आहे तिचे मूल्य तुटपी मापाच्या मापाने मोजणार ?

## उपासनेचा अर्थ असा आहे

विज्ञानवेत्त्यांना सगळ्याच संकटांवर मात करता आली नाही व कदाचित कधीही करता येणारही नसेल. जरी मानव समाजाला अन्नवस्त्र निवारा या मूलभूत गरजा पुरविण्याची शक्ती त्याने वश केलेली असली तरी सर्व रोगांचे निवारण डॉक्टर अद्याप करू शकत नाही, भूकंप अथवा ज्वालामुखी यांना तो हटवू शकत नाही लाखो वर्षांनी का होईना पृथ्वी थंड होऊन मानवी जीवनाला असह्य ठरणार असली अथवा एखादा अगडबंब धूमकेतू पृथ्वीवर आदळून पृथ्वीचा शकले उडणार असली तर विज्ञानवेत्ताही हतबुद्ध होईल. पण कधीकाळी अवचितपणे घडणाऱ्या या घटनांची धास्ती घेऊन ‘ आले देवाजीच्या मना तेथे कोणाचे चालेना ’ असे म्हणून तो हताश होणार नाही. ‘ धाव विभो करुणाकर माधव ’ अशी दीनदयाळ जगन्नाथाची आळवणी करीत न बसता, दयाघनप्रभूने बुद्धिमत्तेची अत्यंत अमोल अशी जी देणगी मानवाला दिली तिचा कसोशीने प्रयत्न करून ‘ *उद्धरेत् आत्मनात्मानम्* ’ या विचारसरणीने आपल्या बुद्धिमत्तेचा संकटनिवारणात कसोशीने प्रयत्न करील. हा प्रयत्न म्हणजेच विज्ञानाची उपासना होय. ती शाप ठरणार की वरदान ठरणार हे आपण मानवांनी ठरवावयाचे आहे.

अमृताचे विष करणे व विषाचे अमृत करणे ही दोन्ही विज्ञानवेत्त्यांना साध्य झाली आहेत. अणुशक्तीच्या स्फोटाने ते क्षणार्धात लाखोंची धूळधाण करतील तर त्याच शक्तीच्या साहाय्याने अजस्र कारखाने चालवून अभावग्रस्तांना अन्नवस्त्र पुरवतील. म्हणून विज्ञानाने हस्तगत केलेल्या सामर्थ्याने हतबुद्ध होऊन आपणच केलेल्या त्याच्या दुरुपयोगाबद्दल त्याला शिव्याशाप देत न बसता त्याच्या अनमोल साह्यानेच अनेक आपत्तींवर आपण मात करू अशी उत्साही वृत्ती आपण धारण करूया.

* * *

पुरुषोत्तम गणेश सहस्रबुद्धे

## १. शिवछत्रपतींचे क्रांतिकार्य

आता अवधारा कथा गहन, जे कळाकौतुका जन्मस्थान, की अभिनव उद्यान, विवेक तरुंचे । ना तरी सकळ धर्मांचे माहेर, सज्जनाचे जिव्हार, लावण्यरत्न भांडार, शारदेचे ॥

श्रीशिवछत्रपतींच्या क्रांतिकार्याचा विचार करू लागताच ज्ञानेश्वरांच्या वरील ओव्या मनापुढे उभ्या राहतात. ज्ञानेश्वरांनी त्यात महाभारताच्या वैभवाचे वर्णन केले आहे. आपण छत्रपतींच्या चरित्राचा अभ्यास केला तर शिवभारताच्या वर्णनातही ही शब्दश्री तितकीच साथ होईल हे आपल्या ध्यानी येईल. आणि पंधराव्या वर्षी हिंदवी स्वराज्याची भव्य आकांक्षा चित्तामध्ये सामावून घेणाऱ्या महापुरुषाच्या चरित्राचे निरूपण करण्यास पंधराव्या वर्षीच भावार्थदीपिका रचणाऱ्या ज्ञानेश्वराच्या रसिक, अमृत अक्षरांहून अन्य शब्द तरी कोठून आणावे ?

### पूर्वीच्या सहिष्णुतेचा परिणाम

'हिंदवी स्वराज्य' या महासंकल्पाचें जे स्फुरण महाराजांच्या चित्तात झाले त्यानेच सतराव्या शतकापासून पुढचा भारताचा सर्व इतिहास पालटून गेला. पूर्वीच्या काळी हिंदूंची अत्यंत विशाल अशी साम्राज्ये होती. चंद्रगुप्त, अशोक यांच्या साम्राज्यात बलुचिस्तान, अफगाणिस्तान व त्यालगतचा प्रदेश यांचा अंतर्भाव झालेला होता. पुढे शक, यवन, कुशाण, हूण यांचा पराभव करून त्यांची आक्रमणे मोडून काढणारे पुष्यमित्र, पुष्यमित्री ब्राह्मण, समुद्रगुप्त, श्रीहर्ष यांनीही हिंदुस्थानात मोठमोठी साम्राज्ये स्थापन केली होती. त्या काळात सुवर्णयुग निर्माण झाले होते. या सुवर्णयुग निर्मात्यांत सम्राट् अशोक, कलिंगराज खारवेल, श्री हर्ष, महानंदपाल हे बौद्ध सम्राट् होते. अमोघवर्ष हा जैन होता. चंद्रगुप्त मौर्य, शालिवाहन राजे, मगधाचे चंद्रगुप्त, समुद्रगुप्त हे सम्राट्, चालुक्य घराण्यातील

त्याच्या मनोव्यापाराचे मानसशास्त्रीय अवगाहन करावे, या विचारसरणीतून हे अनर्थ निर्माण झाले आहेत. याचा परिणाम असा झाला की आपल्याला कसलीही शिक्षा होत नाही हे ध्यानात आल्यामुळे बालाच्या मनातला दैवी अंश जागा होण्याऐवजी सैतान फक्त जागा झाला आहे," असे त्या म्हणतात. न्यायमूर्ती सिल्मेड वॉल्टमेड यांच्या मते या गुन्हेगारीच्या वाढीला सध्याची शिक्षणपद्धती म्हणजे तेथले **मानसशास्त्र** हे कारण आहे. मुलांना स्वातंत्र्य द्यावे, त्याचे मानसशास्त्र पाहावे, त्याचा आत्माविष्कार होऊ द्यावा, हे जे थोतांड माजले आहे त्याचे हे परिणाम आहेत. घरी, दारी, शाळेत कोठेही मुलांच्यात अपप्रवृत्ती दिसताच त्यांना कडक शिक्षा झाली पाहिजे, असे त्यांचे मत आहे. यावरून मुलांना त्यांच्या गुन्ह्याबद्दल जबाबदार धरावे असे न्याय मूर्तीचे मत आहे हे स्पष्ट दिसते. जेन व्हाईट ब्रेड या बाईंनी नव्या मानस शास्त्राने अमेरिकन घरात काय अनर्थ घडविला आहे त्याचे सविस्तर वर्णन 'रीडरस् डायजेस्ट' (मे १९५९) च्या अंकात केले आहे. आणि या अनर्थाला, आम्हा मातापित्यांच्या दुबळेपणाला फ्रॉईडचे मानसशास्त्र कारणीभूत आहे, असे त्यांनी स्पष्ट म्हटले आहे.

अलेक्सिस करेल या थोर शास्त्रज्ञाने हेच मत दिले आहे. त्याने सर्वच परिस्थितिवादी पक्षाचा विचार केला आहे. तो म्हणतो की, अर्थवादी लोकांनी हे ध्यानात घ्यावे की, रोजगार, अन्न, वस्त्र, विश्रांती यांशिवाय आणखीही कशाची तरी मनुष्याला गरज असते. शारीर गरजांप्रमाणेच आत्मिक गरजाही मनुष्याला असतात. आणि आर्थिक आपत्तींना व वैचारिक कारणेही असू शकतात. मनुष्याला अर्थबद्ध यंत्र मानणे हे जसे घातक तसेच, तो केवळ मनोगंडाधीन आहे असे मानणे हेही घातक आहे. हा विचार मांडून कॅरेल म्हणतो की, फ्रॉइडने जडवादी लोकांपेक्षाही समाजाचा जास्त घात केला आहे. (मॅन दि अननोन, पृ. २०८)

अर्वाचीन काळात लोकायत्त देशांत शास्त्राच्या आधाराने मानवाच्या मानवत्वाचा, त्याच्या व्यक्तित्वाचा, त्याच्या इच्छास्वातंत्र्याचा, प्रवृत्तिस्वातंत्र्याचा जो समाजाने अवमान केला आहे, त्याचे हे सर्व दुष्परिणाम आहेत. जुन्या कर्मवादाचीच ही नवी रूपे आहेत. नियतीच्या, कर्माच्या हातचे मनुष्य हे बाहुले आहे, असे सनातन पंडित मानीत, आता आर्थिक परिस्थितीच्या

किंवा मत मनोगंडाच्या हातचे ते बाहुले आहे, असे नवे पंडित सांगतात दोहोंचा तात्पर्यार्थ एकच होतो मानवाला आत्मस्वातंत्र्य नाही! वास्तविक मानवाच्या जीवनाची सर्व प्रतिष्ठा त्याच्या या आत्मस्वातंत्र्यात आहे आणि मानवनिष्ठाची प्रतिष्ठा हा तर लोकशाहीचा पाया मानला जातो तरी सर्वात पुढारलेल्या लोकायत्त देशानी ती प्रतिष्ठा धुळीस मिळवावी यापरता दैवदुर्विलास कोणता? मानवाला त्याच्या कृत्याबद्दल जबाबदार धरणे, यातच खरोखर त्याची प्रतिष्ठा राखली जाते नाहीतर त्याच्यात आणि दगडात फरक तरी कोणता? त्याच्यावर परिस्थितीचे परिणाम होत नाहीत असे कोणीच म्हणत नाही वर सांगितलेच आहे की अनुवंश, भौगोलिक परिस्थिती, शिक्षणसंस्कार, सर्व मन गोष्टींचा त्याच्यावर परिणाम होत असतो पण जडवस्तूप्रमाणे अमक्या संस्काराचा अमुक परिणाम, अमक्या परिस्थितीचे हे फल असे मुळीच सांगता येत नाही यावरून मानवाच्या अंतरात बाह्य संस्काराच्या परिणामाचे, स्वतःच्या इच्छेप्रमाणे, वाटेल ते रसायन तयार करणारी अशी एक स्वतंत्र शक्ती आहे हे उघड दिसते या शक्तीच्या आधारावरच धर्म नीती या निष्ठा आजवर जगत आल्या आहेत आता या नव्या शास्त्रानी त्याचा तो आधार काढून घेतला आहे म्हणून मानवाचे चारित्र्य, त्याची नीती, त्याचा धर्म हे सर्व निराधार झाले आहेत आणि मानवाची धर्मनिष्ठा, नीतिनिष्ठा, त्याच्या भावना याची सुखदुःखे, त्याची ज्ञानलालसा, सौंदर्याभिरुची याची अवहेलना करण्यामुळे मानवाचा अधःपात होत आहे

## मानवातला मानव जागा करा

अंतःशक्तीच्या बळावरच मानव हा मानव झाला आहे आणि तिच्यामुळेच स्वतःच्या अंतःसृष्टीवर व बाह्यसृष्टीवर मनुष्याने प्रभुत्व प्रस्थापित केले आहे असे असताना 'माझा मी प्रभू नाही, माझ्या हातून जे घडले त्याला मी जबाबदार नाही,' ही भूमिका मानवाने घेणे हा त्याचा कमालीचा अधःपात आहे परिस्थिती म्हणजे तरी काय? अन्य मानवानी आपल्या इच्छाशक्तीच्या जोरावर ठरवलेले कायदे, प्रसृत केलेले विचार, दृढमूल केलेल्या रूढी आणि रूढविलेली समाजाची रचना हे सर्व जर वाईट असले तर दुसऱ्या मानवानी आपल्या इच्छाशक्तीने

ते हाणून पाडणे, बदलणे, हाच त्यावर उपाय आहे परिस्थिती म्हणजे दुसऱ्या कोणाची तरी इच्छाशक्तीच असते आणि ती सुधारण्यास **दुसरी इच्छाशक्तीच अवश्य असते** अशा स्थितीत एखाद्याची इच्छाशक्ती कमजोर झाली आणि तो परिस्थितीला बळी पडला तर त्याच्याविषयी सहानुभूती दाखविणे, त्याला साह्य करणे योग्य ठरेल इतकेच पण त्याचे समर्थन करणे म्हणजे मानवत्वाचा पायाच उखडून टाकणे होय गरकऱ्यांची दुमन ही अबला आहे, असहाय आहे, तिला संयम मनोनिग्रह साधला नाही ती दुराचाऱ्या कारस्थानाला बळी पडली तिच्याबद्दल अनुकंपा वाटणे, तिला जवळ घेणे सर्वथैव योग्य आहे पण ती असहाय स्त्री बळी पडली म्हणून ही सहानुभूती आहे पण ती जर 'ते समाजाला विचारा, ते रानटी रूढीला विचारा' असे म्हणून आपले समर्थन करू लागली तर तितकी अनुकंपा वाटणार नाही कारण संयम करणे, निग्रह करणे हे ज्याने स्वातंत्र्य असलेली ती एक मानव-व्यक्ती आहे, याच कल्पनेला त्यामुळे धक्का बसतो तरी तिच्या बाबतीत सनच क्षम्य वाटणे हे शक्य आहे पण परीक्षेत वाम मार्गाचा विद्यार्थ्यांनी अवलंब केला आणि त्यात त्याचा दोष नाही असे त्याचे प्राध्यापक म्हणू लागले, तर ते दोघेही गुन्हेगार आहेत असे म्हणावे लागेल. कारण तेथे मनुष्याला त्यांनी लाकडाचा ओण्डा मानले, असे होते परीक्षेला महत्त्व आहे तर जास्त अभ्यास करणे, कसून मेहनत करणे आणि परिस्थितीवर मात करणे हे सामर्थ्य मानवाच्या ठायी आहे असे असताना परिस्थितीला दोषी ठरवून त्या विद्यार्थ्याला दोषमुक्त करणे म्हणजे मानवाचे मानवत्व नाकारणे होय

खऱ्या स्वतंत्र अवलोकन व शास्त्राभ्यास यांचा भारतात अभाव असल्यामुळे आपणही अमेरिकेतले औदार्याचे प्रयोग करीत आहोत शाळेत मुलांना शिक्षा करावयाची नाही घरी धाक दाखवावयाचा नाही आणि समाजात समारंभात, युवक-महोत्सवात त्यांचा आविष्कार होऊ द्यावयाचा! याचा परिणाम काय होतो आहे ते दिसतच आहे विद्यार्थी शाळा, महाविद्यालये व विद्यापीठे बंद पाडीत आहेत संमेलने, युवक-महोत्सव उधळून लावीत आहेत आणि समाजाचे धुरीण मानसशास्त्रज्ञ यांचे मूढ साधीन आहेत! गुन्हेगारांवरही मानवतेचे महान प्रयोग चालू आहेत. आपल्याकडे

मध्यंतरी काही खुनी माणसाची मुक्त वसाहत केली होती. त्यांना जमिनी दिल्या होत्या. 'मानवतेचा महान प्रयोग' म्हणून त्याचा वृत्तपत्रात गौरव झाला. आचार्य विनोबांनी मध्यप्रांतातील खुनी, दरोडेखोर यांच्यावर असेच मानवतेचे प्रयोग केले. वास्तविक हृदयपरिवर्तनाचे प्रयोग आपल्या ठायी आहे असे विनोबांना वाटत होते तर काळाबाजारवाले, प्रातिकर चुकविणारे, दारूभट्टया चालविणार, लाच खाणारे सरकारी अधिकारी, भारतातल्या सर्व सरकारी रुग्णालयातले डॉक्टर, परिचारिका, गडी यांच्यावर त्यांनी प्रयोग करावयाचा होता. तो महागात तरी पडला नसता. पण त्यांनी खुनी, दरोडेखोर यांच्याकडे आपल्या सहानुभूतीचा ओघ वळविला आणि मध्यप्रदेशातली गुन्हेगारी वाढवून घेतली. सध्या आपला हाच उद्योग चालू आहे! तुरुंगात आपण गुन्हेगारांना मायेने वागवून त्यांचे जिणे सुसह्य करीत आहोत. त्यामुळे गुन्हेगारी वाढत आहे आणि जनतेला मात्र जिणे असह्य होत आहे. भारताला सामान्य व्यवहाराच्या पातळीवर राहणे कधीच आवडत नाही, हे त्याचे मुख्य दुर्दैव आहे. राजकारणात राष्ट्रीय पातळीवरून विचार न करता आपण नेहमी आंतरराष्ट्रीय पातळीवरून बोलतो. त्याचप्रमाणे हृदयपरिवर्तन, मानस शास्त्र या मार्गांनी मानवातला परमेश्वर जागा करण्याचा आपल्याला कायमचा हव्यास लागला आहे. प्रत्यक्षात मात्र शिक्षेचे भय नाहीसे झाल्यामुळे त्यांच्यातला पशू जागा होत आहे. मला वाटते आपण हे महान आणि भव्य प्रयोग रद्द करून मानवातला मानवच जागा करण्याचा प्रयत्न केला तर बरे होईल. तसे करावयाचे म्हणजे मानवाचे प्रवृत्तिस्वातंत्र्य किंवा आत्मस्वातंत्र्य मान्य केले पाहिजे. कारण तेच मानवत्वाचे मुख्य लक्षण आहे. सध्या भारतात कोणावरही कसलीही जबाबदारी नाही. वाटेल ते अनर्थ येथे घडत आहेत. पण त्याला जबाबदार कोणीही नाही. प्रत्येकजण 'ते समाजाला विचारा' असे म्हणत आहे. **आत्मस्वातंत्र्याचे महत्त्व आपल्याला कळले तर 'ते मला विचारा' असे म्हणण्याचा कणखरपणा आपल्या ठायी निर्माण होईल आणि त्यातच राष्ट्राच्या उत्कर्षाची गुरुकिल्ली आहे.**

* * *

## ३. संघटित जीवनाचा महामंत्र

मनुष्य हा समाजप्रिय प्राणी आहे असे शास्त्रज्ञ सांगतात. काही शास्त्रज्ञांच्या मते तर समाज करून राहण्याची प्रवृत्ती ही मानवाच्या उपजत प्रवृत्तींपैकीच एक प्रवृत्ती आहे. मनुष्याला समाज करून राहणे आवडते, इतकाच याचा अर्थ असेल तर या विधानाला हरकत घेण्याचे कारण नाही. पण समाज एकत्र टिकून धरण्यास जे गुण अंगी लागतात ते मानवाच्या अंगी सहज्च असतात, उपजतच ते त्याला प्राप्त झालेले असतात, असा जर शास्त्रज्ञांचा अभिप्राय असेल तर मग मात्र त्यांच्या विधानावर अनेक शंकाकुशंका, अनेक आक्षेप मनात निर्माण होऊन त्यांची सत्यता मनाला पटेनाशी होते आतापर्यंतच्या मानवाच्या चरित्राकडे पाहिले तर स्वार्थ, मत्सर, अहंभाव, संकुचित दृष्टी इत्यादी गुणांमुळे माणसाची स्वभावत विघटनेकडेच प्रवृत्ती असते आणि संघटना घडविण्यासाठी त्याला अनंत प्रयत्न करावे लागतात, जिवाचा आटापीट करावा लागतो, आणि इतकेही करून पुष्कळ वेळा अपयशच पदरी येते असे दिसते. अनेक कारणांमुळे छिन्नभिन्न, विघटित झालेल्या समाजाला संघटित करून स्वधर्म, स्वदेश, यांची सेवा करण्यास प्रवृत्त करणारा मनुष्य हा महापुरुष ठरतो, त्याला लोक विभूती समजतात. इतकी संघटना ही गोष्ट इतिहासात दुर्मिळ असलेली दिसते. मानवाची संघटितपणाकडे स्वभावतःच प्रवृत्ती असती तर असे झाले नसते. ती निर्माण करणाऱ्या नेत्याला असल्या अलौकिक पदव्या कोणी दिल्या नसत्या. तेव्हा मनुष्याला समाजात राहणे आवडते हे खरे असेल, आणि असा राहण्याने आपले संरक्षण होते, आपल्या मनाचा, बुद्धीचा, पराक्रमाचा व एकदर गुणांचा विकास होतो हेही त्याला कळत असेल, पण ज्या समाजात आपण राहतो व ज्याच्यामुळे आपला सर्व प्रकारे फायदा होतो तो समाज संघटित व बलिष्ठ करण्याकडे मनुष्याची स्वभावतः प्रवृत्ती असते हे म्हणणे इतिहासाला

मान्य होईल असे वाटत नाही. आणि हीच मानवी जीवनातील मोठ्या दुःखाची गोष्ट आहे.

## भारताच्या संघटनेच्या दृष्टीने

सर्व प्रकारचे सामर्थ्य व समृद्धी समाजाला प्राप्त करून देणारी ही संघटना अशी अत्यंत दुर्मिळ व दुःसाध्य असल्यामुळेच आजपर्यंत शेकडो शास्त्रज्ञानी, तत्त्ववेत्त्यानी व कार्यकर्त्यांनी मानवाला ती कशी सुसाध्य होईल याविषयी चिंतन करण्यात जन्मचे जन्म घालविले आहेत, आणि त्या चिंतनातून निर्माण झालेले सिद्धान्त त्यानी मानवाच्या मार्गदर्शनासाठी सांगून ठेवले आहेत. या सिद्धान्ताचा थोडा परामर्श घेऊन भारतीय समाजाच्या संघटनेच्या दृष्टीने त्यावरून काही निष्कर्ष काढता आल्यास तसा या लेखात प्रयत्न करावयाचा आहे. धर्मभेद, पंथभेद, प्रांतभेद, भाषाभेद, वर्णभेद अशा अनंत भेदानी आपला समाज जर्जर झालेला आहे. त्यातच आता अर्वाचीन काळी भांडवलदार मजूर, जमीनदार–शेतकरी अशा वर्गभेदाची आणि द्रवीड व आर्य, आदिवासी व आक्रमक अशा जित जेत्याच्या भेदाची भर पडत आहे. या सर्व भेदामुळे भारतीय समाज पोखरून गेला आहे व वेळीच सावध होऊन या भेदांच्या अतीत जाण्याची शिकवण समाजाला दिली नाही तर त्याची अनंत शकले होऊन तो पूर्वीप्रमाणेच हतबल होण्याचा संभव आहे. आणि म्हणूनच या प्रश्नाचा फार गांभीर्याने विचार होणे अवश्य आहे.

## धर्म पंथ ही संघटनेची निर्णायक तत्त्वे नाहीत

धर्म हे एक संघटनेचे तत्त्व मागल्या काळीच सांगितले गेले आहे व अजूनही सांगितले जाते. आणि धर्म या प्रेरणेने संघटित होऊन माणसानी पराक्रमाच्या अद्भुत कोटी केल्या हेही खरे आहे. अरब लोक अत्यंत विस्कळित व विघटित असताना धर्म प्रेरणेनेच महमदाने त्याना संघटित केले. आणि त्यामुळे ते इतके बलशाली झाले की, जिब्राल्टरपासून सिंधपर्यंतचा मुलूख त्यानी एकदोन शतकाच्या आत पादाक्रांत केला. ख्रिस्ती धर्माने युरोपला इतके जरी नव्हे तरी पुष्कळच एकरूप

व संघटित केले होते. पण धर्मामुळे लोक संघटित झाल्याची इतिहासात दहा उदाहरणे असली तर एकाच धर्माच्या लोकांनी आपापसात लढून परस्परांचा निःपात करून टाकल्याची शंभर उदाहरणे आहेत. एका मुसल्मानांतच मोगल, खिल्जी, शिया, सुन्नी, अरब, इराणी, तुर्क असे भेद होऊन त्यांनी घनघोर रणसंग्राम करून पृथ्वी अनेक वेळा उजाड करून टाकली आहे. ख्रिस्ती धर्मात कॅथॉलिक, प्रॉटेस्टंट, ऑर्थोडॉक्स या पंथभेदामुळे व अर्वाचीन काळी राष्ट्रभेदामुळे केवढे प्राणांतिक संग्राम माजले व त्यांनी जगाची कशी अपरिमित हानी झाली हे विश्रुतच आहे. हिंदुस्थानात पूर्वकाळी एक हिंदुधर्म प्रचलित होता, तेव्हा ज्या आपसात लढाया झाल्या त्या एकधर्मीयांतच झाल्या हे उघड आहे. पुढच्या काळातही धर्म हा बंध अखिल हिंदूंना यादवीपासून मुक्त करू शकला नाही. इतकेच नव्हे तर, आपण सर्व हिंदू एक समाज आहो, आपणा सर्वांची सुखदुःखे, आपले हितसंबंध एक आहेत ही भावना हिंदुधर्म त्याच्या सर्व जातींच्या व वर्णांच्या अनुयायांत कधीही निर्माण करू शकला नाही. मराठे व रजपूत हे तर दोघेही अत्यंत श्रेष्ठ वर्णाचे क्षत्रिय होते. पण त्यांच्यातसुद्धा एकधर्मीयत्वामुळे ऐक्यभाव निर्माण झाला नाही. तेव्हा धर्म ही भावना केव्हा केव्हा संघटनेस कारण होऊ शकते यापलीकडे काहीही म्हणता येत नाही.

धर्माप्रमाणेच वंशकल्पनेचे आहे. कधीकधी इतिहासात या तत्त्वाने एक-वंशीयांत अतिशय चिवट असा ऐक्यबंध निर्माण केला आहे. परवाच्या युद्धात जर्मन लोक याच वंशभावनेने पेटून पिसाट झाले होते. मागल्या काळच्या अंध धर्मनिष्ठेप्रमाणेच ही वंशनिष्ठा माणसांना बेहोष करून संघटित करू शकली. आणि त्या बेहोषीत जर्मनांनी जे सामर्थ्य प्रकट केले त्याला इतिहासात खरोखरच तुलना नाही. प्राचीन काळी तर वंशतत्त्वाचे प्राबल्य बरेच असे. आर्य लोक वंशतत्त्वामुळेच संघटित होऊन बलशाली झाले. ग्रीक, फोनीशियन, हूण, शक, कुशाण, तार्तर, मगोल या बहुतेक वंशांत संघटनाच होत्या. त्यांनी पराक्रमाच्या कोटीही केल्या. पण धर्माप्रमाणेच वंश हाही निश्चित ऐक्याला कधीही कारण होऊ शकला नाही. ग्रीक लोक एकवंशीय असून आपसात लढूनच दुबळे झाले. पुष्कळ वेळा काही ग्रीक राज्ये इराणी आक्रमकांना स्ववंशीय इतर राज्यांविरुद्ध साह्य करीत. आर्यजनांतही संग्राम झाले,

तसेच भयानक संग्राम आर्या-आर्यातही झाले आहेत. ऋग्वेदातील महायुद्ध हे आय-अनार्यांतील नसून आर्या-आर्यांतील होते असे अर्वाचीन संशोधक मानतात. कौरव पांडवातील युद्ध व पुराणातील इतर अनेक युद्धे एकवंशीय आर्यातीलच होती. हाच मामला अर्वाचीन श्वेतवर्णीय युरोपियनांचा आहे, पश्चिम युरोपियनांचा आहे. पश्चिम युरोपातील ब्रिटन, फ्रान्स, हॉलंड, जर्मनी, इटली, स्वीडन, नॉर्वे इ. देशातील लोक आता बहुतेक एकवंशाचे आहेत मुळात अल्पाईन, मेडिटरेनियन असे त्यांच्यात भेद असले तरी आता या वंशकात त्या भेदांना फारसा अर्थ नाही. असे असूनही हे गोरे एकवंशीय लोक आपसातील युद्धाने जगाचा प्रलयकाळ जवळ आणणार अशी भीती निर्माण झाली आहे. पूर्व युरोपातील स्लाव्ह-वंशीय लोक – पोल, रशियन, युगोस्लाव्हियन – हेही याला अपवाद नाहीत. रशिया-युगोस्लाव्हिया या एकवंशीय राष्ट्रांत सध्या अहिनकुलाचे नाते आहे. आणि त्यांच्या संघर्षातून ठिणगी पडून केव्हा भडका उडेल याचा नेम नाही

## राष्ट्रनिष्ठेचे आसन डळमळले

धर्म व वंश यापेक्षा राष्ट्र हे संघटन-तत्त्व जास्त प्रभावी ठरले होते, आणि समाजात एकवंशव निर्माण करण्यास एक हुकमी साधन सापडले अशी बरीच आशा वाटू लागली होती. पण गेल्या पंचवीस वर्षांत धर्म व वंश या तत्त्वांनी पुन्हा जोर केला आहे त्यामुळे या राष्ट्रनिष्ठेचे बंध ढिले झाले आहेत. आणि साम्यवादाच्या नव्या तत्त्वामुळे राष्ट्रनिष्ठेला सुरुंगच लागला आहे. अमेरिका, ब्रिटन येथील नागरिकांत राष्ट्र भावना परिणतीस पोचली होती. गेल्या दोनशे वर्षांत स्वदेशद्रोह करून फितूर झाल्याचे उदाहरण या देशात घडलेले नव्हते. क्वचित तसे घडले तर सर्व राष्ट्राला भयंकर संताप येत असे. पण साम्यवादाने राष्ट्रनिष्ठेवर उघडउघड हल्ला केला आहे. अमेरिका, ब्रिटन व त्याचबरोबर फ्रान्स, हिंदुस्थान, जपान या देशांतील कम्युनिस्ट उघडपणेच स्वदेशापेक्षा रशियावर जास्त भक्ती करतात आपल्या राष्ट्राच्या कारभाराची गुप्त रहस्ये इंग्लिश माणूस शत्रूंना सांगेल हे कोणाच्या स्वप्नातही आले नसते पण तसे प्रकार घडून येत आहेत मागे युरोपात ख्रिस्ती धर्मावरील निष्ठा प्रबळ होती त्या वेळी स्पेन च्या देशातील श्रेष्ठ

सत्तेपेक्षाही तेथील जनता रोमच्या पोपची आज्ञा जास्त वंद्य मानीत असे त्यामुळे जर्मनी, पोलंड, स्पेन या देशात दृढ अशी राष्ट्रभक्ती निर्माण होऊ शकली नाही जर्मनात पुढे ही वृत्ती बदलली त्याबरोबर ते राष्ट्र समर्थ झाले हिंदुस्थानात हिंदी मुसलमानांचे प्रेम स्वदेशापेक्षा मक्का मदिना व तेथील धर्मसत्ता यावर जास्त आहे ही जशी धर्मनिष्ठा राष्ट्राला विकल करून टाकते त्याच प्रमाणे साम्यवादी लोकांची मास्कोनिष्ठा राष्ट्रनिष्ठेचे वध ढिले करून टाकते. हंगेरी, पोलंड, झेकोस्लोव्हाकिया, बल्गेरिया इ. राष्ट्रे तेथील कम्युनिस्टांच्या मॉस्कोनिष्ठेमुळे रशियन साम्राज्यात कधीच सामील होऊन गेली आहेत इटली, फ्रान्स इ. राष्ट्रे त्या वाटेवर आहेत इतर देशातही नागरिकांच्या या निष्ठेला सुरुंग लागला आहे हे दाखविणारी उदाहरणे मिळतील. धर्मनिष्ठ व वंशनिष्ठा त्याज्य मानल्या, पण आता तिचेच आसन ढळमळले आहे तर, राष्ट्रनिष्ठेला त्याज्य मानून तिच्या जागी साम्यवादी लोकांनी जी निराळी निष्ठा आणली आहे ती समाज संघटित करण्यात यशस्वी होईल अशी आशा आहे काय ? मुळीच नाही

## वर्गकल्पनेचाही चासलात लागली

'जगातील कामगारांनो एक व्हा,' अशा समाज-संघटनेचा नवा संदेश मार्क्सने गेल्या शतकात दिला पण वर्गीय संघटना हे तत्त्व इतर निष्फळ ठरले की, ते कोणासही धरू शकले नाही. धर्म, वंश, राष्ट्र यांचे तरेवाइट रूप नगाला मूर्तरूपात पाहावयास तरी मिळाले पण 'सर्व जगातल्या कामगारांचे ऐक्य' हे त्या पायरीपर्यंतही आले नाही इतरांना स्वप्नदर्शी म्हणता म्हणता मार्क्स व त्याचे अनुयायी हे जगातले सर्वात मोठे स्वप्नदर्शी ठरले मला तर असे वाटते की, सर्व जगातल्या कामगारांची संघटना, हा स्वप्नातसुद्धा कोणाच्या नजरेसमोर आली नसेल इतकी ती व्यवहारापासून दूर आहे सर्व जगातले कामगार सोडा राष्ट्रे एका देशातल्या कामकरी जनतेची भाडवलदाराविरुद्ध संघटना या अर्थाने तरी 'वर्ग' हे संघटना-तत्त्व यशस्वी झाले आहे काय ? तसे झाले असते तर धर्म, राष्ट्र यांच्या निदान तोडीचे तरी पण नव्हते तर सापडते असे म्हणता आले पण तितकेही यश या तत्त्वाला मिळालेले नाही. बहुतेक सर्व देशात कामगारांच्या

संघटनात अनेक चिरफळ्या झालेल्या दिसतात. मागल्या काळी धर्म किंवा वंश या निष्ठा प्रबळ होत्या आणि लोक त्यासाठी लढत असत असे म्हटले तर ते कम्युनिस्टांना मान्य होत नाही. हिंदूंच्या बाजूने मुसल्मान, मुसल्मानांच्या बाजूने हिंदू असे लढले आहेत, हिंदु-मुसल्मान यांच्यात आपापल्या धर्मीयांशीही लढाया झाल्या आहेत, असे सांगून हे सर्व भेद भ्रामक होत, आर्थिक भेद हाच खरा भेद, असे तत्त्वज्ञान कम्युनिस्ट सांगतात. पण आर्थिक भेदावर उभारलेल्या संघटना जेव्हा धर्म, राष्ट्र यांच्या प्राबल्यामुळे चिरडून जातात तेव्हा काय म्हणावयाचे ? हिंदुस्थानात कामगारांमध्ये कम्युनिस्टांचे कार्य पंचवीस वर्षे तरी चालले आहे. पण मुसल्मान कामगारांनी पाकिस्तानच्याच बाजूने मते दिली आणि कृती केल्या. आर्थिक दृष्टीने त्यांना हिंदू कामगार जवळचे वाटणे अवश्य होते; पण तसे झाले नाही. मुसल्मान जमीनदार व भांडवलदारच जास्त जवळचे वाटले. कोणत्याही देशातल्या कामगार-संघटना पाहिल्यानंतरी कोणत्या ना कोणत्या कारणाने त्या छिन्नभिन्न झालेल्याच दिसतात. हिंदुस्थानात 'लाल बावटा' संघटना आहे. 'रॉयवादी' होतीच. सोशॅलिस्टांची 'हिंद मजदूर' संघटना आहे. पण लक्षावधी कामगारांना, त्यांच्याच तत्त्वान्वये भांडवलदारांच्या आहारी गेलेल्या सरकारने प्रस्थापिलेली, 'इंटक' हीच संस्था प्रिय वाटते. आपले हितसंबंध सरकारच्या हातीच जास्त सुरक्षित आहेत अशी त्यांची खात्री असली पाहिजे. रशियामध्ये कामगार-संघटना अत्यंत दृढ व प्रबळ आहे असे कोणी म्हणतात. तशी ती असली तरी वर्ग संघटना हे तत्त्व यशस्वी ठरले असे होत नाही. कारण धर्म व वंश या प्रेरणा यशस्वी झाल्याची उदाहरणे यापेक्षा कितीतरी जास्त आहेत. सर्व कामगारांचे हितसंबंध एक आहेत त्यामुळे त्यांची संघटना दुर्भेद्य व बलशाली होणार, त्यांच्यात यादवी माजण्याचे कारणच नाही, [ रायशॉनाफ ] हा जो नवा सिद्धान्त तो अगदी फोल ठरतो. धर्म, वंश, राष्ट्र, यांच्याप्रमाणेच वर्ग या तत्त्वाचीही अशी वासलात लागते.

धर्म, वंश, राष्ट्र, वर्ग या संघटना तत्त्वांचा हा इतिहास पाहिला की, एक विचार मनात येतो. तो हा की, संघटित राहणे ही मनुष्याची उपजत प्रवृत्ती नाही. ती प्रयत्नाने सिद्ध करावयाची गोष्ट आहे आणि ती सिद्ध करण्यासाठी मानवाने आतापर्यंत जी तत्त्वे अवलंबिली ती त्या त्या काळी काही प्रमाणात जरी यशस्वी झाली असली तरी ती निश्चितपणे फलदायी

त्या निष्ठाचा ते उपयोगही करून घेतात. पण त्याचा इतिहास आपण पाहिला तर असे दिसेल की, 'एकत्र राहावयाचे, राष्ट्र घडवावयाचे' ही भावना मनात असल्यामुळे त्यांनी हे ऐक्यपोषक घटक निर्माण केले आहेत. ते घटक मूळचे होते म्हणून त्यांचे ऐक्य झाले असे नाही, त्या भूमीत मूळचे ब्रिटन व इबेरियन हे लोक होते. नंतर अँगल्स, सॅक्सन्स, डेन्स, नॉर्मन्स असे भिन्न ज्ञातींचे लोक तेथे आले. आणि हे आले ते जेते म्हणून आले. नॉर्मन्स १०६६ साली आल्यानंतर तीनशे वर्षे इंग्लिश लोक केवळ गुलाम होते म्हणजे मूळचा रक्तभेद, त्यात जित आणि जेते या भेदाची भर पडली. नॉर्मन हे फ्रेंच होते. त्यांची भाषा फ्रेंच होती. आणि इंग्लंडमध्ये दोनशेअडीचशे वर्षे राजभाषा, जेत्यांची भाषा, फ्रेंच होती व जितांची इंग्लिश होती. म्हणजे वंशभेद होता, भाषाभेद होता, जित-जेते भेद होता. पण हळूहळू या सर्व समाजाचे मनोमन असे ठरत गेले की, '**आपण सर्वांनी मिळून एकराष्ट्र म्हणूनच जगावयाचे आहे,**' म्हणून हे सर्व भेद त्यांनी वितळवून टाकले व एक अखंड, एकसंघ घडण तयार केली. म्हणजे आपण समजतो तो कार्य कारणभाव येथे उलटा झाला. ऐक्य-कारणे होती म्हणून त्यांच्यात ऐक्यभाव निर्माण होऊन ते एकजीव झाले असे नसून, एकजीव व्हावयाचे असे त्यांनी आधी ठरविले आणि मग ऐक्य-कारणे निर्माण केली.

गेल्या महायुद्धात **भांडवलदार व कामगार यांच्यातील वर्गविग्रहाच्या संदर्भात हाच प्रकार** घडला. हा भेद व तज्जन्य वगलढा फ्रान्स प्रमाणे इंग्लंडमध्ये होताच. पण हिटलरची स्वारी येताच दोन देशांतल्या भांडवलदारांनी दोन मार्ग स्वीकारले. फ्रेंच भांडवलदारांनी स्वतःच्या कामगारांची मनं जोडण्यासाठी त्यांना संपत्तीचा वाटा देऊन फ्रेंच राष्ट्र संघटित केले असते तर त्यांचे राष्ट्र हिटलरपुढे नेमण्याचे कारण नव्हते. पण त्या भांडवलदारांनी हिटलरशी दोस्ती करण्याचा मार्ग पत्करला. आणि मग भांडवलदार व कामगार दोघेही भरडले गेले. पण ब्रिटिश भांडवलदारांनी समजसपणे आपल्या संपत्तीचा वाटा कामगारांना दिला, आणि त्यांना पाठीशी घेऊन हिटलरला तोंड दिले. त्यामुळेच हिटलरला खडे चारण्याचे सामर्थ्य त्या राष्ट्राला प्राप्त झाले. हे उदाहरण वरील सिद्धान्त अगदी निर्णायकपणे सिद्ध करते. एक धर्म, एक रक्त, एक राष्ट्रीयत्व, एक भाषा ही सर्व ऐक्य-कारणे दोन्हीकडे

सारखीच होती. पण एकत्र राहावयाचे आहे, तुकडा पडू द्यावयाचा नाही, हे मंचाचे ठरलेले नव्हते, आणि इंग्रजांचा तो कृतनिश्चय होता. त्यामुळे अर्वाचीन काळातील वर्गभेद ही जी सर्वात मोठी व निश्चयाने राष्ट्र दुभंगून टाकणारी भेदभावना, तिलाही ते जुळी पडले नाहीत. आपण एक-राष्ट्र म्हणूनच जगावयाचे आहे असे ज्याचे ठरलेले नाही त्याच्याजवळ ऐक्यपोषक असे एक धर्म, एक रक्त, एक भाषा इ. कितीही बंध असले तरी अगदी क्षुल्लक कारणसुद्धा त्यांना दुभंगून टाकण्यास पुरेसे होते आणि ज्यांनी एक राष्ट्र म्हणून जगायाची प्रतिज्ञा केलेली असते त्यांच्या ऐक्यभावनेवर वज्रप्रहार झाले तरी त्यांचे बंध चिवटपणे टिकून राहतात.

इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी या देशातील **सरंजामदाराचा इतिहास असाच** आहे. या सरंजामदार-सरदारांच्या आपसातील लढाया हे मध्ययुगीन जगाचे मोठे दुखणे होते. इंग्लिश सरदारही आपसात नित्य लढत हे खरे आहे. पण *घराच्या युद्धाच्या अखेरच त्यांनी त्या लढाया थांबवल्या.* इतिहासात आपण असे वाचतो की त्या वेळी नर्टुचीच्या दारूचा शोध लागला आणि त्यामुळे सरदारांचे किल्लेकोट हे सामर्थ्य नष्ट होऊन ते राजापुढे नमले. याला अर्थ आहे, नाही असे नाही. पण एक गोष्ट आपण लक्षात घ्याली पाहिजे ना, नर्टुचीची दारू फक्त इंग्लंडमध्येच उपलब्ध होती असे नाही. फ्रान्स, जर्मनी, पोलंड या देशातही ती उपलब्ध होती. पण तेथे हा परिणाम झाला नाही. म्हणजे इंग्लंडमध्येच लढाया थांबल्या याला काही निराळे कारण असले पाहिजे. दुसरा एक गोष्ट आहे. इंग्लंडमध्ये सरदार जेव्हा लढत त्या वेळी इंग्लंडचे दोन-तीन तुकडे करावे व त्या त्या प्रांतात आपापली स्वतंत्र संस्थाने स्थापून राज्ये चालवावी, हा विचार इंग्लिश सरंजामदारांच्या स्वप्नातही कधी आला नाही. उलट फ्रान्स सरदारांचे तसे प्रयत्न होते. त्यांना यश आले नाही ते निराळे. पण जर्मन सरंजामदार त्यात पूर्ण यशस्वी झाले. नेपोलियनची स्वारी झाली त्या वेळी जर्मनीत ३३९ स्वतंत्र संस्थाने होती व बिस्मार्क जेव्हा कार्याला लागला त्या वेळी ३९ होती. आणि फ्रान्समध्ये व जर्मनीत सरंजामदारांत शेवटी ऐक्य प्रस्थापित झाले ते राजसत्तेने त्यांना दडपून मारून काढले म्हणून. एका इतिहासकाराने याची मीमांसा करताना लिहिले आहे की, जर्मनीचे लहान-लहान तुकडे करून पण स्वतंत्र संस्थानांत आपण सार्वभौम

इच्छा त्यासारखी अशी तेथील सरंजामदाराची आकांक्षा असे. इंग्लिश सरंजामदारांना ही आकांक्षा गर्हणीय वाटे. आपल्याला जी सत्ता, जे अधिकार, मिळेल तो दुय्यम, निय्यम मिळाला तरी चालेल; पण सर्व इंग्लंडच्या एकछत्री राज्यात तो असावा अशी त्यांची मनीषा असे. इंग्लंडचे ऐक्य या त्यांच्या मनीषेमुळेच टिकून राहिले, ही यादवी युद्धे चालत त्या काळात इंग्लंड, फ्रान्स व जर्मनी या तीनही देशात एक रक्त, एक धर्म, एक भाषा, एक परंपरा, एक भूमाता हे सर्व ऐक्यतत्त्व सारख्याच स्थितीत अस्तित्वात होते. वाढता व्यापार व काहीशी माडनली निर्मिती त्यामुळे एकराष्ट्रीयत्व प्रस्थापित होते, असे मार्क्सवादी म्हणतात. त्याही बाबतीत तीनही राष्ट्रांत सारखी स्थिती होती. तरी तीन देशांच्या तीन अवस्था झाल्या आणि ऐक्य फक्त इंग्लंडमध्ये टिकले. या संघटित जीवनातून जे बळ निर्माण झाले त्यामुळेच इंग्लंड जगावर साम्राज्य प्रस्थापिण्यास समर्थ झाले. उलट फ्रान्सला अनेकदा साम्राज्य घालवावे लागले आणि जर्मनीला कधीच फारसे मिळाले नाही.

## ऐक्याचा निर्धार हाच संघटनेचा आत्मा

स्वित्झर्लंड व जपान यांची उदाहरणे अभ्यासण्याजोगी आहेत. स्वित्झर्लंडमधील समाजाची संघटना हा खरोखर जगातला एक चमत्कार आहे. या लहानशा देशात जर्मन, इटालियन व फ्रेंच असे तीन राष्ट्रीयत्वाचे लोक आहेत. हा देश राजकीय दृष्ट्या निराळा झाल्याला आठशे वर्षे झाली. पण त्यांची एक-भाषा अजून झालेली नाही. तीनही भाषा तेथे सारख्याच प्रमाणाने चालू आहेत. रोमन कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट हे दोन्ही पंथ तेथे असून ते जवळ जवळ तुल्यबळ आहेत. या तीन राष्ट्रांच्या मूळ देशात या काळात नित्य युद्धे चालू होती व आहेत. स्वित्झर्लंडमध्ये त्यातल्या त्यात जास्त संख्या जर्मनांची आहे. आणि जर्मनांचा वांशिक श्रेष्ठतेचा अहंकार फार प्रबळ असतो, हे जगविश्रुत आहे. अशी सर्व भेद-कारणे या देशात आहेत. पण आज इतकी शतके त्यांचे ऐक्य अभंग राहिलेले आहे. यासाठी त्यांना केवढी पथ्ये पाळावी लागली असतील याची कल्पना सहज येईल. शेजारी जर्मन व फ्रेंच यांचे युद्ध चालू असताना या देशातील जर्मन व फ्रेंच जमातींत त्या त्या बाजूला ओढा निर्माण होऊन

फितुरी होणे ही निती साहजिक गोष्ट होती. अगदी फितुरी नाही तरी या मित्र ज्मातींनी आपले सहानुभूतीचे ओघ आपापल्या देशाकडे वळविले असते तर त्यातूनच कटुता व दूरीभाव निर्माण होऊन त्याचे ऐक्य भंगले असते, व जर्मनांनी त्याचा फायदा घेऊन हा ल्हानसा देश आपल्या पोटात कधीच रिचवून टाकला असता. पण असा प्रकार घडला नाही. **आपण स्विस भूमीचे नागरिक आहो व आपणास अभंग स्थितीत एकत्र राहावयाचे आहे, अशी प्रतिज्ञा** त्या नागरिकांनी केलेली आहे व ती पाळलेलीही आहे. त्यामुळे विघटनेची सर्व कारणे तेथे अस्तित्वात असूनही त्यांची संघटना भग्न नाही. यावरून संघटित जीवनाची विद्या कोणती ते सहज ध्यानात येईल.

ज्पानने याच विद्येचा अभ्यास करून सामर्थ्य संपादन केले. १८६० पर्यंत हा देश भेदजर्जर, विकल व दुर्बल असा होता. अमेरिकेने लष्करी पहाणे पाठवून, तोफा रोखून ज्पानी लोकांकडून आपल्याला हव्या त्या तहावर सह्या करून घेतल्या, पण ही गोष्ट घरताच तेथील सरंजामदारांची विवेकबुद्धी जागृत झाली. छसुमा, चाशियु, टोसा व हिझेन हे चार प्रमुख सरंजामदार त्या वेळी जपानात होते. ' ज्पान एकछत्री होऊन बलिष्ठ झाला पाहिजे ' असे त्यांनी ठरविले, व स्वतःचे सरंजाम खुषीने खाली करून सम्राटाच्या स्वाधीन केले. धनाचे व लष्कराचे सर्व सामर्थ्य त्या वेळी या चार घराण्यांच्या आधीन होते. तरी त्यांची **विवेकबुद्धी, ऐक्य साधलेच पाहिजे ही बुद्धी, प्रबळ ठरली, आणि म्हणून जपान संघटित व प्रबळ झाला** तथ सामुराई हे रजपुतांच्यासारखे श्रेष्ठवर्गीय लढवय्ये लोक होते, आणि येग व हिनीन या आपल्याकडच्या अस्पृश्यांसारख्या जाती होत्या. आपल्याकडे ब्राह्मण-क्षत्रियांच्या रस्त्याने अस्पृश्यांना जाण्याची बंदी होती अस्पृश्यांची सावली उच्चवर्णीय घेत नसत. तेथे एवढ्यावरच भागत नसे. हिनीन माणूस समुराईच्या नुसता जवळून गेला तर पुष्कळ वेळा समुराई त्याची कत्तल करीत असे. इतके तीव्र भेद असताना सम्राटाच्या एका आज्ञापत्राने उच्चवर्णीय वरांनी लोकांनी ते पंचवीस-तीस वर्षांच्या आत पुष्कळ प्रमाणात नाहीसे करून टाकले. याचा अर्थ असा की, अनंत प्रकारचे भेद-कारणे प्रत्येक समाजाच्या राशीला लागलेली असतात, पण त्यांच्या आहारी जावयाचे नाही, असा दृढ निश्चय करून त्यांच्यावर आपल्या विवेकबुद्धीने मात करण्यांनी जो समाज सिद्धता करतो

त्याला ही धारणे विघटित करू शकत नाहीत. उलट ही विवेकदृष्टी ज्याने सवंर्धित केली नाही तो समाज कोणत्याही क्षुल्लक भेद-कारणाला बळी पडून छिन्नभिन्न होऊन शेवटी रसातळाला जातो.

## विवेकबुद्धी जागृत ठेवली तर

हा विचार ध्यानी घेऊनच आपण भारताच्या समाज संघटनेचा प्रयत्न आरंभिला पाहिजे. भेदकारणाचा विचार करता आपणास असे दिसून येते की, जगात असतील-नसतील ती सर्व भेद-कारणे येथ जमा आहेत. शेकडो वर्षे त्यांच्यात वैराग्नी धुमसत आहे. ते हिंदू आणि मुसलमान येथ आहेत. ब्राह्मण अब्राह्मण आहेत. स्पृश्य-अस्पृश्य आहेत. शिखांना निराळे शिखिस्तान हवे आहे. द्रविडांना निराळे द्रविडीस्थान हवे आहे. या मोठ्या समाजाच्या अंतरातही अनंत चिरफळ्या आहेत. ब्राह्मण किंवा ब्राह्मणेतर हे समाज काही एकसंध व अभंग नाहीत. अस्पृश्यातही महार, चांभार हे पूर्ण अलग आहेत. भिन्न भाषिकांचे संघर्ष असेच तीव्र झालेले आहेत. महाराष्ट्रीय, गुजराथी, कर्नाटकी यांच्यात भाषाभिमानामुळे अत्यंत कलहाना निर्माण झालेली आहे. उत्तर हिंदुस्थानात ओरिसा, बिहार, बंगाल यांची हीच स्थिती आहे. हे प्रांत भिन्न झालेले असले तरी प्रत्येक प्रांतात नेपाळ्यांच्या प्रांतिकांची वस्ती पुष्कळच आहे. आता निर्वासितांचे लोंढे सगळ्याच प्रांतात आल्यामुळे, भाषा, वंश, प्रांत यांचे भेद तेथे तेथे येऊन कलहास कारण होत आहेत. जमीनदार आणि कुळे, भांडवलदार व कामगार हे वर्गभेद तर विकोपाला जाण्याच्या मार्गावर आहेत. धर्म, पंथ, वंश, वर्ण, जाती, प्रांत, भाषा, वर्ग, जुन्या भिन्न परंपरा, जित जेते भाव, एवढी सगळी भेदकारणे भारतात जिवंत आहेत. प्रभावी आहेत. त्यामुळे या भूमीच्या भविष्याचा विचार करू लागताच मन व्यग्र व चिंताकुल होऊन जाते. पण वर उल्लेखिलेल्या देशाचा इतिहास पाहिला म्हणजे मनाला एक दिलासा वाटतो. भेदकारणे अनेक आहेत हे खरे पण एक विवेकबुद्धी जर आपण जागृत ठेवली तर या सर्व भेदभावनांवर मात करता येईल असा विश्वास मनात निर्माण होतो. इंग्लंड, स्वित्झर्लंड यांच्या चारित्र्यावरून एक गोष्ट, तरी स्पष्ट होते की, संघटित जीवन ही प्रयत्नसाध्य गोष्ट आहे. रक्त एक

असले तरच राष्ट्र संघटित होते, असा जर इतिहासाने निर्णय दिला असता, किंवा सर्व लोक एक-धर्मीय असल्यावाचून समाज एकजीव होणारच नाही असा त्याचा संदेश असता, तर मग हिंदुस्थानात आशेला जागाच नव्हती. पण तसे नाही. सर्व प्रकारचे भेद असूनही समाज मनात आणील तर संघटित होऊ शकेल, एकरूप प्राप्त करून घेऊ शकेल, असा इतिहासाचा संदेश आहे. मात्र 'आपण एक-राष्ट्र घडवायचेच' असा लोकांचा कृतनिश्चय असला पाहिजे. आपल्याला एकत्र व्हावयाचे आहे, अन्य गती नाही, विघटित झालो तर सर्वच आक्रमकाच्या तरवारीला बळी पडू, ही गोष्ट त्यांच्या विवेकाला कळली पाहिजे व वळली पाहिजे. हे झाले तर संघटित जीवन ही गोष्ट स्वाधीनची, ती दैवावर किंवा परिस्थितीवर किंवा दुसऱ्या कोणत्या मानवाच्या कक्षेबाहेरच्या कारणावर अवलंबून नाही, हा इतिहासाचा निष्कर्ष मनाला बरेच आश्वासन देऊ शकेल.

आणि या आश्वासनाच्या आधाराने 'भारतीय राष्ट्र घडवावयाचेच,' असा निर्धार करून आपण बसलो तर आपल्याला अनुकूल असे घटक पुष्कळ सापडतील. येथे स्थायिक झालेले समाज पाहिले व त्यांचा अभ्यास केला तर असे दिसते की, कोणत्याही दोन समाजात भेद जसे अनेक आहेत तसी सादृश्येही अनेक आहेत. ज्याला हे समाज तुटून निघावे असे वाटते तो भेदावर जोर देतो. ज्याला त्यांचे ऐक्य साधण्याची इच्छा असते तो सादृश्यावर भर देतो. पाकिस्तानची चळवळ चालू असताना हा प्रकार नित्य दृष्टीस पडत होता. प्रारंभी अनेक मुसलमानांच्या मते पाकिस्तानची चळवळ मुसल्मानांनाच घातक होती. अफ्झल हक् या लेखकाने पुढील विचार सांगितले आहेत : 'आजचे बहुसंख्य मुसलमान आर्यवंशीय आहेत. म्हणजे हिंदू व मुसलमान यांचे रक्त एक आहे. हिंदुस्थानातील शे. ८० मुसलमान मुसी बळणाचे आहेत. त्यांचे तत्त्वज्ञान हिंदूंच्या वेदान्तासारखे आहे.' काही बाय गोष्टी सोडल्या तर त्यांच्या मते हिंदुधर्म व आजचा मुसल्मानधर्म यांत काहीच फरक नाही. रेजाउल करीम या बंगालच्या पंडिताने, हिंदूंची व मुसल्मानांची परंपरा एकच आहे असे सांगितले आहे. वेद, उपनिषदे, राम, सीता, कालिदास, अशोक बुद्ध, राणा प्रताप, अकबर, शिवाजी, या परंपरेवर हिंदूंच्या इतकाच मुसल्मानांचाही हक्क आहे असे त्यांचे मत आहे. पाकिस्तानचा

पराभव हा आम्हा मुसलमानांचाही पराभव आहे, असे तो म्हणतो. सक्तीने धर्मांतर करण्याला कुराणात मुळीच आधार नाही, असे मौ. महमदअली यांनी सांगितले होते. मौ. अबुल कलाम आझाद, प्रा. शुस्तरी इ. पंडितांचा हाच प्रयत्न होता. हिंदुस्थान हे हिंदू व मुसलमान यांचे राष्ट्र होण्यास अनुकूल अशी अनेक वचने ते कुराणातून काढून देत. याउलट जीना, लियाकतअली आणि त्यांच्याच मताचे इतर मुसलमान नेते व कार्यकर्ते हे हिंदू व मुसलमान यांच्यातील भेदावर जोर देत. आपण मुसलमान जेते असून हिंदू जित आहेत हा विचार अनेक मुसलमान आपल्या समाजात दृढमूल करण्याचा प्रयत्न करीत. ज्या देशात मुस्लिम सत्ता नाही तो देश मुसलमानांच्या दृष्टीने शत्रूचा देश होय, या धर्मवचनावर ते जोर देत. ऐक्य घडवावयाचेच असा निश्चय असला म्हणजे भेदातून अभेद निर्माण करता येतो हे इंग्लंड, स्विट्झर्लंड या देशांच्या इतिहासावरून आपण पाहिले. आणि फुटून निघावयाचे असे ठरल्यावर अभेदातून पूर्ण भेद निर्माण करता येतो, हे पाकिस्तानच्या उदाहरणावरून दिसते. मौ. अबुल आझाद यांच्यासारख्यांचे एकप्रयत्न व्यर्थ होऊन १९४६ च्या सुमारास बहुसंख्य मुसलमान पाकिस्तानच्या बाजूला वळले. १९३७ साली मुसलमानी प्रांतातसुद्धा मुस्लिम लीगला महत्त्व मिळाले नव्हते. काही प्रांतात तर तिला फार मोठे अपयश आले होते. पण पुढील सात आठ वर्षांत आपण निराळे आहोत, आपल्याला हिंदूंसह एकराष्ट्र म्हणून नाहीच रहायचे हा मुसलमानांचा निश्चय झाला, सर्व मुसलमान मागे लीगने केल्या आणि हिंदुस्थानची फाळणी अपरिहार्य झाली.

अस्पृश्यांचे उदाहरण याहून अगदी उलट आहे. 'व्हॉट कॉंग्रेस अॅन्ड गांधी हॅव डन् टु दि अन्टचेबल्स' हे आंबेडकरांचे पुस्तक पाहा डॉ आंबेडकर आज अनेक वर्षे अस्पृश्यांना हिंदू म्हणण्यास नकार देत आले आहेत 'आम्ही धर्मांतर करणार' अशा घोषणाही त्यांनी अनेक वेळा केल्या आहेत वरील पुस्तकात आणि अन्यत्रही स्पृश्य व अस्पृश्य हे समाज परस्परांहून अगदी भिन्न असून ते एकमेकांचे कोणी नव्हत, असे त्यांनी अट्टाहासाने सांगितले आहे सवर्ण समाजातील एकाही थोर पुरुषावर त्यांचा विश्वास नाही. गांधी, नेहरू, वल्लभभाई, टिळक हे सर्व अस्पृश्यांचे द्वेष्टे

आहेत, ते आपला श्रेष्ठ वर्ण कधी विसरू शकत नाहीत, असे आरोप करून त्यांनी सवर्णीयांवर व विशेषतः ब्राह्मण व वनिया यावर अगदी गरळ फेकले आहे. इंग्रज सरकारने त्यांना अस्पृश्यांचे प्रतिनिधी म्हणून मान्य करावा पासून विभक्त मतदारसंघाची मागणी त्यांनी कधीही सोडली नाही. पुणे कराराला त्यांनी मान्यता दिली ती केवळ महात्माजींवर दया करून, त्यांचे प्राण वाचवावे या बुद्धीने! तुटून निघण्यास व तुकडा पडण्यास यापेक्षा जास्त काय लागते?

## भारत संघटित करणे अशक्य नाही

आणि जे लागते ते हिंदू समाजाने आधीच पुरविले होते आपण सर्व येथे हिंदू म्हणूनच राहत असलो, तरी उच्च वर्णीयांनी अस्पृश्यांना मानव ही पदवीसुद्धा कधी दिली नव्हती एक-धर्मीयता केवळ नावापुरती होती जगात कधी कोठे नसेल इतका तीव्र वशभेद स्पृश्य व अस्पृश्य यांत आहे मागले इतिहास पाहिले तर नित जेते भाव यांच्यात होता हे दिसून येते. या समाजाचा एकमेकाशी संबंध येत नसल्यामळे यांच्या परपरा, ज्यांचा अभिमान धरून माणसांनी कार्यप्रवृत्त व्हावे अशा मुळीच एकरूप झाल्या नाहीत. पण इतकी सर्व विषमतेची, दूरी भावाची, भेदकारणे असूनही हे दोन समाज एकसंध करावयाचेच असा दृढनिश्चय हिंदूंनी गल्या पन्नास वर्षांत करून तो टिकविला आहे आणि त्या साठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली आहे. आणि या प्रयत्नांची सांगता डॉ. आंबेडकरांनाच धर्मा विद्ध करण्यास सांगून हिंदूंनी करून टाकली. अशा रीतीने दोन्ही समाजांनी एकराष्ट्र म्हणून संघटित व्हावयाचे, असे ठरविल्या मुळे त्यांनी नव्हती ती ऐक्य–कारणे निर्माण केली व होती ती भेद–कारणे

आहे की नाही, एवढाच प्रश्न आहे. दक्षिण हिंदुस्थानात सध्या द्रविडीस्थानची चळवळ चालू आहे. आदिवासींचे प्रश्न उद्भावित होत आहेतच. या चळवळीत एक अशी प्रवृत्ती दिसते की, फार प्राचीन काळच्या इतिहासाचे संशोधन करून त्या काळची आर्य अनार्य, आदिवासी व परके आक्रमक, यांच्यातील कुणी वैरे, त्यांचे संघर्ष यांचे वर्णन करावयाचे. सत्यसंशोधन म्हणून अशा तऱ्हेचे प्रयत्न करण्यास काहीच हरकत नाही, न हे, ते अवश्य आहेत. पण त्यातून जोर कशावर द्यावयाचा, आजच्या दृष्टीने महत्त्व कशाचे मानावयाचे हे ठरविताना सावधगिरी घेणे अवश्य आहे. पूर्वकाळाच्या दृष्टीने जित व जेते असे गट ज्या देशात माहीत असा देशच पृथ्वीच्या पाठीवर आज नसेल. रशिया, चीन, अरबस्तान, इजिप्त, अमेरिका, मेक्सिको, इंडोनेशिया, कोणताही देश घ्या. गेल्या दोनतीन हजार वर्षांत अनेक वावटळी, उत्पात व आक्रमणे तेथे चालू होती. भिन्न वर्णांच्या, रक्ताच्या, परंपरेच्या शेकडो जमाती धावतापळता शेवटी या देशात स्थिर झाल्या आहेत. मागल्या काळचे त्यांचे संबंध मोठे अभिनंदनीय होते असे नाही. तशी अपेक्षा करणे चूकच आहे. तेव्हा अशा स्थितीत मागल्या इतिहासाचे संशोधन करण्यास कसलाच प्रत्यवाय नसला तरी आज त्या इतिहासाकडे कोणत्या दृष्टीने पाहावयाचे आहे, याविषयी आपले धोरण ठरलेले नसेल तर त्या संशोधना तूनच दुरीभाव निर्माण होण्याचा संभव आहे. आपल्याला एक-राष्ट्र घडवावयाचे आहे या दृष्टीने त्या प्राचीन काळच्या घटनांकडे आपण पाहिले पाहिजे. अर्थात एक-राष्ट्र घडवावयाचे आहे असे ठरले असले तर!

### प्रथम प्रतिज्ञा केली पाहिजे

मागे सांगितल्याप्रमाणे आपला हिंदी समाज धर्मभेद, जातिभेद, वर्णभेद इ. अनंत भेदांनी, जगात असतील-नसतील त्या भेदांनी जर्जर झालेला आहे. पण वर सांगितल्याप्रमाणे जगातल्या घडामोडी आपण पाहिल्या व समाजाला अत्यंत प्रतिकूल परिस्थिती तरी संपूर्णत जीवन क्रमे निर्माण करता येते हे लक्षात घेतले तर हे सर्व भेद आरणांत विनाळून टाकता येतील आणि समाजात ऐक्य पोषक कारणे नसतील तर ती निर्मिता येतील. ही संपन्न विद्या हस्तगत करून ब्रिटिश लोकांनी

इंग्लंडने प्रथम राष्ट्र घडवावयाचे आहे ही प्रतिज्ञा केली आणि मग पाऊल उचलले त्याबरोबर इंग्लिशांना आपल्या समाजाच्या सर्व थरांत साम्य, ऐक्यभाव, अभेद, हेच दिसू लागले आपण भारतीयांनी तीच प्रतिज्ञा करून पाऊल उचलले तर? पण ती प्रतिज्ञा प्रथम केली पाहिजे.

* * *

# टीपा

## पृष्ठ १-स्वागतमंडळातर्फे विनंती

१९२७ साली सातारा येथे प्रांतिक सामाजिक परिषद भरली होती. महर्षि शिंदे तिचे अध्यक्ष होते. त्यांच्या त्या वेळच्या भाषणातून प्रस्तुत निबंध संकलित करण्यात आला आहे. त्या परिषदेच्या स्वागतमंडळास अनुलक्षून हे विधान केले गेले आहे. ( मूळ भाषणासाठी पाहा—शिंदे लेखसंग्रह, १९६३; पृ. २६४-२७४. )

## पृष्ठ ८-वायकोम येथे घडलेला प्रकार

त्रावणकोर संस्थानातील वा ( व्हा ) यकोम या गावातील देवळातच नव्हे तर देवळात जाण्यायेण्याच्या वाटेवरही जाण्यास प्रतिष्ठित, पण अस्पृश्य मानल्या गेलेल्या, ब्राह्मसमाजवादी लोकांना जाण्यास कायदेशीर मनाई होती. ख्रिस्ती, मुसलमान वगैरे परधर्मीयांना मात्र मनाई नव्हती, इतकेच नव्हे तर देवळाच्या मंडपातही त्यांना नेण्यात येत असे. हा अन्याय नष्ट करावा या हेतूने १९२४ साली वायकोम येथे सत्याग्रह झाला. पण तो निष्फळ ठरला कारण कोचीन-त्रावणकोर या दोन हिंदु संस्थानांचा त्यास कट्टर विरोध होता आणि ब्रिटिश सरकार या प्रकाराकडे लक्ष देत नव्हते. यामुळे हिंदु अस्पृश्यांवरील अन्याय कायमच राहिला. ( महर्षि शिंदेलिखित 'माझ्या आठवणी व अनुभव' या ग्रंथाच्या आधारे. उक्त ग्रंथ, पृष्ठ ३७४. )

## पृष्ठ ९-सत्यशोधक समाज. .भिक्षुकवर्गाविरुद्ध असे.

१८७६ साली सत्यशोधक समाजाचा ( पहिल्या तीन वर्षांचा ) जो रिपोर्ट प्रसिद्ध झाला त्यातील पुढील उतारा प्रस्तुत संदर्भात उद्बोधक ठरावा—

"ब्राह्मण, भट, जोशी, उपाध्ये इत्यादि लोकांच्या दास्यत्वापासून शूद्र लोकांस मुक्त करण्याकरिता व आपल्या मतलबी ग्रंथाच्या आधारे आज हजारो वर्षे ते शूद्रास नीच मानून नागवीत लुटीत आहेत, याजकरिता सदुपदेश व विद्या

द्वारे त्यास त्याचे धार्मिक अधिकार समजून देण्याकरिता म्हणजे धर्म व व्यवहारासंबंधी ब्राह्मणांचे वर्चस्व व कार्यबाधक प्रथापासून त्यास मुक्त करण्या करिता काही गृहस्थ मंडळींनी हा समाज २४–९–१८७३ रोजी स्थापन केला.'
(पाये–टिम्बरलिखित 'आजकालचा महाराष्ट्र' वरून, पृ. १०६.)

**पृष्ठ १३–या साहित्यसंमेलनाच्या–**

१९३० साली इंग्लंड येथे महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचे जे अधिवेशन भरले झाले त्यात 'तत्त्वज्ञान व समाजशास्त्र' या विषयाचे एक शाखासंमेलन भर विण्यात आले होते. त्याचे अध्यक्ष महर्षि शिंदे हे होते. त्यांच्या त्या वेळच्या भाषणातून प्रस्तुत निबंध संकलित करण्यात आला आहे. (मूळ भाषणासाठी पाहा–शिंदे–लेखसंग्रह, १९६३, पृ. १०८–१२२.)

**पृष्ठ १८—परमहंस मंडळीची स्थापना–**

अ. का. प्रियोळकर यांच्या मताने १८४९ साली परमहंस सभेची पद्धतशीर प्राणप्रतिष्ठा झाली असावी. (दादोबा पांडुरंग–चरित्र, पृ. २०१.) जातिभेद मोडावा, पुनर्विवाह प्रचलित करावा व मूर्तिपूजा बंद करावी या त्रिविध हेतूं या सभेची स्थापना करण्यात आली. सभेची सभासदसंख्या वाढेपर्यंत गुप्तपणे कार्य करावे असे ठरविले गेले होते, पण सभासद न वाढल्यामुळे व असलेल्या सभासदांची नावे प्रसिद्ध झाल्यामुळे जातिभयाने १८६० साली ही सभा मोडण्यात आली.

**पृष्ठ १८–प्रार्थनासमाजाच्या रूपाने पुन्हा अवतरली–**

परमहंससभेत असलेली पुष्कळशी मंडळी उत्पन्नाने नवा पथ निघाल्यास त्यात भाग घेण्यास उत्सुक होती. शेवटी ३१ ३ १८६७ मध्ये प्रार्थनासमाजाची प्रस्थापना करण्यात आली. परमेश्वर एक आहे, त्याला आवडणारी सत्क्रिया आचरणे हीच त्याची खरी पूजा होय, मूर्तीची पूजा परमेश्वरप्राप्त्यर्थ उचित नाही, सर्व माणसे परमेश्वराचीच लेकरं असल्यामुळे आपसात समबुद्धीने, बंधुभावाने वागणे हे प्रत्येक माणसाचे कर्तव्य आहे असे प्रार्थनासमाजाच्या तत्त्वांचे स्थूल स्वरूप होते. (प्रा न र. फाटककृत न्या. रानडे चरित्र, पृ. १६६.)

### पृष्ठ २१–' बदलापूर ' ( आमचा गाव ) हे पुस्तक–

या ग्रंथात, पुणे-मुंबई-मार्गावरील ( मुंबईपासून ४२ मैलांवर असलेल्या ) बदलापूर नावाच्या गावाची आर्थिक, सामाजिक, धार्मिक व ऐतिहासिक पाहणी आहे. २३०० लोकसंख्या असलेल्या या गावांतील २८ भिन्न पोटजातींचा अभ्यास त्यात समोर ठेवला आहे.

### पृष्ठ २७–' आपले सामर्थ्य आपण वाढवावे. '

नाशिक जिल्ह्यामधील चांदवड तालुक्यातील शेतकऱ्यांची परिषद वडनेर येथे १९ सप्टेंबर १९३१ रोजी भरली होती. महर्षि शिंदे या परिषदेचे अध्यक्ष होते. त्यांच्या त्या वेळच्या भाषणातून प्रस्तुत निबंध संकलित करण्यात आला आहे. ( मूळ भाषणासाठी पाहा–शिंदे लेखसंग्रह, १९६३; पृ. २९७-३०४. )

### पृष्ठ ३२–२॥ रु. = १ डॉलर.

१९३१ साली डॉलरचा हा भाव होता. आज तो, ४·७६ रु. = १ डॉलर असा आहे.

### पृष्ठ ३५–' राजकारण हे परमेश्वरी कर्तव्य ! '

' जोसेफ मॅझिनी–आत्मचरित्र आणि राजकारण ' या पुस्तकास स्वातंत्र्य-वीर सावरकर यांनी जी प्रस्तावना लिहिली आहे तिच्यातून ( पृ. १–२६ ) प्रस्तुत निबंध संकलित करण्यात आला आहे.

### पृष्ठ ३६–मॅझिनीशिवाय... कोणता गुरु सापडणार आहे ?

मॅझिनी, ( गिउसेप )–( १८०५-१८७२ ) इटालियन देशभक्त व ग्रंथकार. याचा जन्म जिनोवा येथे झाला; तेथेच त्याचे विश्वविद्यालयीन शिक्षण झाले. २१ व्या वर्षी वकील म्हणून व्यवसाय सुरू केला. पण मातृभूमीच्या स्वातंत्र्या-साठी त्याने जी राजकीय चळवळ केली तेच त्याचे खरे जीवितकार्य. हे कार्य करीत असताना ऑस्ट्रियन सत्ताधाऱ्यांच्या रोषाला बळी पडून १८३० साली त्याला मातृभूमीतून हद्दपार व्हावे लागले. तेव्हा त्याने मार्सेल्स येथे जाऊन ' तरुण इटली ' या संस्थेची स्थापना केली. १८३२ मध्ये फ्रेंच सत्ताधाऱ्यांनी त्याला फ्रान्समधून तडीपार केले. १८३७ साली लंडन येथे जाऊन इंग्लिश

राष्ट्राची सहानुभूती मिळविण्याचा प्रयत्न त्याने केला. १८५९-६० मध्ये काव्हूर व गॅरिबाल्डी यानाही त्याने साह्य केले. याप्रमाणे ज्वळज्वळ चाळीस वर्षे, युरोपात राजकीय असंतोष व स्वातंत्र्योर्मि पसरविण्याकरिता त्याने अविश्रांत कार्य केले. याचे फळ ( स्वातंत्र्य, ऐक्य ) त्याच्या देशाला मिळालेले पाहण्याचे भाग्य मृत्यूपूर्वी त्याला लाभले. मॅझिनीची उदात्त स्वातंत्र्यप्रीति, त्याची अपूर्व कामगिरी याची अधिक माहिती मिळविण्यासाठी मॅझिनीने लिहिलेले स्फूर्तिदायक आत्मचरित्र पाहावे. 'आत्मचरित्र व राजकीय तत्त्वज्ञान' याशिवाय मॅझिनीचे–' Duties of Man ', ' Thoughts upon Democracy in Europe ', ' Select Essays ' इत्यादि अन्य ग्रंथही प्रसिद्ध आहेत. ( ' सुलभ विश्वकोश ' भाग ५ वा, पृ. १९४९-१९५० च्या आधारे. ) ( अधिक माहितीसाठी शिरालूनी स. आ. जोगळेकर लिखित मॅझिनी-चरित्र पाहावे. )

## पृष्ठ ४३–' तरुण इटली '—

' कारबोनेरी ' नामक गुप्तमंडळीत शिरून मॅझिनीने आपल्या सार्वजनिक कार्यास प्रारंभ केला. पुढे राजकीय व धार्मिक सुधारणा करण्याच्या हेतूने त्याने नवीन गुप्त मंडळी काढण्याचे ठरविले. पण १८३० साली हद्दपार व्हावे लागल्याने ही मंडळी एकदम काढता आली नाही. फ्रान्समध्ये एकांत वासात राहून त्याने पुढील कार्याची योजना केली व मार्सेल्स येथे ' तरुण इटली 'ची स्थापना केली. ( सन १८३१ ) पुढे ' तरुण युरोप ' या नावाची संघटनाही त्याने निर्माण केली. गुप्त संघटनाच्या साह्याने, त्याच्या गुप्त वर्तमान पत्राच्या साह्याने राजकीय असंतोष निर्माण करण्याकडे मॅझिनीचा भर होता. यातूनच मॅझिनीस अनेक अनुयायी लाभले. याच्या क्रांतिकारक चळवळीतूनच पुढे १८७० मध्ये इटलीच्या पूर्ण स्वातंत्र्याचा जन्म झाला. [ अधिक माहितीसाठी ' महाराष्ट्रीय ज्ञानकोश ' विभाग ८ वा ( पृ. ८० ८४ ) पाहा. ]

## पृष्ठ ४८–' हिंदुराष्ट्राच्या अपकर्षाचे मूळ '

सावरकरांच्या ' जात्युच्छेदक निबंध ' या पुस्तकातील पहिल्या लेखावरून ( पृ० १–११ ) प्रस्तुत निबंध घेण्यात आला आहे.

पृष्ठ ५२–हिंदु व्यापाऱ्यांनी...वसविलेली नगरे

१० व्या, ११ व्या शतकात भारतीय संस्कृतीची वाढ भारताच्या भूसीमेत होत असतानाच भारतीयांचा संबंध व्यापाराच्या निमित्ताने बाह्य जगाशी आला. मलाया, सुमात्रा, जावा, बोर्निओ, चंपा ( कंबोडियाच्या पूर्वेकडील प्रदेश ), फूनान, कंबोडिया, सयाम इत्यादि आग्नेय आशियातील अनेक प्रदेशात भारतीयांनी प्रवेश केला आणि पूर्वीच वेगवेगळ्या कारणासाठी स्थापिण्यात आलेल्या भारतीय वसाहतींत वाढ केली. काही वसाहतींवर भारतीयांचे राजकीय वर्चस्व होते; पण सांस्कृतिक वर्चस्व मात्र सर्वच वसाहतींवर होते. [ गायधनी–राहूरकरलिखित 'प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास'च्या आधारे (प्रक. २३.) ]

पृष्ठ ५८–' मंत्रबळ नव्हे, यंत्रबळ ' ]

' सावरकर-साहित्य '–भाग २ रा, यातून (पृ. ४४–६१) हा निबंध घेतला आहे.

पृष्ठ ६५–दोनशे वर्षांच्या आगेमागे युरोपचा देवभोळेपणा हटत चालला.

वैज्ञानिक संशोधनास आवश्यक असणारे विचारस्वातंत्र्य व बुद्धिस्वातंत्र्य तमोयुगाच्या हजार वर्षांत ( शतक ३ रे–शतक १३ वे ) नष्ट झाले होते. धर्म-वर्चस्व, शब्दप्रामाण्य याचा हा परिणाम होता. तेराव्या शतकात अलबर्ट मॅग्नस, थॉमस ॲक्विनस, रॉजर बेकन इत्यादि पंडितांनी नवे विचार मांडून वादविवादास प्रारंभ केला. या विचारावर धर्मवेत्त्यांकडून आघात झाले नाहीत असे नाही. पण हळूहळू परंपरा तोडणाऱ्या संशोधकांची – कोपर्निकस, टायको ब्राही, केप्लर, गॅलिलिओ, ब्रूनो, न्यूटन, डार्विन यांच्यासारख्या संशोधकांची – परंपराच पुढे निर्माण झाली. यामुळे १४ व्या शतकानंतरच्या युरोपचे पुनरुज्जीवन झाले. शास्त्र, साहित्य, कला यांच्या क्षेत्रात नवनवे उन्मेष प्रकट होऊ लागले. स्वतंत्र मानवी प्रज्ञेचा व प्रतिभेचा आविष्कार होऊ लागला. यामुळेच युरोपचे सामर्थ्य वाढीस लागले. [ डॉ. प्र. न. जोशीलिखित 'विज्ञान–उदय व विकास' (प्र. ६–९) च्या आधारे. ]

**पृष्ठ ७३–' पारमार्थिकांनी केलेला रामदासाचा पराभव ! '**

प्रा० माटे यांच्या ' साहित्यधारा ' या पुस्तकातून ( पृ. १६३–१७६ ) प्रस्तुत निबंध घेतला आहे.

**पृष्ठ ७९–रामदासाने राजकारण केले की नाही...**

रामदासाच्या कार्यांचा विचार अनेकांनी अनेक दृष्टींनी केला आहे. राजवाडे, न. र. फाटक, श. श्री. देव, स. ज. भागवत, ग. वा. सरदार इत्यादि अनेकांनी रामदासावर उलट सुलट चर्चा केली आहे. या चर्चेत कधी रामदासाच्या प्रतिपादनातून खोल अर्थ काढण्यात आला आहे, तर कधी खोल अर्थ असलेले प्रतिपादन उथळ समजले गेले आहे, कधी रामदास पुरोगामी राजकारणी ठरले आहेत, तर कधी प्रतिगामी विचारसरणीचे ठरले आहेत. याचा अर्थ असा की रामदास हे एक विवाद्य प्रकरण आहे. प्रा. माटे यांच्या रामदासविषयक लेखनामुळे या विवादतेत अधिकच भर पडली आहे. स्वामींचे ' प्रपंचविज्ञान ' माटे आग्रहाने ठळठळीत स्वरूपात मांडतात ( 'रामदासांचे प्रपंचविज्ञान ' हे त्यांचे पुस्तक पाहावे,) तर ता त्यांच्या विचारसरणीचा गाभा नसून परमार्थ हाच त्यांच्या बोधाचा आत्मा होय असे डॉ. श. गो. तुळपुळे मानतात एवढेच नव्हे तर टीकाकारांनी घडविलेली दासांची दर्शने अपुरी, एकांगी व असमाधानकारक असल्याचे ते दाखवून सांगतात. असा हा मतांचा गलबला आहे. [ अधिक माहितीसाठी ' रामदास आणि त्यांचे टीकाकार ' हा डॉ. तुळपुळे यांचा लेख पाहावा—' भक्तीचा मळा ' या संग्रहात–पृ. ८५–१०५ ]

**पृष्ठ ८३–' शोषणाचा जाच '**

प्रा. माटे यांच्या ' विचारमंडन ' या निबंधसंग्रहातून (पृ १४४–१५२) हा निबंध घेतला आहे.

**पृष्ठ ८६–हा निग्रोंचा प्रश्न त्यांना डोईजड झाला आहे.**

निग्रोंचा हा प्रश्न अजूनही बाकी आहेच आणि जोपर्यंत त्यांना अमेरिकन समाजातील एक सन्माननीय घटक म्हणून मान्यता मिळणार नाही तोपर्यंत तो

कायमच राहणार हे उघड आहे. ' निग्रोंना न्याय मिळाला नाही तर अमेरिकन रक्ताच्या नद्या वाहतील यासारख्या अगदी अलीकडच्या भडक घोषणावरून, वसाहतवादाप्रमाणेच वर्णभेदाचा विचार करण्यासाठी संयुक्त राष्ट्र संघाच्या सुरक्षासमितीच्या बैठकीच्या नुकत्याच केल्या गेलेल्या मागणीवरून, ' अमेरिकेत निग्रोंचा समानतेसाठी लढा ' ( केसरी–२६–६–६३ ) ' अमेरिकेमधील निग्रोंची समस्या–' ( केसरी १२–७–६३ ) यासारख्या लेखावरून निग्रोंचा प्रश्न हा अजूनही डोकेदुखीचाच कसा ठरत आहे याचा प्रत्यय येतो.

## पृष्ठ ८८–डॉ मालनचे भाषण

१९३० पासून दक्षिण आफ्रिकमध्ये गौर व गौरेतर रहिवाशांत चाललेला संघर्ष डॉ मालन सत्तारूढ झाल्यावर अधिक तीव्र झाला. औद्योगीकरण हे त्याचे एक कारण, तर डॉ. मालन सरकारने केलेले Mixed Marriage Act, Population Act सारखे गौरेतर स्वातन्त्र्यनियन्त्रक कायदे हे दुसरे कारण. या दोन कारणानी गौरतराची सामाजिक व राजकीय अशा उभयविध क्षेत्रात फार मोठ्या प्रमाणावर मुस्कटदाबी होत होती. ज्यू ती पक्की करण्यासाठी **१९५१ साली मालन सरकारने ' सेपरेट रिप्रेझेंटेशन ऑफ व्होटर्स ॲक्ट ' हा नवा जालिम कायदा पास केला** या कायद्यान्वये केप कार्लनीतील गौरेतराच्या स्वतंत्र याद्या करण्याचे ठरले व त्याना प्रतिनिधित्व अगदी कमी देऊन त्यांच्या स्वातन्त्र्यावर गदा आणण्याचा निर्धार झाला. याविरुद्ध झालेल्या सुप्रीम कोर्टातील खटल्यात मालन सरकारचा पराभव झाला तरी गौर लोकांचे वर्चस्व गौरेतरावर ठेवण्याची पराकाष्ठा मालन सरकारने केली. वंशअभिमानी मालन व गौरेतर लोक यांच्यातील वाद यामुळे विकोपास गेला–इतका की, यातून द. आफ्रिकन नागरिकांचा वणवा भडकेल असे भाकीत जॉन फॉस्टर डलेसने केले. ( केसरी–६ ४ २ व १४ १२ ५२ च्या आधारे. )

## पृष्ठ ९२–' गिरीजन आणि परिजन '

प्रा. माटे यांच्या ' विचक्षण्य ' या पुस्तकातून ( पृ ९३–१०६ ) हा निबंध घेतला आहे

## पृष्ठ ९७–मिशनऱ्यांच्या प्रयत्नांकडे उंच अर्थाने पाहावयास शिकले पाहिजे

मिशनऱ्यांच्या सेवाकार्यांमुळे पाश्चात्यात धर्माला सामाजिक अर्थ प्राप्त झाला, यामुळे पाश्चात्त्यांना अलोट सामर्थ्य लाभले. जुन्या काळात आपल्याकडे धर्माला सामाजिक अर्थ प्राप्त झाला नाही म्हणून आपण दुबळे झालो. इंग्रजांचे आगमन भारतात झाल्यावर परिस्थिति थोडी पालटली, धर्माला सामाजिक अर्थ देण्याचे प्रयत्न केले गेले, पण ते थिटे पडले, तरुणांना आकृष्ट करू शकणारा धर्मच येथे उदयास आला नाही. आणि आता तर निधर्मीपणाच्या नावाखाली आपण धर्मशून्य झालो आहो, याचाच परिणाम म्हणून राष्ट्राला घोर अवकळा येत चालली आहे. ही आपत्ति टाळावयाची असेल तर धर्माला विशाल अर्थ देणे अवश्य आहे, व्यापक अर्थाच्या धर्माचा नंदादीप तरुणांच्या चित्तात सतत तेवत ठेवणे अवश्य आहे, या आशयाचे विवेचन प्रा. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांनी **'वैयक्तिक पुण्य व सामाजिक पुण्य'** या लेखात केले आहे. डॉ. सहस्रबुद्धे यांनी सांगितलेला हा अर्थच प्रस्तुत विधान करताना प्रा. माटे यांच्या मनात असावा. या अर्थाच्या सविस्तर विवरणासाठी–विवेचनासाठी डॉ. सहस्रबुद्धे यांचा लेख वाचावा–('वैयक्तिक आणि सामाजिक' हा त्यांचा निबंधसंग्रह पाहा.)

## पृष्ठ १०६–'धर्माची रेशमी कादणी'

हा निबंध प्रा. कल्लकरांच्या 'उद्याची संस्कृति' या ग्रंथातून (पृ. ९३–११०) संपादन करून घेतला आहे.

## पृष्ठ ११२–नवयुगधर्मकाराच्या शब्दात

पनवेलचे स. कृ. फडके, वकील, यांनी ब्राह्मसमाज, देवसमाज, आर्यसमाज, थिऑसफिस्ट समाज, सत्यसमाज इत्यादि समाजांच्या धर्ममतांचे विवेचन करण्यासाठी प्रचंड यत्नांचा संकल्प करून १९०७ साली 'नवयुग-धर्म' (ब्रह्मसमाज व देवसमाज खंड) नावाचा नऊशे पृष्ठांचा ग्रंथ प्रसिद्ध केला. त्यात त्या धर्मांचा विस्तृत ऊहापोह केला आहे. या ग्रंथातील अवतरण प्रस्तुत संदर्भात प्रा. केळकरांनी दिले आहे.

## पृष्ठ १२२–' विचारदौर्बल्याचे शेवाळे '

' संस्कृतिसंगम ' या प्रा केळकराच्या ग्रंथाच्या तिसऱ्या आवृत्तीतून (पृ ३६३–३९२) संपादन करून सदर निबंध घेतला आहे

## पृष्ठ १२७—होमरचे काव्य याचे टीकाशास्त्राचा इतिहासकार वर्णन करतो

History of Criticism चा कर्ता सेन्ट्सबरी हा येथ अभिप्रेत आहे आपल्या समीक्षेतिहासाच्या पहिल्या खंडात तो लिहितो—

" In Scholia on Homer we have thrice, nay thirty times decocted of the critical study of generations, centuries, millenia We have comment on comment of annotated annotation '

## पृष्ठ १३७–' विज्ञानाची उपासना '

प्रा केळकराच्या ' संस्कृति आणि विज्ञान ' या ग्रंथातून (पृ १ १८) संपादन करून हा निबंध घतला आहे

## पृष्ठ १३८–जपानी खलाशास जन्मभर आठवण

१ मार्च १९५४ रोजी अमेरिकेने पॅसिफिक महासागरात मार्शल बेटावर हैड्रोजन बॉम्बचा स्फोट घला हा स्फोट झाला तव्हा Fukuryu Maru या नावाचे एक जपानी जहाज बिकिनीपासून ८० मैलावर म्हणजे ' धास्याच्या टापू 'च्या सूपच बाहेर, मासमारी करीत होते स्फोट झाल्यावर १॥ तासा नतर जवळजवळ २ तासपयत जहाजावर रेडिओअक्टिव्ह धुळीचा व राखेचा वर्षाव झाला यामुळे जहाजावरील २३ खलाशाच्या अंगाचा दाह होऊ लागला, त्याच्या मानडीवर चट्टे, फोड उठू लागले या सवाना हास्पिटलची वाट धरावी लागली [ Keesing s Contemporary Archives 1952 1954 page–13485 A च्या आधारे ]

## पृष्ठ १४७–' शिरजभर्तीचे क्रांतिकार्य '

डॉ पु ग सहस्रबुद्धे याच्या ' वैयक्तिक आणि सामाजिक ' या निबंध संग्रहात हा निबंध संकलित करून घतला आहे

**पृष्ठ १५३-व्यापक, समावेशक महाराष्ट्रधर्माची प्रस्थापना-**

शिवछत्रपतींनी ज्या महाराष्ट्रधर्माची प्रस्थापना केली त्याचे सन्मय तात्विक प्रतिपादन समर्थ रामदासांनी केले होते. ' देव मस्तकी धरावा । अवघा हलकल्लोळ करावा । मुलुख बडवा का बुडवावा । धर्मसंस्थापनेसाठी ॥ ' यात रामदासांनी ज्या धर्मस्थापनेचा उल्लेख केला आहे तो महाराष्ट्रधर्म होय त्यांनीच अन्यत्र म्हटले आहे की, ' मराठी तितुका मेळवावा । आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा । येविषयी न करिता तकवा । पूर्वज हासती ॥ ' यावरून धर्म असे रामदास म्हणतात तेव्हा त्यांना महाराष्ट्रधर्म हाच अभिप्रेत असतो असे म्हणता येते. समर्थांनी ज्या महाराष्ट्रधर्माचे पुनरुज्जीवन केले त्याचे विवरण करिताना इतिहासाचार्य राजवाडे यांनी जे लिहिले आहे ( राजवाडे लेखसंग्रह, भाग १ ला ) ते या संदर्भात लक्षात घेण्याजोगे आहे. " समर्थांनी ज्याला महाराष्ट्रधर्म म्हणून संज्ञा दिली तो केवळ हिंदुधर्मच नव्हे. महाराष्ट्रधर्मात स्वराज्यस्थापनेचा व गोब्राह्मणप्रतिपालनाचाही अंतर्भाव होतो हिंदुधर्म, स्वराज्य व गोब्राह्मणप्रतिपालन ह्या तीन गोष्टींची स्थापना करावयाची म्हणजे म्हणजे राष्ट्रांतील लोकांची एकी झाली पाहिजे व त्या एकीचा पुरस्कार करण्यास कर्त्या लोकांनी सरसावले पाहिजे. हीही गोष्ट त्या वेळच्या मराठ्यांच्या संपूर्ण ध्यानात आली होती. मराठ्यांखेरीज हिंदुस्थानातील इतर लोकांच्या ध्यानात ही गोष्ट अगदीच आली नव्हती असे नाही परंतु ही कल्पना सिद्ध करून दाखविण्यास जी तडफ, जो निश्चय, जी जूट, जे पुढारपण लागते त्याचे अस्तित्व ह्या लोकांच्या ठायी होते असे दिसत नाही सुदैवाने ह्या गुणाचे अस्तित्व त्या काळी मराठ्यांच्या अंगी होते व म्हणूनच त्यांच्या हातून स्वराज्याची स्थापना होऊन हिंदुधर्माचे व गोब्राह्मणाचे प्रतिपालन झाले " याप्रमाणे समर्थांनी ज्या महाराष्ट्रधर्माचे पुनरुज्जीवन करून प्रतिपादन केले त्याची प्रस्थापना मराठ्यांना शिवछत्रपतींच्या नेतृत्वा खाली केली. ( जिज्ञासूंनी ' महाराष्ट्रधर्मा ' विषयीच्या अधिक विवेचनासाठी राजवाडे लेखसंग्रह, भाग १ ला, यातील सहाव्या खंडाची प्रस्तावना वाचावी )

**पृष्ठ १६२-' ते समाजाला विचारा '**

डॉ. पु ग. सहस्रबुद्धे यांच्या 'वैचारिक आणि सामाजिक' या निबंधसंग्रहा-

तून हा निबंध संपादन करून घेतला आहे.

**पृष्ठ १७२–ते अपश्रेय ब्राह्मणांचे आहे.**

ब्राह्मणेतरांची ही विचारसरणी चुकीची व घातक कशी आहे याचे सविस्तर विवेचन डॉ. सहस्रबुद्धे यांनीच आपल्या 'भारतीय लोकसत्ता' या ग्रंथात (प्रक. १२) केले आहे.

**पृष्ठ १७४–परिस्थितिवाद स्वीकारला की....अवकळा येऊ लागते.**

तरुण विद्यार्थ्यांनी हे ध्यानात घेणे अधिक अवश्य आहे. विद्यार्थ्यांची वृत्ती अलीकडे अधोगामी होत असे कोणी म्हटले की या अधोगामित्वाचे मूळ परिस्थितीत आहे असे सांगून ते क्षम्य ठरविण्याचा यत्न केला जातो आणि विद्यार्थ्यांना तो प्रिय होतो. राष्ट्राच्या आधारस्तंभांनी असे करणे, आत्म-स्वातंत्र्य गमावणे व त्यात समाधान मानणे हे चांगले लक्षण नाही. ते भावी अनर्थाचे पूर्वचिन्ह होय. डॉ सहस्रबुद्धे यांनीच '**कोसो नदीचे स्वयंशासन**' हा लेख लिहून विद्यार्थ्यांना ही जाणीव करून देण्याचा प्रयत्न अन्यत्र (राज-विद्या–पृ. ५८) केला आहे. त्यांचे तेथील म्हणणे या संदर्भात लक्षात घेण्या-जोगे आहे. "पण विद्यार्थ्यांनी हे ध्यानी घ्यावे की, असली (परिस्थिति-वादी) मीमांसा मान्य करणे हा पराकाष्ठेचा अधःपात आहे. आपल्या अप-यशाची, र्‍हासाची जबाबदारी जे दुसऱ्यांवर टाकतात...त्यांचा उत्कर्ष कधीच होत नाही. आपला अकर्ष दुसऱ्यामुळे झाला–हे समाधान म्हणजे मृत्यूला आमंत्रणच होय." विद्यार्थ्यांनी उपर्युक्त निबंध मुळातूनच वाचून योग्य तो बोध घेणे अवश्य आहे.

**पृष्ठ १८०–'संघटित जीवनाचा महामंत्र'**

डॉ. सहस्रबुद्धे यांच्या 'राजविद्या' या निबंधसंग्रहातून (पृ. ९८–११५) हा निबंध घेतला आहे.

**पृष्ठ १९२–असा लोकांचा कृतनिश्चय असला पाहिजे.**

मानवाच्या विवेकाला, त्याच्या निष्ठेला अपरंपार महत्त्व आहे हे महा-भारतकारांपासून पंडित जवाहरलाल नेहरूंपर्यंत अनेकांनी सांगितले आहे. महा-

भारतकार म्हणतात–' यत्र दुर्गांन नरदुर्ग हा सर्वांत दुर्भेद्य दुर्ग होय ' महाभारत शांतिपर्व ३५ | ५५ अ. ) ( हे दुर्भेद्य नरदुर्ग हाच राष्ट्राचा खरा आधार होय. ते भेदनीतील वश झाले, त्याची निष्ठा ढळली, त्याचा विवेक सुटला वा दगडाचे किल्ले काहीच करू शकत नाहीत जोपर्यंत नरदुर्ग शाबूत तोपर्यंत हे दगडाचे किल्ले मजबूत, म्हणून नरदुर्ग सर्वांत श्रेष्ठ असे महाभारतकाराना सांगितले आहे. ) पंडितजी लिहितात–" . पण अंतिम यशापयश हे मानवावरच अवलंबून असते. इतिहास हा मानवाने घडविला आहे. आणि मानव जातीची प्रगती झाली ती मानवाच्या कर्तृत्वामुळे झाली आहे. शिक्षणाने संस्काराने भारतात जर इष्ट ती मानवमूर्ता आपण घडवू शकलो तर बाकीचे कार्य अत्यंत सुसाध्य आहे. " ( 'कुरुक्षेत्र'–खास अंक, २ १० १९.३ ) डॉ. सहस्रबुद्धे यानीही ' भारतीय लोकसत्ता ' ( प्रक. १५ ), ' लोकसत्तेचे उद्धसतेला आव्हान ) ( प्रक. ४ ६ ) या आपल्या ग्रंथात ' मानव घटने'चे विवेचन याच दृष्टीने केले आहे. प्रस्तुत निबंधाचा विशेष हा की यात **मानवघटनेचे महत्त्व** केवळ तात्त्विक विवेचन करून न दाखविता जगाच्या इतिहासातील ढळढळीत सत्ये डोळ्यापुढे ठेवून दाखविण्यात आले आहे.

## पृष्ठ १९६–चर्चिलने संघटनेचा महामंत्र जपला

चर्चिलच्या War Speeches ( 1940–1945 ) मधील पुढील उतारे या संदर्भात वाचण्याजोगे आहेत.

### ( 1 ) TO THE FRENCH PEOPLE

Frenchmen ! For more than thirty years in peace and war I have marched with you, and I am marching still along the same road  Here at home in England, under the fire of the Boche, we do not forget the ties and links that unit us to France  When good people get into trouble, because they are attacked and heavily smitten by the vile and wicked, they must be very careful not to get at loggerheads with one another  Frenchmen—rearm your spirits before it is too late Rember how Napoleon said before one of his battles  " These same Prussians who are

so boastful to-day were three to one at Jena, and six to one at Montmirail " Never will I belive that the soul of France is dead Never will I believe that her place amongst the greatest nations of the world has been lost for ever ! Therefore have hope and faith, for all will come right '

October 21, 1940

( War Speeches Page 35 37 )

## (2) TO THE PEOPLE OF YUGOSLAVIA

To the people of Yugoslavia to the Serbs, the Croats, and the Slovenes I send my greetings You have been wantonly attacked by a ruthless and barbarous aggressor Your capital has been bombed, your women and children brutally murdered Our cities in England too, have been bombed by the same insensate foe Our women and children have been murdered Our sympathy for you therefore is heartfelt, for we are sharing the same sufferings But as we have faith in our victory so we have faith in yours Your courage will shine out in the pages of history and will, too, reap a more immediate reward

You are making an heroic resistance against formidable odds, and in doing so you are proving true to your great traditions Serbs we know you You were our allies in the last War, and your arms are covered with glory

**Yugoslavs, you are fighting for those principles to day The British Empire is fighting with you However hard the fight, our victory is assured "**

Apri 13, 1941

( War Speeches Page 50 )

अशा रीतीने उत्तेजक, उत्साहवर्धक आवाहने करून चर्चिलने दोस्त राष्ट्रां तील शूर व जाम टिकविण्याचा आटोकाट प्रयत्न केला आणि त्यात त्याला यशही मिळाले

* * *

# निबंधकारांची माहिती

## १. महर्षि विठ्ठल रामजी शिंदे ( १८७३–१९४४ )

महर्षि अण्णासाहेब शिंदे यांनी आपल्या तपस्यामय आयुष्यात विकासाच्या नव्या वाटा दाखविण्याचें जें चिरस्मरणीय कार्य केलें त्या मार्यामागे धर्मप्रसार, समाजसुधारणा व संशोधन-तत्त्वचिंतन या तीन प्रबल प्रेरणा होत्या. या प्रेरणा परस्परभिन्न असल्या तरी महर्षि शिंदे यांच्या जीवनांत त्यांच्यांत एक-प्रकारचा समन्वय साधला गेला होता. पहिली प्रेरणा दुसऱ्या प्रेरणेचें अधिष्ठान व दुसरी प्रेरणा तिसऱ्या प्रेरणेचें अधिष्ठान असा आधार-आधेय स्वरूपाचा अन्योन्यसंबंध त्यांच्यात निर्माण झाला होता. समाजसुधारणेचा पुरस्कार-प्रचार हा प्राधान्याने विशाल धर्मबुद्धीने करावा आणि संशोधन–तत्त्वचिंतन हे प्रामुख्याने खोल समाजसुधारणेच्या दृष्टीने करावें अशी त्यांची प्रवृत्ति असल्या-मुळे त्या **तीन प्रेरणांत** स्वाभाविकपणेंच **एक चिवट अनुबंध** उत्पन्न झाला होता. ब्राह्मसमाज, प्रार्थनासमाज याचे निष्ठावंत प्रचारक म्हणून त्यांनी केलेलें कार्य, अस्पृश्यादिकांच्या उद्धाराच्या चळवळीचे अग्रणी या नात्याने त्यांनी केलेलें कार्य आणि चिकित्सक व्यासंगी अभ्यासकाच्या बैठकीवरून त्यांनी केलेलें कार्य हें लक्षांत घेतलें म्हणजे त्यामागील प्रेरणा त्यांच्या जीवनांत परस्पर-प्रेरक व परस्पर-पोषक कशा ठरल्या याची स्पष्ट कल्पना येते.

प्रेरणांतील समतोलाचें प्रतिबिंब महर्षि शिंदे यांच्या जीवनदृष्टींत व विचार-सरणींतहि दिसून येतें. वास्तववादी भूमिकेंतून, ऐतिहासिक पार्श्वभूमि लक्षांत घेऊन सूक्ष्म, तौलनिक अभ्यास करण्याची सवय त्यांच्या मनोबुद्धीना असल्यामुळे आणि परिणामीं अभ्यासविषयभूत प्रश्नाच्या अंगोपांगाचें त्यांना सम्यक् दर्शन त्यांना होत असल्यामुळे त्यांची **दृष्टि व्यापक** झाली होती व **विचारसरणी समावेशक** झाली होती. कोणत्याहि छोट्या समस्येचें निरीक्षण मोठ्या समस्यांच्या पृष्ठभूमीवर करणें आणि अल्पसंख्याकांच्या हिताहिताचा विचार बहुसंख्याकांच्या हिताहिताच्या संदर्भात करणें हें त्यांच्या जीवनदृष्टीचें व विचार-सरणीचें एक ठळक वैशिष्ट्य होय. याचें प्रत्यंतर व्हाल राजकारण व मवाळ

धर्माकारण यांतील वाद, अस्पृश्यविचार व राष्ट्रीय ऐक्य, महाराष्ट्राचा उत्कर्ष न मानाचा ( किंबहुना अखिल विश्वाचा ) उत्कर्ष याविषयींची त्यांची मत पाहिलीं असता, सहज येते. 'भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न', 'माझ्या आठवणी व माझे अनुभव' आणि 'शिंदे लेखसंग्रह' हीं तीन पुस्तकें या दृष्टीनें लक्षणीय आहेत.

या पुस्तकांतून त्यांच्या व्यापक दृष्टीचें व समावेशक विचारसरणीचें जसें प्रत्यंतर येतें, तसेंच त्यांच्या विचार प्रकटीकरणाच्या विशेषाचेंहि दर्शन घडतें. त्यांनीं आपले विचार विशिष्ट उंचीवरून गंभीरपणे व तळमळीनें व्यक्त केलेले असल्यामुळे त्यांत **भारदस्तपणा, संतुलितत्व, अनाग्रह व उत्कटता** यांचा प्रत्यय अधिक प्रमाणांत येतो. यामुळे मुळांतच मार्मिक, मूलगामी असलेले त्यांचे मार्गदर्शक विचार जास्तच प्रभावी वाटतात. त्यांची भाषा साधी असली तरी अगदी स्पष्ट असल्यामुळे त्यांच्या विचारांचा प्रभाव कमी होत नाही. प्रस्तुत संग्रहातील त्यांच्या निबंधांतूनहि हाच अनुभव येतो.

समाजसुधारणा यशस्वी कां होत नाही याची कारणमीमांसा करताना, सामाजिक सुधारणांविषयक आपली कल्पना एकांगी, अपुरी असल्यामुळे आपल्यांत सर्वसंग्राहकतेचा अभाव असल्यामुळे, अस्पृश्यता-ब्राह्मणब्राह्मणेतर वाद इत्यादि प्रश्नांकडे बृहत् हिंदुसमाजास जडलेल्या एकाच अंतर्गत रोगाचीं बाह्य लक्षणें म्हणून न पाहतां अलग अलग प्रश्न म्हणून आपण पाहत असल्यामुळे समाजसुधारणेस गति येत नाही, असें जें त्यांनीं सांगितलें आहे त्यावरून त्यांची दृष्टि व्यापक कशी होती व विचारसरणी समावेशक कशी होती हें कळून येतें. मराठीमधील तत्त्वज्ञानविषयक व समाजशास्त्रविषयक ग्रंथांचें समालोचन करून झाल्यावर पुढील अध्ययनाची दिशा दाखवितांना, निरनिराळ्या विषयांचें प्रायोगिक व वैज्ञानिक अध्ययन केल्यावर मगच तत्त्वज्ञानाच्या तार्किक भागावर ग्रंथरचना करणें योग्य, समाजशास्त्राच्या भावी अभ्यासूंनी वर्गाच्या बाहेर येऊन उपलब्ध असलेल्या सर्व सामग्रीचा विचार करावा, अशा ज्या सूचना केल्या आहेत त्यावरून त्यांची **दृष्टि सर्वस्पर्शी** कशी होती व त्यांच्या **विचाराचा पल्ला मोठा** कसा होता हे समजू शकतें. शेतकऱ्यांचे कार्य प्रामुख्याने अर्थकारण व समाजकारण यांच्या क्षेत्रांतलें असल्यामुळे व कॉंग्रेसचें कार्य प्राधान्याने राजकीय क्षेत्रांतलें असल्यामुळे शेतकऱ्यांनीं कॉंग्रेसवर अवलंबून राहू

नये आपला एक हात अर्थोत्पादनात व दुसरा हात अर्थविभाजनात गुंतवावा असा जो आदेश त्यांना नेतमंडळींना दिला आहे त्यावरून त्यांची दृष्टि अतर्भेदी होती व त्यांच्या विचारांची झेप फार दूरगामी होती याची कल्पना येते

याप्रमाणे महर्षि शिंदे यांची दृष्टी सर्वागदर्शी असल्यामुळे त्यांच्या चिंतनात सहिष्णुता आलेली दिसते तर त्यांची विचारसरणी वस्तूच्या विविध पैलूंचा परामर्ष घेणारी असल्यामुळे त्यांच्या लेखनात समजसपणा आलेला दिसतो अर्थात् यामुळे त्यांचे चिंतन पैल झालेले नाही किंवा त्यांचे लेखन गुळमुळीत झालेले नाही त्यांच्या चिंतनात दृढता आहे, त्यांच्या लेखनात धारदारपणा आहे तथापि त्यात आग्रह किंवा दुराग्रह आणि अवैध अतिक्रमण यांचा लवलेशही नाही शास्त्रकाराच्या निर्विकार अलिप्त बुद्धीतून त्यांच्या चिंतनाचा व लेखनाचा जन्म झालेला असल्यामुळे त्यात औदार्य व सुजाणपणा यांची प्रतीति येते सुधारकांतील धर्मविमुखतेवरील त्यांची टीका (पृ ४) ब्राह्मण व ब्राह्मणेतर या वादावरून त्यांना केलेल्या अपेक्षा, (पृ १०) समाजशास्त्रात जगद्गुरुत्वाची करणाऱ्यांना त्यांनी करून दिलेली जाणीव (पृ १९) कर्माभिमानावर भिस्त ठेवणें दुबळेपणाचे कसे आहे याचे त्यांनी केलेले स्पष्टीकरण (पृ २१) हे सगळें पाहिले असता निर्भीड टीकात्मक लेखनहि त्यांनी तोल सांभाळून, अभिनिवेश न बाळगता कसे केलें आहे हें समजते आणि त्यांच्यातील वैचारिक औदार्याचा व सुजाणपणाचा प्रत्यय येतो या दोन विशेषांमुळे त्यांच्या निबंधांना प्रौढत्व प्राप्त झाले आहे

महर्षि शिंदे यांचे निबंध प्रौढगंभीर असले तरी ते भावशून्य मात्र नाहीत त्यात भावविवशता नसली तरी उत्कट भावमयता आहे यात काहीच संशय नाही परंतु, पुष्कळसे पत्थर फोडल्यावर मग त्यांच्या पोटातून झुळझुळ वाहत येणाऱ्या झऱ्याचे दर्शन व्हावें त्याप्रमाणेच महर्षींच्या गंभीर निबंधातील भावनामयतेचा अनुभव येतो महाराष्ट्राच्या हितचिंतकांना त्यांनी केलेला उपदेश (पृ ९), तरुण अभ्यासकांना त्यांनी केलेली विनंती (पृ २६), ज्ञानकन्यांना त्यांनी केलेलें आवाहन (पृ ३३) यांचीं उदाहरणें या संदर्भात पुरेशी वाटतात. महर्षि शिंदे आपल्या भावनेच्या उमाळ्याचा अस्थानीं आविष्कार केलेला नसल्यामुळे त्यांचे लेखन हळवें झालेलें नाही त्याचप्रमाणे त्यांना अलंकाराचा सोस नसल्यामुळे तें भारावलेलें नाही 'मुक्या आवाज करणाऱ्या घरा',

'पर्जन्यविरहित वावटळ', 'अर्थगाड्याच्या बैलांची दिगदोरी' अशी कांहीं समर्पक उदाहरणें त्यांच्या निबंधांत आढळत असलीं तरी तीं अपवादात्मकच होत.

महर्षि शिंदे यांच्या निबंधांत भावनात्मकता आढळत असली व समर्पक उदाहरणें पेरलेली दिसत असली तरी त्यांचें **खरें बळ** त्यांत नसून प्रा. डॉ. धनंजयराव गाडगीळ यांनी ('शिंदे-लेख संग्रहा'च्या 'पुरस्कारां'त) उल्लेखिलेल्या **व्यापक दृष्टींत, प्रगल्भ विचारांत आणि सडेतोड; परंतु संयत टीका-पद्धतींत** आहे.

## २. स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर (जन्म १८८३)

स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या शरीरांतील रक्ताचा प्रत्येक बिंदु स्वातंत्र्या-साठीं सदैव उसळत राहिल्यामुळे त्यांनी आपल्या आयुष्याचा क्षणन् क्षण स्वातंत्र्ययज्ञाचें पौरोहित्य करण्यांत खर्च केला. स्वातंत्र्याच्या—सर्वांगीण स्वातंत्र्या-च्या, राजकीय स्वातंत्र्याच्या, सामाजिक स्वातंत्र्याच्या, धार्मिक स्वातंत्र्याच्या, बौद्धिक स्वातंत्र्याच्या, मानसिक स्वातंत्र्याच्या—या यज्ञाची सांगता यशस्वी रीतीनें पार पडावी यासाठीं अखंड मंत्रजागर करण्यांत त्यांनी आपल्या सर्व सामर्थ्यांचा व्यय केला. ज्या मंत्राचा उच्चार ते उच्चरवानें करीत राहिले ते **मंत्र उदात्त राष्ट्रनिष्ठेच्या 'गीतें'तील** जसे होते, **तसेच विज्ञानानें प्रचलित केलेल्या नव्या 'स्मृती'मधल्या कडव्या बुद्धिनिष्ठेच्या अध्यायांतीलहि** होते. या मंत्राचा घोष करतांना, स्वातंत्र्याच्या या यज्ञांतून समर्थ 'हिंदुराष्ट्रा'चें पसायदान देणारी स्वातंत्र्यदेवता आविर्भूत व्हावी अशी त्यांची उत्कट मनीषा होती. या इच्छेच्या पूर्तीसाठीं त्यांनी आपल्या विद्युल्लते-सारख्या तेजस्वी, चपल बुद्धीचा व समशेरीसारख्या तीक्ष्ण, लवलवत्या लेखणीचा अविरत उपयोग केला; आणि स्वोच्चारित मंत्रांचे निनाद प्रत्येक हिंदूच्या हृदयाच्या गाभाऱ्यांतून उमटावे म्हणून ते लिपिबद्ध करून प्रत्येका-पर्यंत पोहोचविण्याचा उद्योग आरंभिला. यांतूनच 'जोसेफ मॅझिनी,' 'सत्तावनचें स्वातंत्र्यसमर,' 'हिंदुत्व,' 'जात्युच्छेदक निबंध,' 'सहा सोनेरी पानें' यांसारखे त्यांचे ग्रंथ निर्माण झाले. यातील बहुतेक सर्व प्रतिपादन

स्वातंत्र्यनिष्ठा, विज्ञाननिष्ठा व हिंदुत्वनिष्ठा यांवर अधिष्ठित आहे. इतिहासाचें सूक्ष्म अध्ययन, वर्तमानाचें मर्मग्राही अवलोकन व मर्मभेदक चिंतन यांचें पाठबळ त्यास असल्यामुळे तें कमालीचें आवेशयुक्त, आक्रमक व ओजस्वी झालें आहे; आणि तें तन्मयतामूलक, वक्तृत्वगुणसंपन्न व नाट्यात्म असल्यामुळे पराकोटीचें प्रभावी, भावनोत्तेजक व विचारप्रस्फोटक झालें आहे. प्रस्तुत संग्रहांतील सावरकरांचें प्रतिपादनहि याला अपवाद नाही.

'राजकारण हें परमेश्वरी कर्तव्य', 'हिंदुराष्ट्राच्या अपकर्षाचें मूळ' व 'मंत्रबळ नव्हे, यंत्रबळ' या तीनहि निबंधांतील प्रतिपादनास स्वातंत्र्य-(राजकीय व सामाजिक स्वातंत्र्य) निष्ठा व विज्ञाननिष्ठा याचेंच अधिष्ठान आहे. मॅझिनीच्या उदात्त राजकीय तत्त्वज्ञानाचें व अचूक राष्ट्रीय शिक्षणाचें जें विवेचन पहिल्या निबंधात करण्यांत आलें आहे त्याला हिंदुराष्ट्राच्या अधःपाताची जी मीमांसा दुसऱ्या निबंधांत करण्यांत आली आहे तिला रसरशीत स्वातंत्र्यप्रेमाचा आधार आहे; तर, यंत्र हें विज्ञानाचें वरदानच कसे आहे याचें जें स्पष्टीकरण तिसऱ्या निबंधांत करण्यांत आलें आहे त्याला आग्रही शास्त्रप्रीतीचा आधार आहे. **रसरशीत स्वातंत्र्यप्रेम व आग्रही शास्त्रप्रीति यांच्या भक्कम पायावरच** सदर निबंधांतील विचार उभारलेले आहेत. 'हीं तत्त्वें केवळ इटलीकरिताच नाहीत' असें स्पष्ट सांगून केलेला राजकारणाला धर्म आहे व धर्माला राजकारण आहे, स्वातंत्र्य संपादन करणें व संरक्षण करणें हें आद्य परमेश्वरप्रणीत कर्तव्य होय,' 'दास्यमुक्तता–राष्ट्रैक्य–समता–लोकसत्ता हें तत्त्वचतुष्टय राष्ट्रोत्कर्षकारक आहे' यासारख्या सत्यांचा ऊहापोह लक्षांत घेतला किंवा परदेशगमननिषेधाचा प्रताप राष्ट्राला कसा भोवला, जातिबहिष्कृत होण्याच्या भीतीमुळे आपल्या पराक्रमाचा संकोच कसा झाला, जातवेडामुळे मराठी साम्राज्याचा क्षय कसा झाला याची चर्चा अवलोकिली अथवा विज्ञाननिष्ठेच्या जोरावरच युरोप प्रबळ कसें झालें, आपलें देवभोळेपण न सुटल्यामुळे आपण दुबळे कसे झालों, आपल्याला यंत्रयुगांत मानाने जगावयाचें असेल तर आपण धर्मशास्त्रांतील (व अर्थशास्त्रांतीलहि) माबडेपणास ठोकरून देणें कसें अवश्य आहे याचें विवरण पाहिलें तरी हेंच दिसून येतें की, या सर्वांच्या मुळाशीं स्वातंत्र्यनिष्ठा व विज्ञाननिष्ठा याच्या-शिवाय दुसरी कोणतीहि (विपरीत) निष्ठा नाही.

सावरकरांच्या सर्वच निबंधांतून प्रतिभेच्या आत्मविश्वासाचें दर्शन घडतें. हा आत्मविश्वास त्यांच्या ठायीं दिसतो याचें कारण, त्यांनी तत्कालीन जीवनाच करेल चौफेर, मार्मिक निरीक्षण आणि राष्ट्राची शक्ति क्षीण कशामुळे होते हे लक्षात घेऊन करेल शक्तिसाधनेचें-उपासनेचें खोल, **नेमकें चिंतन याचें पाठबळ** त्यांना आहे. ज्या काळात सावरकरांनी हे निबंध लिहिले त्या काळांतील राजकीय व सामाजिक परिस्थितीचें निरीक्षण करून आणि भारताच्या व परराष्ट्रांच्या इतिहासांतून मिळणाऱ्या सूचक संदेशांचें मनन करून मगच त्यांनी आपले विचार निश्चयात्मक भाषेत व्यक्त केलेले दिसतात. १९०७ मध्ये जेव्हा 'मॅझिनीच्या आत्मचरित्रा' चें भाषांतर प्रसिद्ध झालें, त्या वेळीं रशिया, आयर्लंड, पोर्तुगाल येथें ( आणि भारतातहि ) ज्या क्रांतिकारक घटना घडत होत्या, त्या सावरकरांच्या नजरेंतून सुटल्या असणें असंभवनीय आहे. या सर्वच घटनांचा उल्लेख आढळत नसला तरी काहींचा उल्लेख 'लग्नाच्या गतमीपना' त मिळतो, त्यावरून तत्कालीन राजकीय आंदोलनाचें अवलोकन करून मग सावरकरांनी काही आडाखे बांधले असा अंदाज करता येतो. 'राजकारण हें परमेश्वराचें कर्तव्य आहे' यांतील विचारांच्या मुळाशी हेच आलेखे आहेत. १९२० नंतरच्या राजकीय नियंत्रणाच्या काळात सावरकरांनी जात्युच्छेदक व विज्ञाननिष्ठ निबंध लिहिले तेव्हा गांधींच्या तत्वज्ञानांतील कांहीं विज्ञानयुगविरोधी कल्पनांचा जोर वाढलेला पाहताच, या कल्पनांनी आजवर आपलें कसें नुकसान केलें हें आपल्या इतिहासावरून दिसलेलें असल्यामुळे आणि या कल्पनांचा उच्छेद केला तर प्रबळ कसे होता येतें हें युरोपच्या इतिहासावरून लक्षांत आलेलें असल्यामुळे, त्या विघातक कल्पनांवर ते त्वेषानें तुटून पडलेले दिसतात. 'हिंदु राष्ट्राच्या अधःपाताचें मूळ' 'मंत्रबळें नव्हे, यंत्रबळें!' या दोन निबंधांतील विविध स्फुट उल्लेखांवरून व ( उदा० पृष्ठ ६१-६६, ६९-६१, ६०-६७ यांवरील उल्लेख), व प्रखर हल्ल्यावरून हें सहज लक्षांत येतें. याप्रमाणे वर्तमानाचें मर्मग्राही अवलोकन, भूतकाळाचें अव्यंग स्मरण व भविष्याचा वेध घेऊन केलेलें चिंतन याचें पाठबळ सावरकरांच्या निबंधांतील विचारांना असल्यामुळे ते जेव्हा ते विचार राष्ट्राच्या गळीं उतरवू जातात, तेव्हा त्यांच्या लेखनात कमालीचा आवेश उत्पन्न झालेला दिसतो. त्यांची वृत्ति आक्रमक

बनलेली दिसते, त्याचा शब्दन् शब्द ओजोगुणयुक्त झालेला दिसतो.

आक्रमक वृत्ति, आवेश, ओजोगुण हे जसे सावरकरांच्या लेखनाचे विशेष तसेच प्रभावशालित्व, भावनोत्तेजकता, विचारस्फोटकता हेहि अन्य विशेष. प्रतिपाद्य विषयाचे अनन्यसाधारण महत्त्व स्वत स पूर्ण पटलेले असल्यामुळे व इतरांना ते पटवून देण्याची अपार तळमळ मनात असल्यामुळे सहजच साधली जाणारी तन्मयता, उत्कटतेच्या भरात ऐनवेळी येणारा वक्तृत्व गुण व त्याच्याच परिपाकातून निष्पन्न होणारे परिणामकारक नाट्य यांत कराल गुणांचे मूळ आहे. विशिष्ट मुद्द्यांच्या मांडणीतील त्वेषयुक्त उत्साह, उसळते चैतन्य, विशिष्ट ठसक्यात केलेले प्रश्न व काढलेले उद्गार आणि त्यांची नियत अंतराने केलेली सहेतुक 'उत्कर्ष' ( Climax ) साधक पुनरावृत्ति, 'हा सूर्य, हा जयद्रथ!' या धाटणीच्या आत्मप्रत्ययसंपन्न, आव्हानप्रद उक्ति, सात्त्विक संतापाची स्वाभाविक अभिव्यक्ति, सफेद चिंधीच्या पोटी उत्पन्न होणारा बोचक उपरोध, दाहक उपहास, जहाल परिहास, स्पष्टोक्तीच्या साहाय्याने प्रतिपक्षीयास अगदी हास्यास्पद व केविलवाणे करण्याची पद्धति इत्यादी गोष्टींतून उपर्युक्त गुणांची तन्मयता, वक्तृत्वगुण, नाट्य यांचा प्रत्यय पुष्कळ प्रमाणात येतो. स्वातंत्र्याचा पुरस्कार करताना किंवा जातिभेदाचा अधिक्षेप करताना किंवा विज्ञानविरोधी वृत्तींचा खरपूस समाचार घेताना सावरकरांच्या लेखणीला जो बहर आलेला दिसतो ( उदा० –पृष्ठ ३६, ३९, ४३, ४४, ५२, ५३, ५६, ६०, ६१, ६३, ६४ पाहा. ) त्यावरून वरील गोष्टींचे प्रत्यंतर पुन पुन्हा येते.

सावरकरांच्या विचारांचे व त्यांच्या आविष्काराचे हे वेगवेगळे विशेष पाहिले म्हणजे बॅरि० असफअली यांनी सावरकरांच्या व्यक्तित्वाचे जे वर्णन केले आहे 'Restless as a mountain torrent and keen as the edge of a Toledo blade' तेच वर्णन त्यांच्या निबंधांनाही अगदी चपखलपणे बसते आहे हे स्पष्ट होते.

## ३. प्रा. श्रीपाद महादेव माटे ( १८८६–१९५७ )

प्रा. माटे हे जसे निष्णात शिक्षक होते, तसेच हिमायतीचे समाजसेवक होते आणि मातब्बर ग्रंथकार होते. उत्सुक विद्यार्थ्यांविषयी, आर्त समाजाविषयी, नवनवीन प्रमेयाविषयी–थोडक्यात एकूण जीवनाविषयीच–त्यांना विलक्षण आस्था होती. जीवनातील खुजेपणा नाहीसा करणे हे त्यांचे ध्येय होते, भव्यता–उत्तुंगता हा त्यांच्या मनाचा ध्यास होता आणि चिकित्सापूर्वक लेखन करून दीनदलितांसाठी अगअग झिजविणे हे त्यांचे धोरण होते. सतत व्याख्याने करीत, विद्यार्थी सहचाऱ्यांच्या साह्याने प्रचंड कामाचा फडशा पाडीत आणि पहाटपार प्रयत्नपूर्वक योजनापूर्वक सिद्धीस नेत त्यांनी आपले जीवितकार्य पूर्ण केले. वैयक्तिक प्रपंचात गुरफटून न राहता **सामाजिक प्रपंचात ते शिरले आणि तो प्रपंच यशस्वी व्हावा यासाठी ग्रंथलेखनाचा वाङ्मयीन प्रपंचहि त्यांनी केला.** हा प्रपंच धडाडीने करीत असतानाच वेगवेगळ्या ग्रंथांच्या रूपाने, प्रबंधांच्या रूपाने, निबंधांच्या रूपाने आपले प्रपंचविज्ञान त्यांनी विशद करून सांगितले 'अस्पृश्यांचा प्रश्न', 'परशुरामचरित्र', 'विज्ञानबोध', 'रामदासस्वामींचे प्रपंचविज्ञान', 'विचारशलाका', 'विचार गुच्छ', 'विचारमन्थन', 'विचारमंथन' इत्यादी अनेक ग्रंथप्रबंधांतून–निबंधसंग्रहांतून ते अमाप विखुरलेले आहे. ते एकत्रित स्वरूपात पाहिले तर असे दिसते की, एका भौतिकवादी, बुद्धिवादी, धीर गाणसाने केलेले प्रवृत्तिपर चिंतन हे त्या प्रपंचविज्ञानाचे स्वरूप आहे. हे प्रपंचविज्ञान त्यांनी प्राञ्जळ मनाने, प्रामाणिक बुद्धीने, प्रमाणपुरस्सर मांडले आहे. त्यांच्या मांडणीत स्पष्टता आहे, निर्भीडपणा आहे, परखडपणा आहे ही मांडणी ज्या मापाने आहे ती मापाने मन पूर्वक आहे, ठोस आहे, डौलदार आहे. समाजाची सारी सामर्थ्ये वाढीस लागावी यासाठी अहोरात्र तळमळणाऱ्या, धडपडणाऱ्या, कार्यरत राहणाऱ्या एका 'महानुभावा' ची सारी – बौद्धिक, भावनिक, वैचारिक – सामर्थ्ये या सगळ्याच्या स्वयंपूर्ण धारदार मेळातून फुलारून आलेली दिसतात. प्रस्तुत संग्रहातील प्रा. माटे यांचे तीन निबंध पाहिले तरी त्यांत हेच दिसून येते.

रामदासांच्या ओवीच्या अणुरेणूत शिष्य निर्माण करण्याचे सामर्थ्य असूनहि जसे व्हावे तसे शिष्य निर्माण झाले नाहीत, जे झाले त्यांना राम

रामदासांच्या मनाचे बहुविध व्यापार कळले नाहीत, प्रपंचवादाचा झेंडा फडकविणें हे स्वामींचे जीवितकार्य नसून परमार्थवादाचा पुरस्कार करणें हेंच त्यांच्या जीविताचें निर्धार होतें असें सावेश प्रतिपादन त्यांनी केलें हें पाहून प्रा. माटे यांना विषाद वाटतो, पूर्वीच्या संतपरंपरेंतून उठण्याचें अलौकिक धैर्य रामदासांनी दाखविलें, प्रापंचिकांना महाराची सनद देण्याचें काय त्यांनी केलें, राष्ट्रकारणाची जननी जी प्रवृत्ति तिचें पुनरुत्थान त्यांच्या हस्तें झालें हें पाहून प्रा. माटे यांच्या अंतरांत रामदासांचा गौरव दाटून येत असला तरी एवढ्या या पर्वीच्या वाङ्मयाची पारमार्थिक वाचकांना चातपट करी, रामदासांनी सांगितलेल्या प्रपंचविज्ञानाचें बीज परमार्थानें रुक्ष बनलेल्या महाराष्ट्रभूमींत दग्ध होऊन गेलें, रामदासांना दिव्य संदेश सांगितला होता की नव्हता अशी शंका यावी असें परमार्थविचारांचेंच पीक पुन्हा फिरून फिरून आलें हें पाहून त्यांना खेदच वाटतो. यावरून **ऐहिक जीवनाविषयी त्यांना वाटणारा जीर्णांचा जिव्हाळाच** सूचित होत नाहीं काय? ऐहिक जीवनांतील सुखाचें सोपान मोडून सगळीकडे कष्टांचें काटेरें माजलेलें पाहून गलबलणारें त्यांचें अंतःकरणच दृग्गोचर होत नाहीं काय? ‘ गिरिजन आणि परिजन ’ या निबंधांत त्यांच्या समाजविषयक तळमळीची जागती प्रतीति येते ज्यांच्या वस्तीवर अजून संस्कृतीची पहाट फाकलेली नाहीं अशा लोकांचें आक्रंदन सुशिक्षितांना ऐकू येत नाहीं, आचारकांड व भूतदया यांत द्वंद्व उत्पन्न झालें तर आचारकांडाला महत्त्व दिलें जातें, आणि भूतदया वाऱ्यावर सोडली जाते परिणामीं अज्ञान, दास्य, लाचारी यांच्या कर्दमांत अठ्ठावीस युगें असणारे हे दलित लोक आहेत तसेच राहतात हें पाहून त्यांचें मन कळवळतें आणि मग ज्याला स्वत्वाची आपुलकी असेल त्यानें या लोकांच्या जीवितांत शिरावें, त्यांना या कर्दमांतून वर उचलावें, हें धर्माचरण आहे असें ते कळकळून सांगतात. प्रा माटे दुःखितांचीं चित्रें पाहून कळवळल्यानंतर हळुवार अंतःकरणाचे असले तरी हळवे नाहींत. भावनांच्या भरांत व अश्रूंच्या पुरांत न सापडता स्थिर बुद्धीच्या साहाय्यानें दुःखाची व तें उत्पन्न ज्यांतून होतें त्या समस्येची नाडीच कशी ठेचावी याचें रोकडें प्रतिपादनही ते करतात. ‘ धावगाचा जाच ’ हा त्यांचा निबंध या दृष्टीनें लक्षांत घेण्याजोगा आहे. समतेच्या घोषणा मागून [illegible] आल्यानें

अमेरिका, आफ्रिका येथे गोरे लोक व काळे लोक यांच्यातली तेढ गुंतत कशी गेली, यामुळे जीवनात अस्वस्थता कशी उत्पन्न झाली, रानकऱ्याचा जाच होऊ नये म्हणून ऑस्ट्रेलियाने सावधगिरी कशी बाळगिली, नव्याने लोकशाहीचे स्वीकार करणाऱ्या हिंदुस्थानाने सामाजिक मनाची सार्वत्रिक मशागत करणे कसे अगत्य आहे, अन्यथा नवी लोकशाही कनिष्ठ दर्जाची कशी होईल याचा जी चर्चा त्यांनी केली आहे तिच्यावरून प्रा० माटे हे मानाने नव्हन विवेकी आहेत हे ध्यानात येण्यास प्रत्यवाय नाही.

प्रा. माटे यांचे हे विवेकनिष्ठ विवेचन वाचले म्हणजे रामदासांविषयी त्यांनी जे लिहिले आहे ( पृ. ७५ ) त्याचे स्मरण होते. " त्याहीपेक्षा अधिक वारकाईने मानसविज्ञानात तो रंगलेला दिसतो. ते विज्ञान अवश्य सांगावयाचे आहे अशी त्याची भूमिका दिसते आणि ठसवावयाचे आहे असा त्याचा आग्रह दिसतो. ती त्याची रिकामपणाची कामगिरी नाही; ते त्याने सहज सहजी केलेले नाही,... ते त्याचे वरकरणी वाक्पांडित्य नव्हे. मनाच्या, चित्ताच्या, विवेकबुद्धीच्या मूळ कंदांतून भराभर फुटणारे ते जोरकस पदे आहेत. ती जिवंत वाणी आहे; वेचक विचारांचा तो संग्रह आहे. त्यात सामान्य विधानांची सारवासारव नाही. त्यात तजेलदार कणाकणाची रेखीव मांडणी आहे. त्यात आत्मप्रत्ययाचा कस आहे. " हे सर्व जसेच्या तसे प्रा. माटे यांच्या निबंधानाहि लागू होत नाही काय ?

प्रा. माटे यांच्या निबंधात खरोखरच आत्मप्रत्ययाचा कस आहे मूळची दयाबुद्धि, साक्षात् अनुभव व स्वतंत्र साक्षेपी अभ्यास या तीन गोष्टींचे बळ त्यांच्या लेखनामागे असल्यामुळे त्यात सहृदयता, पक्केपणा व टापटीपणा या गुणांचे वैपुल्य आढळते. त्या लेखनात कोठेहि ऐचेपेचे असे काही नसून सर्वत्र धडाडीत असे खरे आहे. प्रा. माटे यांच्या प्रांजळ, बहुविध, ठसठशीत मापेमुळे त्यांचे लेखन अधिकच धवधवीत झाले आहे भरभरून येणारे विचार, विचारप्रकटीकरणातील उफाळणारा उत्साह आणि ' अस्पष्ट कल्पनांना रेखीव आकार ' देणारी ' सुटाल, चैतन्यमय, टोकदार भाषाशैली ' यांच्या औचित्यपूर्ण समन्वयामुळे प्रा. माटे यांचे निबंध ऐटबाज झालेले दिसतात; त्यांचा म्हणून एक दर्जा त्यांना प्राप्त झालेला दिसतो. आणि यामुळेच मराठी मधील निबंधकारात प्रा. माटे उठून दिसतात.

हें सर्व ध्यानात घेतलें म्हणजे " चिंतनशीलता, समतोल वृत्ति, सत्यान्वेषणाची इच्छा आणि डौलदार शैली यांचा जोड विविध विषयांना मिळाल्यामुळे केळकरानंतरचे अग्रगण्य दर्जाचे निबंधकार म्हणून त्यांचाच उल्लेख केला पाहिजे " हें श्री. वि. ग. माटेकर यांचे ( 'प्रदक्षिणा'मधील ) म्हणणें रास्त दिसतें.

## ४ प्रा. दत्तात्रय केशव केळकर ( जन्म १८९५ )

प्रा. द. के. केळकर हे व्यासंगी व बहुश्रुत लेखक आहेत. त्यांना साहित्य विषयक प्रश्नांविषयी ज्या जिव्हाळा वाटत आलेला आहे तसाच सामाजिक प्रश्नांबद्दलहि वाटत आलेला आहे यामुळेच वाङ्मयीन विषयांवर त्यांना जशी ग्रंथरचना केली आहे तशीच सामाजिक सांस्कृतिक विषयांवरहि केली आहे. 'काव्यालोचन', 'मराठी साहित्यांतील विहारावलोकन', 'साहित्यविहार' ही त्यांची पहिल्या प्रकारची रचना असून 'संस्कृति संगम', 'उद्यांची संस्कृति', 'संस्कृति आणि विज्ञान', 'वादळी वारे' ही त्यांची दुसऱ्या प्रकारची रचना होय. 'विचारतरंग'मध्ये दोनही प्रकारचें लेखन समाविष्ट करण्यात आलेलें आहे. या सर्व लेखनावरून प्रा. केळकर यांच्या ठायीं विविध विषयांच्या मूलगामी अभ्यासाचा व मर्मवेधक विवेचनाची उत्कट हौस कशी आहे हे दिसून येतें. वाङ्मयाचा व त्यांतील अनेक कूट प्रश्नांचा जो रसास्वादक व विवेचक असा अभ्यास त्यांनी केला आहे तो लक्षात घेण्याजोगा आहेच, पण त्यापेक्षांहि संस्कृतीचा व तिच्यांतील वेगवेगळ्या विचारप्रवाहांचा जो शास्त्रीय व विचक्षण असा विमर्श त्यांना केला आहे तो ( विशेषतः प्रस्तुत संदर्भात तरी ) अधिक लक्षणीय आहे. पौरस्त्य संस्कृति व पाश्चात्त्य संस्कृति यांच्या स्वरूपाचें व संघर्षोत्तर परिणामाचें ऐतिहासिक समालोचन 'संस्कृति संगमा'त करण्यात आलें आहे. साम्यवादाच्या प्रयोगामुळे संस्कृति नव्या रस्त्यावर कशी येऊन ठेपली व येथून पुढे विश्व नंदनवनाकडे जाणार की नरकाकडे जाणार हा प्रश्न तिने कसा उपस्थित केला याचें वास्तववादी भूमिकेतून वस्तुनिष्ठ विवरण 'उद्यांची संस्कृती' मध्ये करण्यात आलें आहे आणि विज्ञानवृद्धीने मानवाच्या राहणीवर व विचारसरणीवर कोणते परिणाम

करे याचे व्यापक अवलोकन करून विवेकपूर्वक विज्ञानोपासना करणे हितकारक कसे आहे याचे वर्णन 'संस्कृति आणि विज्ञान' मध्ये करण्यांत आलें आहे. विषयांतरानें विवेचनांत विभिन्नता आलेली असली तरी त्या सगळ्यातून प्रा. केळकरांची **जीवनाभिमुखता, विज्ञाननिष्ठा, विवेचकता यांचें दर्शन** घडते त्याचप्रमाणे उद्बोधक विवेचन मनोरंजक व्हावें यासाठी अवघड शास्त्रीय विषय, तात्त्विक विचार विच्छिन्न न करता सोप्या, पण सौष्ठवयुक्त मार्मिक मोहक शैलीने मनातून व समजावून सांगण्याची त्यांची हातोटीहि त्यावरून दिसून येते. प्रस्तुत संग्रहांतील प्रा. केळकरांचे निबंधहि हेंच निदर्शनास आणून देतात.

प्राचीन काळात धर्माने काही महत्त्वाचे सांस्कृतिक कार्य केलें असले तरी वैराग्यवाद, दुःखवाद, जगन्मिथ्यावाद, दैववाद इत्यादी धर्मप्रचलित वादाच्या प्राबल्यामुळे आपल्यातलें पौरुष कसें नष्ट झालें, आपल्यातली प्रतिकारवृत्ति कशी खच्ची झाली याचा साधार विचार 'धर्माची रेशमी काढणी' या निबंधांत प्रा० केळकरांनी केला आहे, तर याच्याच पुढचा क्रमप्राप्त विचार—प्रारब्धवाद, पुराणप्रियता, अल्पसंतुष्टता इत्यादी मारक शक्तींमुळे प्रगतिपर संस्कृतीच चैतन्य नें विचारस्वातंत्र्य तेच कसे काळवंडलें आणि आपल्याला मरगळ येऊन आपण दुबळे कसे झालो याचा विचार—त्यांनी 'विचारदौर्बल्याचे दोषाळ' या निबंधांत विविध प्रमाण मांडून केला आहे. विपरीत कल्पनांच्या आहारी गेल्यामुळे आपला जो सर्वांगीण ऱ्हास झाला त्याचा विचार प्रा० केळकरांनी केला असला तरी तेवढाच विचार करून ते थांबलेले नाहींत, **ऱ्हासाची मीमांसा** जशी त्यांनी केली आहे **तशीच विकासाची उपाय योजनाहि** त्यांनी सांगितली आहे. स्वतंत्र, स्वाभिमानी राष्ट्राला यापुढे विज्ञानाची उपासना टाळतां येणार नाही हे त्यांचे स्पष्ट सांगणे आहे. विज्ञानानें विध्वंसक शक्ती उत्पन्न केली असली तरी तिचा विधायक सृजन-कार्यासाठी उपयोग करून घेणे विचारी राष्ट्राला अशक्य नाहीं असें त्यांनी 'विज्ञानाची उपासना' या निबंधांत म्हटलें आहे. "विज्ञानानें हस्तगत केलेल्या त्याच्या दुरुपयोगाबद्दल त्याला शिव्याशाप देत न बसतां त्याच्या अनमोल साधनांच्या अनेक आवर्तांवर आपण मात करूं अशी उमेदीची वृत्ति आपण धारण करूं या." हें त्यांचे मतवाक्य आहे. अर्थात् याचा उच्चार त्यांनी केवळ या निबंधांतच केला आहे असें मात्र नव्हे. यापूर्वीच्या निबंधा-

मध्ये आपल्या अपकर्षाचें चित्र रेखाटतांना व त्याची कारणें प्रकाशित करतांनाहि त्यांनी या भरतवाक्यासारख्याच वाक्यें उच्चारून भविष्यकालीन उत्कर्षाची दिशा दाखविली आहे. "आता बदलत्या कालानुरूप व विज्ञानवृद्धीस अनुसरून इहलोकहि आनंदमय करण्यास झटलें पाहिजे." (पृ.११२) "आपल्या संस्कृतिसंपदेंतील उणीव आता आम्ही ओळखिली आहे. आणि म्हणूनच निकटच्या भावी काळांत ही उणीव भरून काढूं व जागतिक राष्ट्रमालिकेंत आपलें पूर्वीचें मानाचें स्थान पुन्हा एकदा मिळवूं असें अनुमान काढणें अवास्तव होणार नाही." (पृ.     ) या विधानावरून प्रा. केळकरांची जीवनाभिमुखता, विज्ञाननिष्ठा, विवेचकता यांचें स्पष्ट प्रत्यंतर येत नाही काय?

'खऱ्या विद्वानाचे चर्मचक्षु वर्तमान स्थितीचें प्रेक्षण करण्यांत गुंग असतात, त्याचे ज्ञानचक्षु पूर्वेतिहासाच्या परिशीलनांत मग्न असतात, तर त्याचे तर्कचक्षु भावी परिस्थितीकडे वळलेले असतात. प्रा. केळकरांची विद्वत्ता या अर्थानें त्रिनेत्री आहे' हें श्री. शि. ल. करंदीकरांचें सदर म्हणणें संग्रहाच्या संदर्भांतहि पुष्कळनें समर्पक आहे. कारण, त्यांतील तीन निबंधांमध्ये या त्रिनेत्री विद्वत्तेचें प्रतिबिंब पाहावयास मिळतें. 'विज्ञानाची उपासना' या निबंधांत वर्तमान स्थितीचें प्रेक्षण आढळतें, तर 'धर्माची रेशमी काढणी' व 'विचारदौर्बल्याचें शेवाळें' या निबंधांत पूर्वेतिहासाचें परिशीलन सापडतें आणि प्रामुख्यानें पुन्हा 'विज्ञानाची उपासना' याच निबंधांत भावी परिस्थितीचें ओझरतें अवलोकन दिसतें. हें खरें असलें तरी प्रा. केळकर **पूर्वेतिहासाच्या अवगाहनांत** व त्यांतील प्रमाणांच्या बळावर उन्नति-अवनतीची चिकित्सा करण्यांत (प्रस्तुत निबंधांत तरी) **अधिक रममाण** झालेले दिसतात. उपनिषदें, महाभारत, स्मृति, दर्शनें, संतांचें साहित्य, राजतरंगिणी, भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास, अल्बेरुणीचा 'India' (भाषा) हा ग्रंथ, न्यायशास्त्र, धर्मशास्त्रविचार, अग्निपुराण, राधामाधवचंपू (प्रस्तावना) 'मराठे व इंग्रज' इत्यादी अनेक ऐतिहासिक ग्रंथांचें आलोडन करून भरपूर प्रमाणांच्या साह्यानेच प्रा. केळकर चर्चा करतांना दिसतात. हा एक खास विशेष होय.

इतिहासांतील उदाहरणांमुळे प्रा. केळकरांच्या निबंधांना जो एक वेगळाच रंग येतो तो त्यांच्या **ढंगदार शैलीमुळे** अधिकच खुललेला दिसतो. ही

खुलावट त्याच्या सुबोध, रसाळ, ओघवती, आवाहक अशा भाषेमुळे साधलेली दिसते. आपलें प्रतिपादन प्रत्ययोत्पादक ( Convincing ) व्हावें यासाठी तें सजविण्याची हौस प्रा० केळकराना असल्यामुळे पुष्कळदा ते रुचिर, आलंकारिक, सचेतन, वर्णनात्मक भाषेचा आश्रय करतात आणि त्यामुळे त्याची भाषाशैली अधिक वेधक व अधिक चमकदार झालेली दिसते. त्याचें समग्र वाङ्मय वाचल्यावर याची जेवढी प्रतिति येते तेवढी प्रस्तुत संग्रहातील निबंधातून येत नसली तरी ती बऱ्याच प्रमाणात येते.

प्रा० केळकरांच्या एवगुणविशिष्ट निबंधाच्या वैशिष्ट्याची थोडक्यांत नोंद करावयाची झाल्यास ती अशी करता येईल–परिणतप्रज्ञ विवेकबुद्धि, समयज्ञ समतोल विचारसरणी, प्रतिपाद्य विषयाची समर्पक सुघट मांडणी व मनोरम भाषाशैली हे प्रा. केळकरांच्या निबंधलेखनाचे द्योतक विशेष होत. ( युगवाणी )

## ५. प्रा. डॉ. पुरुषोत्तम गणेश सहस्रबुद्धे ( जन्म १९०४ )

डॉ. पु. ग सहस्रबुद्धे हे ( मराठी ) वाङ्मयाचे अभ्यासक व प्राध्यापक. पण केवळ वाङ्मयाचाच अभ्यास करण्यात आणि केवळ महाविद्यालय–विद्यापीठ येथील विद्यार्थ्यांनाच शिकविण्यात ते रमले नाहीत. वाङ्मयाचा अभ्यास, संस्कृतीच्या एका महत्त्वाच्या अंगाचा अभ्यास, म्हणून त्यांनी केला असला तरी केवळ तेवढ्या एकाच अंगाचा अभ्यास करून त्यांचें समाधान झाले नाही, म्हणून त्यांनी इतिहास, राजकारण, धर्मशास्त्र, अर्थशास्त्र, समाजशास्त्र इत्यादी संस्कृतीच्या इतरहि अंगाचा अभ्यास केला आणि विद्यार्थ्यांना केवळ पुस्तकी ज्ञान न देता जीवनाचें ज्ञान करून देणारे उत्तम, तळमळीचे शिक्षक म्हणून त्यांना नावलौकिक मिळाला असला तरी तेवढ्यावरच संतुष्ट न होता आंतरिक प्रेरणेच्या प्रभावामुळे समाजाला जीवनाचें ज्ञान करून देण्यासाठी त्यांनी आपली आतापर्यंतची उमेदीची हयात खर्च केली. थोडक्यात सांगावयाचें तर ते जीवनाचे अभ्यासक आहेत व समाजाचे अध्यापक आहेत आणि म्हणूनच विशाल जीवनाचें व्यापक दृष्टिकोनांतून अवलोकन करून, कोणत्या महत्त्वाचा अवलंब केला म्हणजे जीवन सर्वांगें यथार्थ व सुगंधें होतें

याचें आकलन करून अभ्युदयाच्या-ऐहिक प्रकर्षाच्या-दृष्टीने समाजातील दोषाचें निर्मूलन करणाऱ्या व त्याला श्रेष्ठ पदवी प्राप्त करून देणाऱ्या मार्गाचें निर्भ्रान्त दिग्दर्शन करण्याकरिताच त्यानी ग्रंथरचना केली, निबंधलेखन केले. 'विज्ञानप्रणीत समाजरचना', 'भारतीय लोकसत्ता', 'लोकसत्तेला दण्डनेचें आव्हान', 'स्वभावलेखन' हे त्याचे ग्रंथ आणि 'माझे चिंतन' 'राजविद्या', 'पराधीन सरस्वती', 'वैयक्तिक आणि सामाजिक' हे त्याचे निबंधसंग्रह वाचले म्हणजे त्याची जीवननिष्ठा, त्याचा व्यासंग, त्याचें बुद्धिवादी मन त्याचें प्रेरक लेखन या गोष्टींचा ठसा मनावर उमटतो. याचा प्रत्यंतर प्रस्तुत संग्रहातील निबंधातूनहि येतें.

शिवाजीराजाची क्रान्तिकारक कामगिरी, मानसशास्त्रातील नव्या सिद्धान्तामुळे होणारे अनर्थ, सत्तेचें राष्ट्रव्यापी नियामक तत्त्व अशा विविध विषयाचा विचार या संग्रहातील निबंधातून करण्यात आलेला असला तरी एक सूत्र त्या सर्वांत अनुस्यूत असलेलें दिसतें. **कोणत्याहि विषयाचा विचार असो, भारतातील सद्य स्थितीच्या संदर्भात, त्याचें हिताहित मनात ठेवूनच तो केलेला आढळतो**. अनेक आत्मघातकी कल्पना, पुरातन परंपरा याचा उच्छेद करून, सर्वसमावेशक, प्रवृत्तिपर अशा महाराष्ट्रधर्माची प्रस्थापना शिवछत्रपतींनी कशी केली आणि संघशक्ति निर्माण करून तिच्या साह्याने 'हिंदवी स्वराज्या'ची भव्य आकांक्षा साकार करण्याचा यशस्वी प्रयत्न कसा केला याचें विवेचन करीत असताना, निवृत्तिपर कल्पना, विचित्र परंपरा, विशुद्ध निष्ठाचा अभाव यामुळे सत्त्वहीन, दुर्बल झालेल्या भारताचें विस्मरण डॉ. सहस्रबुद्धे याना होत नाही आणि भारताला समर्थ व्हावयाचें असेल तर त्याने शिवरायाचा प्रताप आदर्श म्हणून स्वीकारणे अपरिहार्य आहे हें सांगितल्याशिवाय त्याना राहवत नाही, असेंच दिसून येतें. जुन्या काळीं दैववादाचा पगडा मनावर असल्यामुळे समाजाला जशी अवकळा आली तशीच अवकळा, मार्क्स व फ्रॉइड याच्या सिद्धान्तावर आधारलेल्या परिस्थितिवादाच्या प्रभावामुळे सध्या अमेरिकेला येत आहे आणि ही अवकळा नाहीशी करण्यासाठी प्रयत्नशील असलेली अमेरिका आत्मस्वातंत्र्याचें तत्त्व मान्य कसें करीत आहे याचें वर्णन करताना, 'परिस्थितिवादा'चा अंगीकार केल्यामुळे व त्याअन्वये हिंदूंच्या संस्कृत,

गुन्हेगाराच्या क्षेत्रात प्रयोग केल्यामुळे भारतात पाशवी वृत्ति प्रबळ होत आहे ही जाणीव त्यांना अस्वस्थ केल्याशिवाय राहत नाही आणि राष्ट्रोन्नतीच्या दृष्टीने तिचें दमन करणें अपरिहार्य असल्यामुळे ते करण्याच्या मार्गाचें दिग्दर्शन केल्याशिवाय त्यांना लेखणी खाली ठेववत नाही असेंच निदर्शनास येतें धर्म, वंश, राष्ट्र व वर्ग या चार तत्वांचा अवलंब करून अभेद्य संघटना करण्याचा प्रयत्न आजवर जगांत झालेला असला तरी त्याला शंभर टक्के निरपवाद यश कसें आलेलें नाही याचें ऐतिहासिक दृष्टीने समालोचन करताना व ऐक्याचा निधार हाच संघटनेचा आत्मा हें जाणून इंग्लंडादी राष्ट्रांनी अनेक भेद कारणें पचवून राष्ट्रैक्य कसें साधलें याचें विवरण करताना, अनंत भेदांनी जर्जर झालेला आपला देश त्यांच्या दृष्टिआड होत नाही आणि विवेकबुद्धि जागृत ठेवल्यास भारत एकमय करणें अशक्य नाही हें खरें असलें तरी इंग्लंडप्रमाणें प्रथम एक होण्याची प्रतिज्ञा करणें कसें अवश्य आहे हें आग्रहून सांगितल्याशिवाय त्यांना आपला निबंध पुरा करवत नाही, असेंच दृष्टोपत्तीस येत याप्रमाणे प्रस्तुत संग्रहातील न. सहस्रबुद्धे यांचा कोणताहि निबंध घेतला तरी आपल्या राष्ट्राच्या कल्याणाविषयी ते किती जागरूक आहेत आणि वेगवेगळ्या निर्णयाची चर्चा वर्तमान अवस्थेवरील नजर जराहि ढळूं न देता त्यांनी कशी केली आहे हें सहज स्पष्ट होतें

न. सहस्रबुद्धे यांनी राष्ट्रहितैक बुद्धीने केलेली चर्चा जीवनाच्या ज्या अन्वयार्थावर आधारलेली आहे तो अन्वयार्थ लावताना तुटपुंज्या घटनांवर--मग त्या इतिहासकालीन असोत किंवा वर्तमानकालीन असोत--विसंबून न राहतां अनेक घटनांच्या भरभक्कम पायावर ते उभे राहिलेले दिसतात **भरपूर आधार व प्रमाणें असल्याशिवाय घाईघाईने ते निष्कर्ष काढत नाहीत** असें दिसून येतें प्रस्तुत संग्रहातील त्यांचा कोणताहि निबंध वाचला तरी हेंच लक्षांत येतें प्रत्यक्ष व्यवहारांतील उदाहरणें, सुबुद्ध नागरिकांनी केलेलें विचारमंथन, विभिन्न कालखंडांतील मतें जगाच्या इतिहासांतील वेगवेगळ्या कालखंडांतील, वेगवेगळ्या देशांतील, वेगवेगळ्या क्षेत्रांतल्या घडामोडी इत्यादी गोष्टींचें सम्यक् अवेक्षण-परीक्षण केल्याशिवाय ते एखाद्या निर्णयाप्रत येण्याचा आततायीपणा करीत नाहीत हें सिद्ध करण्यासाठी त्यांच्या एखाद्या निबंधाचीहि साक्ष पुरेशी आहे मुळातच पुरावा कमी उपलब्ध असला तरी त्याची साक्षपाने

सुळणी करून मगच विधान करण्याची प्रवृत्ति ' शिवकालीन शास्त्रीय ज्ञानिकार्य ' या निबंधात दिसून येत असल्यामुळे त्याची साक्ष या संदर्भात घडल्यास ती अधिकच उद्बोधक ठरते. हे लक्षात घेतल्यास डॉ. सहस्रबुद्धे यांनी लावलेला जीवनाचा अन्वयार्थ व त्याच्या आधारें केलेली चर्चा ही निराधार नसून सुस्थित पायावर आहेत हे कळण्यास विलंब लागत नाही. यामुळेच त्यांचे एखादें मत पटलें नाही तरी तें त्यांच्याच पद्धतीचें अनुसरण करून आधार व प्रमाणें यांचा यथोचित उपयोग करून–खोडून काढणें सुकर नाही यांची जाणीवहि अल्पावधानच होते.

डॉ. सहस्रबुद्धे यांच्या निबंधांना आधारप्रमाणांचें हे असें सबळ अधिष्ठान लाभलेलें असल्यामुळे, डोंगरा किल्ल्यावरील मजबूत बालेकिल्ला ज्या ताठ मानेनें ऐटींत उभा असलेला दिसतो. तसाच, त्यांचा एकेक निबंध खंबीरपणें ऐटीत उभा राहिलेला दिसतो. डॉ. सहस्रबुद्धे यांचा प्रसिद्ध आवेश व अभिनिवेश यांचा आढळ त्यांच्या अलीकडच्या निबंधांत थोडा कमी होत असला तरी त्यांची ऐट मुळींच उणावलेली नाही. डॉ. अ. ना. देशपांडे यांनी म्हटल्याप्रमाणे, डॉ. सहस्रबुद्धे यांच्या लेखणीला अलंकरणाचा वाङ्मयीन ठाऊक नाही, लालित्याचें लाडिकपण तिला विदित नाही; तिची **चाल साधी व सरळ आहे, तींत आत्मविश्वासाची ऐट आहे.** (आ० म० वा० इति० भाग २.) त्यांच्या निबंधांत ही ऐट असली, एक प्रकारचा बौद्धिक ताठरपणा असला तरी तो सगळें कडक, रूक्ष आहे असें मान नाही. अलंकरणाचा बौद्धिक ताठरपणा असला तरी तो अगदी कडक, रूक्ष आहे असें मान नाही. अलंकरणाचा अभाव असूनहि कळकळींतून उत्पन्न झालेला भावनिक ओलावा त्यात निश्चित आहे. त्याचा प्रत्यय सहजासहजी येत नसला तरी त्याचें सूक्ष्म अस्तित्व नाकबूल करता येत नाही. आत्मविश्वासोत्पन्न ऐट आणि कळकळींतून उत्पन्न झालेला हा ओलावा हे डॉ. सहस्रबुद्धे यांच्या निबंधांचे विलोभनीय विशेष आहेत.

* * *